अखिल भारत वीरशैव संघ ग्रंथमाला–पुष्प ५

# वीरशैव (लिंगायत) लेखसंग्रह





प्रकाशक – अखिल भारत वीरशैव संघ, बेळगांव.

सन १९७२ ]

[ मूल्य ३–००

अखिल भारत वीरशैव संघ ग्रंथमाला–पुष्प ५

# वीरशैव (लिंगायत) लेखसंग्रह

(ज्ञानप्रसाद मासिकांत प्रकाशित झालेल्या श्री. म. पु. पाटील यांच्या धार्मिक व चरित्रात्मक लेखांचा संग्रह)

प्रकाशक – अखिल भारत वीरशैव संघ, बेळगांव.

सन १९७२ ] [ मूल्य ३–००

# विषयानुक्रमणिका

## प्रस्तावना खंड.



## खंड १ धार्मिक व चरित्रात्मक लेख.

## खंड २ स्फुट लेख–आध्यात्मिक वेंचे



श्रीबसवेश्वर

सन १९६७ साली म्हैसूर सरकारनें नेमलेल्या श्रीबसवेश्वर
अष्टशतमानोत्सव समितीनें मंजूर केलेले
श्री बसवेश्वराचे छायाचित्र.

# प्रकाशकाचे चार शब्द

अ. भा. वीरशैव संघाचे अध्यक्ष व त्या संघाचे मुखपत्र असलेल्या 'ज्ञान प्रसाद' मासिकाचे आधारस्तंभ श्री म. पु. पाटील यांनीं या मासिकाकरितां वेळोवेळीं लिहिलेले लेख ज्ञानपूरित व माहितीपूर्ण असल्यामुळें ज्ञानप्रसादमध्यें प्रकाशित झालेल्या त्यांच्या लेखांचा एक संग्रहित ग्रंथ प्रकाशित केला गेल्यास त्यापासून महाराष्ट्रीय वीरशैव बाधवांना व इतरानाही तो ग्रंथ उपयुक्त होईल असें आमच्या मासिकाच्या कांहीं वाचकमित्रांनी सुचविल्यावरून सन १९६५ साली ज्ञानप्रसाद पाक्षिकाचे मासिकांत रूपांतर झाल्यावेळेपासून आजपर्यंत ह्या मासिकांत प्रकाशित झालेले त्यांचे लेख ह्या ग्रंथांत संग्रहित केले आहेत. हे सर्व लेख मुख्यतः वीरशैव धर्म व वीरशैव समाज ह्यासंबंधीच असल्यामुळें ह्या ग्रंथाला 'वीरशैव (लिंगायत) लेखसंग्रह' असें नामाभिधान केले आहे.

वीरशैव धर्मांचे सर्व प्रमुख साहित्य कन्नड भाषेंतच असून मराठी भाषेंत त्याचा अभाव असल्यामुळें महाराष्ट्रीयांना एवढेच नव्हे तर आमच्या महाराष्ट्रीय वीरशैव बांधवांनाही आपल्या श्रेष्ठ धर्मांविषयीं विशेष माहिती नाहीं. त्यामुळें महाराष्ट्रांत वीरशैव धर्म व समाज यांच्याबद्दल नुसते अज्ञान नव्हे तर अनेक गैरसमजही निर्माण झाले आहेत. त्याकरितां ह्यांचे निर्मूलन होऊन महाराष्ट्रांत वीरशैव धर्माच्या श्रेष्ठत्वाची व त्या समाजाच्या खऱ्या परिस्थितीची जाणीव निर्माण करण्यास त्याबद्दलची साधार माहिती मराठी भाषेतून उपलब्ध करून देणें आवश्यक आहे ही गोष्ट श्री. पाटलांनी भूतपूर्व मुंबई राज्याचे मंत्री असतानाच जाणले होते त्यामुळें ज्ञानप्रसाद मासिकाकरितां त्यांनी लिहिलेल्या सर्व लेखांत त्यांनीं ह्या गोष्टीवरच जास्ती भर दिला आहे. त्यामुळें त्यांच्या लेखांचा हा संग्रह म्हणजे वीरशैव धर्म व समाज यांचा संक्षिप्त साधार इतिहासच आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. या दृष्टीनें हा ग्रंथ महाराष्ट्रीय वीरशैव धर्मीयांना आपल्या धर्माची व समाजाची साधार माहिती करून घेण्यास उपयुक्त होईल व

तसेंच ह्या ग्रंथाच्या पठनानें ह्या विषयासंबंधी महाराष्ट्रांत वसत असलेले अज्ञान व गैरसमज दूर होतील अशी आशा आहे.

ह्या लेखांशिवाय श्री. पाढलांचे बसवेश्वर वचनासंबंधीचे कांहीं लेख ज्ञान-प्रसादांत वेळोवेळीं प्रकाशित झाले आहेत. परंतु ते लेख एका विशिष्ट विषयासंबंधी असून त्यांचे स्वरूपही निराळे असल्यामुळें त्यांचा ह्या ग्रंथांत समावेश केलेला नाहीं. ते सर्व लेख दुसऱ्या एका ग्रंथरूपानें प्रकाशित करण्याचा आमचा मानस आहे.

महाराष्ट्रीय वीरशैव समाजाचे लोकप्रिय नेते व महाराष्ट्र राज्य विधान सभेचे सभासद श्री रत्नाप्पाण्णा कुंभार यांनी या ग्रंथास बहुमोल पुरस्कार लिहून या ग्रंथाचे महत्व वाढविण्यास मदत केल्यावद्दल आम्ही त्यांचे मनःपूर्वक आभार मानतो. तसेंच 'रेणुका प्रिंटिंग प्रेस बेळगांव' याचे मालक व त्यांचा सहकारी कामगारवर्ग ह्यांनी ह्या ग्रंथाची सुबक छपाई अत्यंत काळजीपूर्वक व तप्परतेनें करून दिल्यावद्दल आम्ही त्यांचेही आभार मानतो.

कोल्हापूर,
दिनांक १-५-१९७२

शि. बा. संकनवाडे,
कार्यदर्शी अ. भा. वीरशैव संघ, बेळगांव

# पुरस्कार

भारत देशामध्यें वीरशैव साहित्य विपुल आहे. प्रामुख्याने हे सर्व साहित्य कन्नड भाषेत आहे. वीरशैव साहित्यामध्यें मानवी समाजजीवनाला पोषक अशी महान तत्वे, आणि तसेच व्यवहारीक मार्गदर्शन भरलेले आहे. या महत्वपूर्ण वीरशैव साहित्याचा उपयोग सर्व समाजाला व्हावयाचा असल्यास कन्नडमध्यें असलेल्या या साहित्याचे रूपांतर अनेक भाषांमध्यें होण्याची गरज आहे. या महत्वपूर्ण कन्नड साहित्याचे मराठी भाषांतर करण्यामध्यें आजपर्यंत अल्पस्वल्प प्रयत्न होत आले आहेत. भाषांतर करण्याच्या कामा बरोबरच मूळ कन्नड साहित्याचे परिशीलन करून त्या आधाराने मराठीमध्यें वीरशैव तत्वज्ञानावर स्वतंत्र ग्रंथहि लिहिण्याचे थोडे बहुत प्रयत्न झाले आहेत.

भूतपूर्व मुंबई आणि म्हैसूर राज्याचे माजी मंत्री आणि थोर समाजसेवक मा. श्री. एम्. पी. पाटील हे वीरशैव साहित्याची सेवा अनेक अंगाने करीत आले आहेत. उत्तम कन्नड साहित्याचे मराठीमध्यें अनुवादही त्यांनी केले आहेत. मौलीक स्वरूपामध्यें स्वतंत्र ग्रंथही त्यांनी लिहिलेले आहेत. त्यांनी अखिल भारतीय वीरशैव संघाची स्थापना करून त्या संस्थेचे संस्थापक आणि अध्यक्ष म्हणून आजपर्यंत कार्य करीत आले आहेत. त्यांनी स्थापन केलेल्या अखिल भारतीय वीरशैव संघाचे प्रमुख कार्य कन्नड भाषेमधील वीरशैव साहित्याचे मराठी अनुवाद करणे आणि स्वतंत्रपणे लिहिलेल्या वीरशैव साहित्याचा मराठी भाषिकाना परिचय करून देण्याचे होत आले आहे. आतापर्यंत लीला विश्वंभर, महात्मा बसवेश्वर, महायोगिनी अक्कमहादेवी वगैरे चरित्र ग्रंथ त्यांनी प्रसिद्ध केले आहेत. वीरशैव साहित्याचा त्यांचा व्यासंग फार मोठा आहे.

अखिल भारतीय वीरशैव संघाचे मुखपत्र "ज्ञानप्रसाद" मासिक यामधून मा. श्री. एम्. पी. पाटील यांनी अनेक उद्बोधक लेख लिहीले आहेत. वीरशैव तत्वज्ञानाचे स्वरूप विशद करून सांगण्याचा त्यांनी त्या लेखांमधून चांगला प्रयत्न केलेला आहे. वीरशैव तत्वज्ञानाची अंगे, उपांगे निरनिराळ्या मार्गांनी विशद करून

सांगितलेली आहेत. त्यांचे हे लेख तुटक रीतीने लोकांच्या वाचनांत येऊन गेलेले आहेत. वीरशैव तत्वज्ञान, वीरशैव धर्म आणि त्याचा सामाजिक उपयोग या द्रृष्टीने या निरनिराळ्या लेखांचे महत्व फार आहे. हे लेख विस्कळीत स्वरूपांत राहू देणें आणि त्याचा विसर लोकांना पडू देणे हे चांगले होणार नाहीं. कारण हे लेख सर्वार्थाने महत्वाचे आहेत. म्हणून अ. भा. वीरशैव संघानें त्यांच्या सर्व लेखांचा एक संग्रह ग्रंथरूपात प्रसिद्ध करण्याचें ठरविले. त्याप्रमाणें हा ग्रंथ 'वीरशैव (लिंगायत) लेखसंग्रह' या नांवाने त्या संघा मार्फत प्रकाशित केला जात आहे.

हा ग्रंथ येत्या बसव जयंतीच्या शुभ दिनी प्रकाशीत होणार आहे. तो एकंदर २६४ पानाचा असून त्यामध्यें धार्मिक, आध्यात्मिक, चरित्रात्मक, सामाजिक, शैक्षणिक व सांस्कृतिक अशा लेखांचा समावेश झालेला आहे. हे लेख अभ्यासपूर्ण व संशोधनात्मक रीतीने लिहीलेले असल्यामुळें त्याला महत्व प्राप्त झाले आहे.

श्री. एम् पी. पाटील यांनी गेली १०/१५ वर्षे वीरशैव साहित्याची केलेली सेवा, त्या बाबतीत केलेले लिखाण, त्यासंबंधी केलेले संशोधन या सर्व गोष्टी लक्षांत घेतां ते या क्षेत्रांत अधिकार वाणीने बोलणारे वीरशैव साहित्यिक बनलेले आहेत. त्यांच्या प्रभावी व अनुभवसंपन्न लेखणीतून लिखीत झालेला हा लेख संग्रह समाजाला निश्चितच उपयुक्त होईल असा निर्वाळा देण्यास मला कसलाही संकोच वाटत नाहीं.

या लेख संग्रहाने मराठी वीरशैव साहित्य संपन्न होणार आहे. श्री. एम्. पी. पाटील यांची प्रकृती विकलांग झाली असताना केवळ इच्छा शक्तीच्या आणि समाजसेवेच्या तीव्र भक्तीभावाच्या जोरावर हे महत्वपूर्ण वीरशैव साहित्य निर्माण करून समाजाची त्यांनी फार मोठी सेवा केली आहे. त्याबद्दल मी त्यांना धन्यवाद देतो आणि त्यांच्या साहित्य सेवा कार्याला पुरस्कार करण्याची संधी मला मिळाली त्याबद्दल स्वतःला धन्य मानतो.

कोल्हापूर,
दिनांक २७-४-१९७२

रत्नापा कुंभार

# श्री. म. पु. पाटील यांचा अल्पपरिचय

श्री. पाटलांचे संपूर्ण नांव मलगौडा पुनगौडा पाटील. त्यांचा जन्म दि. ४ फेब्रुवारी १९०१ रोजी बेळगांव जिल्ह्यांतील संकेश्वर गांवच्या पाटील घराण्यांत झाला. त्यांचे घराणें घरंदाज वतनदार पाटील घराणें असले तरी घरची परिस्थिती अत्यंत गरीबीची होती. त्यांच्या वडिलांच्या मालकीचे फक्त एक एकरच शेत असून त्याच्यावर त्यांच्या कुटुंबाचा उदरनिर्वाह होणें अशक्यच होते. करितां त्यांनीं आपल्या शेताबरोबर दुसऱ्यांचे एकादे शेत खंडानें लागवडीस घेऊन व दोघेही पतिपत्नी स्वतः शेतांत राबून मिळणाऱ्या उत्पन्नावर आपल्या कुटुंबाचा उदरनिर्वाह चालवीत होते. त्याच्या पत्नीचें नांव गंगाबाई. ह्या दांपत्याला पांच अपत्यें झाली तरी त्यापैकीं तीन अल्पवयांतच मरण पावली व मलगौडा आणि त्याची बहीण भागीरथीबाई अशीं दोनच अपत्ये त्यांना अखेरपर्यंत लाभली.

**शिक्षण**

घरची परिस्थिती अत्यंत गरीबीची असल्यामुळें आपल्या मुलाने शाळेस न जातां होना होईल तों लवकर त्यानें आपणास शेतीच्या कामांत सहाय्य करावे अशी पाटलाच्या वडिलाची इच्छा होती. परंतु घराजवळच शाळा असून तेथें आपले संवगडी दुसरी मुले शाळेस जाताना पाहून मलगौडानें आपणही शाळेस जाणार असा हट्ट धरला. तेव्हां त्याच्या वडिलानीं त्याच्यावरील प्रेमाखातर त्याला शाळेस पाठविले. मलगौडाची मातृभाषा कन्नड असली तरी त्यावेळीं संकेश्वरात फक्त मराठी शाळाच असल्यामुळें त्यानी त्या शाळेत सन १९०७ सालीं प्रवेश

केला. त्या शाळेंत असेपर्यंत तेथील प्रत्येक वर्गांत पहिला नंबर पटकावून एक हुशार विद्यार्थी म्हणून ते नांवाजले. सन १९१२ सालीं सहाव्या इयत्तेत असतांना एका विचित्र घटनेनें त्यांच्या इंग्रजी शिक्षणास सुरवात झाली. मलगौडा शाळेस जात असले तरी सुग्गीच्या हंगामांत व इतर जरूरीच्या वेळीही त्यांचे वडील त्यांची शाळा बुडवून त्यांना शेतावर कामास नेत. वर्षारंभी नवीन वर्ग सुरू झाल्यानंतर तर आरंभीच्या दहा पंधरा दिवसांत त्यांचे वडील त्यांना शाळेस जाऊं न देतां शेतास घेऊन जात. ह्या शिरस्त्याप्रमाणें सहावीचा वर्ग सुरू झाल्यानंतर प्रथमच ते एका दिवशीं शाळेस जाऊन वर्गात शेवटच्या नंबरास बसले होते. त्यावेळीं श्री. अभ्यंकर नांवाचे त्या वर्गांचे मास्तर नवीनच त्या शाळेस बदली होऊन आले होते. ते जात्या हुशार परंतु थोडेसे रागीट व तापट स्वभावाचे होते. त्या दिवशीं वर्गांत आल्याबरोबर त्यांनी मुलांना एक गणीत सांगून त्याचें उत्तर पाटीवर लिहिण्यास सांगितले. नंतर एकेका मुलाच्या पाटीवरील उत्तर पाहून उत्तर चुकले असल्यामुळें त्यांच्या थोबाडींत मारीत पाटलापर्यंत आले. सर्व मुलांची उत्तरे चुकली असल्यामुळे त्यांना राग आला होता. ह्याचेंही उत्तर चुकले असलेच पाहिजे अशा समजुतीनें त्यांनीं रागाच्या भरांत त्यांना प्रथम एक थप्पड लगावून नंतर त्यांच्या पाटीवरील उत्तर पाहिले. परंतु उत्तर बरोबर असलेले पाहून त्यांना फार वाईट वाटले व त्यांची विचारपूस करून आजपर्यंत शाळेस न येण्याचें कारण विचारले. तेव्हां पाटलानी त्यांना खरीखुरी हकीकत सांगितली. तेव्हांपासून त्या मास्तराची पाटलांवर वहाल मर्जी झाली. ते मास्तर घरीं आपल्या मुलांना इंग्रजी शिकवीत असत. पाटलांची प्रखर बुद्धिमत्ता व शिकण्याची कळकळ पाहून ते आपल्या मुलांबरोबर त्यांनाही इंग्रजी शिकवूं लागले. याप्रमाणें मराठी शिक्षणा बरोबर त्यांच्या इंग्रजी शिक्षणासही सुरवात झाली. त्यावेळीं संकेश्वरांत इंग्रजी शाळा नव्हती. परंतु सन १९१३ सालीं ते सातव्या इयत्तेंत शिकत असतांना त्या गांवच्या दोघा पुढाऱ्यांनीं आपल्या मुलांना व इतर मुलांनाही इंग्रजी शिकविण्या करितां कोल्हापुराहून श्री आठवले नांवाच्या एका मास्तरास आणून इंग्रजी शिकविण्याचा वर्ग सुरू केला. ते पुढारी मराठी शाळेचे पच होते व त्या नात्यानें ते पाटलांना एक हुशार विद्यार्थी म्हणून ओळखीत होते. त्यांना पाटलांच्या घरची सर्व परिस्थितीचीही माहिती होती. परंतु गरीबीमुळें असल्या हुशार विद्यार्थ्यांचे आयुष्य व्यर्थ जाऊं नये म्हणून ते पाटलांच्या वडिलास भेटून त्यांना इंग्रजी शाळेस पाठविलेच पाहिजे असा आग्रह धरला. तसेंच त्यावेळीं पाटलांचे वय पंधरा वर्षाच्या खालीच असल्यामुळें त्यांना त्यावेळच्या मुलकी परीक्षेसही बसतां येत नव्हते. ह्या कारणास्तव नाइलाजानें त्यांच्या वडिलांनीं त्यांना इंग्रजी शाळेस जाण्यास परवानगी दिली. तेथें आठ दहा महिन्यांत त्यांनीं इंग्रजीच्या तीन

इयत्तेचें शिक्षण संपविले. तेथें असतांना त्यांची बुद्धिमत्ता पाहून त्या आठवले मास्तराचीही त्यांच्यावर बहाल मर्जी झाली व पुढें शिकावयाचे असल्यास आपण कोल्हापुरास त्याची व्यवस्था करूं असे त्यांनीं त्यांस सांगितले.

**चौदाव्या वर्षीच कर्ज काढून लग्न.**

परंतु इतक्यांत त्यांच्या वडिलांनी त्यांचे लग्न करण्याचे ठरवून लग्नखर्चा करितां कोणाकडून तरी पांचशे रूपये कर्ज काढण्याच्या खटपटीस लागले. त्यावेळीं पाटलांचे वय फक्त चौदा वर्षेच होते. आपणाला अजून शिकावयाचे आहे व अशा लहान वयांत आपणास लग्नाची जरूरी नाहीं व तेंही कर्ज काढून लग्न करू नका असें त्यांनीं आपल्या वडिलांस सांगून त्यांचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु वडील परंपरागत रूढीचे असल्यामुळें त्यांनी त्यांचे कांहीं एक न ऐकतां एका सावकाराकडून आपल्या एक एकर जमीनीच्या तारणावर पांचशे रूपये कर्ज काढून त्यांचे लग्न उरकुन टाकले. वधू नात्यातीलच असून त्यांचें घरही त्याच गांवात होते. तिचे नांव लक्ष्मीबाई. लग्नानंतर ती सासरी राहावयास आली. ह्याच काळांत संकेश्वरातील इंग्रजीचा वर्ग बंद पडून आठवले मास्तर कोल्हापुरास निघून गेले ह्या सर्व घटनामुळें साहजिकच त्यांच्या शिक्षणास खंड पडला व त्यामुळे ते शेतीच्या कामांत आपल्या वडिलास सहाय्य करण्यांत सर्व वेळ घालवू लागले.

**पुढील शिक्षणाकरितां कोल्हापुरास प्रयाण.**

याप्रमाणें त्यांचा सर्व काळ शेतकामांत जाऊ लागला तरी पुढील शिक्षण घेण्याची त्यांची आंतरिक तळमळ निवाली नव्हती. परंतु त्याच्याकरतां कोल्हापूर अथवा बेळगांवास जाणें जरूर होते व ही तर खर्चाची बाब. त्याची व्यवस्था काय? तसेंच त्यांचे वडीलही त्यांच्या पुढील शिक्षणाच्या विरूद्ध होते. अशा प्रतिकूल परिस्थितीत काय करावें अशा विचारांत ते होते. अशा प्रसंगी आपणास आठवले मास्तर कडून कांहींतरी सहाय्य अथवा मार्गदर्शन मिळाल्यास पहावे म्हणून त्यांनी त्यांना पत्र पाठवून आपणास सहाय्य करण्याची विनंति केली. त्यांच्या सुदैवानें, कोल्हापुरास आल्यास आपण कांहींतरी व्यवस्था करू अशा आश्वासनाचे त्यांचे उत्तर आले. तेव्हां त्यांनी आपल्या वडिलाना ही हकीकत कळवून पुढील शिक्षणा करितां आपणास कोल्हापुरास पाठवावे असा आग्रह धरला. अर्थात् त्यांचे वडील त्या गोष्टीला प्रथम कबूल झाले नाहीत. परंतु आपण जाणार म्हणून त्यांनी हट्टच धरला. तेव्हां आपणाकडून खर्चास कांहीं पैसे मागणार नाहीं ह्या अटीवर

त्यांच्या वडिलानी संमति दिली. नंतर पितापुत्र दोघेही कोल्हापुरास चाळीस मैल पायीं चालत जाऊन आठवले मास्तरांना भेटले. त्यावेळीं शाळेतील वर्ग चालू होऊन कांहीं महिने लोटले असल्यामुळें कोणत्याही हायस्कूलांत त्यांचे नांव दाखल करणें शक्य नव्हते. म्हणून आठवले मास्तरानी त्यांना आपल्या घरींच ठेवून घेऊन पांचसहा महिन्यांत इंग्रजी चौथ्या इयत्तेचा अभ्यास करविला व सन १९१५ साली तेथील राजाराम हायस्कूलच्या पांचव्या इयत्तेंत त्यांचे नांव दाखल केले. आठवले मास्तरांच्या खटपटीनें त्यांना हायस्कूलांत नादारी मिळाली व त्यावेळीं तेथे असलेल्या लिंगायत बोर्डिंगातही त्यांना फ्री बोर्डर म्हणून घेण्यांत आले. बाकीच्या किरकोळ खर्चाकरितां त्यांच्या एका हितचिंतकानें थोडेसे सहाय्य केले. पाटील अत्यंत काटकसरीनें खर्च करीत असत. कोल्हापुराहून संकेश्वरास व कोल्हापुरास परत ते पायीच चालत येत जात.

**मातापित्याचे निधन व पुन: शिक्षणांत खंड.**

अशा रीतीनें त्यांनीं आपले शिक्षण चालवून सन १९१८ सालीं मॅट्रिक परिक्षेंत पास होऊन राजाराम कॉलेजांत प्रीव्हियस वर्गांत अभ्यास करीत असतांना दुसरी एक दुर्दैवी घटना घडून त्यांच्या शिक्षणास पुन: अडथळा निर्माण झाला. त्या सालच्या सप्टेंबर महिन्यांत त्यांचे मातापिता दोघेही अकस्मात प्लेगानें आजारी पडून दोघेही पंधरा दिवसाच्या अंतरानें निधन पावले. त्यांच्या निधनामुळें तर पाटलावर आकाशाची कुऱ्हाडच कोसळली. घरची अत्यंत गरीबीची परिस्थिती, व घरांत ते व त्यांची तरूण पत्नी ह्यांच्याशिवाय दुसरे कोणीच न हीं. तशांत त्यांच्या वडिलानी दरसाल चारशे रुपये खंड देण्याच्या करारानें केलेले एक शेत त्यांच्या गळीं पडले. मातापित्यांच्या आकस्मित निधनामुळें ते व त्यांची पत्नी दुःखांत असताना त्यांच्या दुःखावर डागण्या देण्यासारखी दुसरी एक घटना घडली. त्यांच्या आईनें आपल्या एका मैत्रिणीकडून वीस रुपये उसनवार घेतले होते. त्या बाईनें ह्यांच्या दुःखाची पर्वा न करतांच त्यांच्याकडे आपले पैसे मागितले. थोडे दिवस थांबण्यास त्यांनी त्या बाईला विनवले तरी त्यांचे न ऐकतां तिनें त्यांच्या घरातील कांहीं भांडीकुंडीच उचलून घेऊन गेली. पाटलांच्या मनाला ही गोष्ट फारच लागली, परंतु करणार काय ? झालेला अपमान सहन करून त्यांना स्वस्थ बसावे लागले. त्यांनंतर शेताचे काम पहाण्याकरितां दोघेही पतीपत्नी शेतातील झोंपडीत राहावयास गेले व तेथे राहून दोघेही शेतात राबून शेताच्या लागवडीचे काम करू लागले. याप्रमाणें दोन तीन महिने गेल्यानंतर प्रीव्हियस परीक्षा जवळ आल्यामुळें त्यांच्या मनांत विचाराचे काहूर माजले. आपल्या शिक्षणाला शेवटचा रामराम

ठोकून कायम शेती धंद्याला वाहून घ्यावें कीं शिक्षणाकरितां पुनः कोल्हापुरास जावे व तसें केल्यास शेतीची व्यवस्था कोण पाहणार हा विकट प्रश्न त्यांच्यापुढें उभा राहिला. अशा विवंचनेत असताना त्यांनी आपल्या एका शेजारी शेतकरीं मित्राला आपली अडचण सांगून आपण कोल्हापुराहून परत येईपर्यंत आपल्या शेताच्या लागवडीची व्यवस्था पाहण्याची विनंति केली. पाटलावद्दल त्याला सहानुभूति होती म्हणून मित्रत्वाच्या नात्यानें त्यानें ते काम पत्करले. तेव्हां शेतीची सर्व व्यवस्था त्याच्याकडे सोपवून व पत्नीस माहेरी पाठवून ते कोल्हापुरास गेले व रात्रंदिवस अभ्यास करून प्रीव्हियस परीक्षेस वसून त्यांत ते पास झाले.

### कूळनात्याचा कटू अनुभव

परीक्षेनंतर आपल्या गांवास परत येऊन त्यांनीं शेतीचा सर्व माल व बैल वगैरे विकून शेतीचा कारभार गुंडाळला. त्यांत सर्व खर्च वजा जातां फक्त दोनशेंच रुपये राहिले. अशा रीतीने आपली सर्व परिस्थिती शोचनीय झाली असल्यामुळें हे दोनशें रुपये घेऊन आपणांस शेतीच्या करारातून मुक्त करावे अशी विनंति त्यांनी शेताच्या मालकास केली. हा मालक दुसरा तिसरा कोणी नसून त्यांचा जवळचा भाऊबंद व आईच्या वडील बहिणीचाच मुलगा होता. तो एवढा जवळचा आप्त असला तरी त्यानें त्यांच्या परिस्थितीचा विलकूल विचार न करतां खंडाचे चारशे रुपयापैकीं एक पैही मी सोडणार नाहीं असें निक्षून सांगितले. गांवातील कांहीं पुढाऱ्यानीही त्याला भीड घातली. परंतु त्यानें कोणाचेंही ऐकले नाहीं. तेव्हां आणखी दोनशें रुपये मिळविण्याचा बिकट प्रश्न त्यांच्यापुढें उभा राहिला. कोणाकडून कर्जही मिळणें शक्य नव्हते. त्यांचे सासरेही गरीब असून त्यांनाही कर्ज झाले होते व त्यामुळें त्यांच्याकडूनही कांहीं सहाय्य मिळण्यासारखे नव्हते. आतां काय करावे अशा विवंचनेत ते असताना त्यांच्या पत्नींनें आपल्या अंगावरील दागिने विकून हें कर्ज फेडावे असे त्यांना सांगितले. गरीबांच्या बायकांच्या अंगावर दागिने ते काय असणार ? ते सर्व विकले तरी जेमतेम दोनशेंच रुपये मिळणार होते. परंतु दुसरा उपायच नसल्यामुळें त्यांनीं त्या माऊलीचे सर्व दागिने विकून त्या निर्दय जमीन मालकाचे खंडाचे रुपये देऊन टाकले. संकट समयी गरीबांचा वाली कोणीच नाहीं हीच गोष्ट खरी !

### पदवी शिक्षण

यानंतर ते आपल्या सासऱ्याच्या घरींच राहून पुढील शिक्षणास पुनः प्रारंभ

केला. सन १९२० सालीं राजाराम कॉलेजातून इंटरमीजिएट परीक्षा पास होऊन पुढील शिक्षणाकरतां त्यांनी पुण्यातील फर्ग्युसन कॉलेजांत प्रवेश केला. सुदैवानें त्याचवर्षी कै. शिरसंगीकर सरदेसाई ट्रस्ट फडातून त्यांना स्कालरशिप मिळू लागली व त्यांचे भाऊबंद खातेदार पाटलानींही त्यांना थोडीबहुत मदत केली. तेवढ्यावर आपला सारा खर्च भागवून ते सन १९२२ सालीं बी. ए. परिक्षेत पास झाले व नंतर मुंबईस जाऊन तेथून लॉ कॉलेजमधून सन १९२४ साली एल. एल बी. परिक्षेंत उत्तीर्ण झाले यप्रमाणें अनेक संकटाना तोंड देऊन व जिद्दीनें आपलें शिक्षण चालवून त्यांनी आपल्या वयाच्या चोवीसाव्या वर्षी शिक्षणाचे आपलें ध्येय गांठले.

वकीली व सार्वजनिक कार्य.

त्यानंतर ते आपल्या तालुक्याचे तालुका स्थळ हुक्केरी येथें स्थायिक होऊन वकीलीस प्रारंभ केला. सुदैवानें आरंभापासूनच त्यांच्या वकीली धंद्याचा जम चांगला बसला. थोडयाच काळांत आपल्या कमाईनें सन १९१४ सालीं त्यांच्या वडिलानीं त्यांच्या लग्नाकरितां काढलेले पांचशे रुपयाचे कर्ज फेडून त्यांनी आपली जमीन सोडवून घेतली. तसेंच आपल्या सासऱ्यांचेही कर्ज फेडून त्यांच्या घराण्याची सर्व जबाबदारीही त्यांनी पत्करली. याप्रमाणें वकीली धंद्यात समाधानकारक प्राप्ती होऊन त्यांचा प्रपंच नीटनेटका चालला तरी आपल्या गरीब रयत बांधवाची कांहीं तरी सेवा करण्याची त्यांची आंतरिक तळमळ त्यांना पैसे मिळविण्यांतच गर्क होऊं दिले नाहीं. विद्यार्थीदशेंतच त्यांना सहकारी चळवळीचा थोडासा अनुभव आला होता व गरीब शेतकऱ्यांच्या उद्धारास सहकारी चळवळ हाच एकमेव उपाय आहे ह्याची त्यांना खात्री झाली होती. करितां त्यांनीं फावल्यावेळेंत तालुक्यातील गांवोगांवी संचार करून अस्तित्वात असलेले सहकारी संघ सुधारले व आठदहा नवीन संघाचं ही स्थापना केली. अशा संघांत हरिजन मजदूरांचा सहकारी संघ व हरिजनांची स्वतंत्र सहकारी पतपेढी हे उल्लेखनीय आहेत. ह्या लोकांना पत (credit) नसल्यामुळें त्यावेळी साऱ्या मुंबई इलाख्यांत अशा लोकांचे सहकारी संघ स्थापन झाले नव्हते. परंतु पाटलांनीं हे संघ स्थापन करून त्यावेळच्या सहकारी क्षेत्रांत एक अभिनव उपक्रम सुरू केला. याच्यावरून गरीब शेतकऱ्याप्रमाणें हरिजन, मजूर वगैरे गरीब लोकांविषयी त्यांना किती कळकळ वाटत होती याची कल्पना येते सहकारी क्षेत्रांतील त्यांचे हें कार्य पाहून सरकारनें त्यांची जिल्हा आर्गनायझर म्हणून नेमणूक केली व मुंबईत भरणाऱ्या सहकारी ट्रेनिंग क्लासला त्यांचीं निवड केली. तेथे त्यांना सुप्रसिद्ध सहकार महर्षि दि. वैकुंठभाई

मेहता यांची ओळख झाली व मंत्री झाल्यावर ह्या ओळखीचे दाट मैत्रींत रूपांतर झाले. याप्रमाणें त्यांनीं आपल्या तालुक्यात सार्वजनिक कार्य केल्यामुळे ते फारच लोकप्रिय झाले व त्यावेळचे तालुका लोकल बोर्ड व जिल्हा लोकल बोर्ड यासारख्या स्थानिक संस्थावरही त्यांची बिनविरोध निवड झाली. तसेंच त्यावेळीं वीरशैव समाजाच्या कांही नेत्यानीं इंडियन टेरिटोरियल फोर्समध्यें आपल्या समाजाचो एक फलटण उभारावी म्हणून प्रयत्न करूं लागले. पाटलांनीं पुढाकार घेऊन त्यांत आपलें स्वतःचेंच नांव दाखल केले. तेथें ते लेफ्टनंटच्या हुद्यावर होते. तेथेंही मार्कर म्हणून त्यांनीं आपले नांव कमावले.

### कॉंग्रेस प्रवेश व स्वातंत्र्य लढयाच्या काळांतील कार्य

याप्रमाणें त्यांचे खासगी व सार्वजनिक जीवन चालले असतांना महात्मा गांधीजीनी सन १९३० सालीं प्रारंभिलेल्या सत्याग्रह चळवळीमुळें त्यांच्या जीवनात नवीनच स्थित्यंतर घडून आले. त्यांच्दा विद्यार्थी दशेंतच महात्माजीच्या चरित्राचा व त्यांच्या शिकवणुकीचा त्यांच्या मनावर विलक्षण परिणाम झालेला होता व जनसेवा करण्याच्या त्यांच्या इच्छेचे बीजारोपण त्याचकाळीं झाले होते. व त्याप्रमाणें ते सार्वजनिक कार्य करीत होते. परंतु आपला देश स्वतंत्र झाल्याशिवाय खरी व भरीव जनसेवा करतां येणार नाहीं याचीही जाणीव त्यांना होती. म्हणून ह्या स्वातंत्र्य लढा सुरू झाल्यानंतर त्यांचे मन त्याच्याकडे ओढूं लागले. तथापि ह्या स्वातंत्र्य लढयांत भाग घेण्यासारखी त्यांच्या कुटुंबाची परिस्थिती नव्हती. वकीली चांगली चालली असली तरी तालुक्याच्या ठिकाणीं त्यांत कितीशी प्राप्ती होणार? मिळणाऱ्या प्राप्तीतून कर्ज फेडून दोन्ही कुटुंबाचा खर्च मात्र चालत होता व शिलकेंत विशेष कांहीं नव्हते तसेंच त्यांना त्यावेळेपर्यंत तीन अपत्येंही झाली होती. सत्याग्रहांत भाग घेतल्यास तुरूंगवास भोगावा लागून वकीली बंद पडली तर आपल्या कुटुंबाच्या उदरनिर्वाहाचें साधन काय हा बिकट प्रश्न त्यांच्यापुढें उभा राहिला. परंतु कुटुंबसेवेपेक्षां देशसेवा श्रेष्ठ आहे व प्रसंग विशेषीं त्याच्याकरितां आपल्या सर्वस्वाची होळीं करण्यासही आपण तयार राहिले पाहिजे या उच्च विचारानें प्रेरित होऊन त्यांनी सत्याग्रहांत भाग घेण्याचा निर्धार केला. परंतु आपणास बंदीवास घडल्यास खरी शिक्षा आपल्या कुटुंबासच होणार, करितां या बाबतींत आपल्या पत्नीच्या सल्ल्याशिवाय कांहीं करणें योग्य होणार नाहीं हें जाणून त्यांनी तिच्यापुढें खुल्यादिलानें आपल्या मनःस्थितीचा पाढा वाचला व कौटुंबिक अडचणीमुळें सत्याग्रहांत भाग घेण्याच्या आपल्या कर्तव्यापासून परावृत होऊन राहिल्यास आपल्या मनास शांति लाभणार नाहीं हेही तिला सांगितले. तेव्हां त्या

माऊलीनें 'सांप्रतच्या आपल्या कौटुंबिक परिस्थितींत आपण सत्याग्रह चळवळींत भाग घ्यावा असें मला वाटत नाहीं. परंतु तसें न केल्यास आपल्या मनाला शांति मिळणार नसेल तर मी आपणास रोखून तरी काय उपयोग? गरीवी व संकटें ही कांहीं आपणास नवीन नाहींत. त्यांतूनच आम्ही आजपर्यंत मार्ग काढीत आलों आहोत आणि या पुढेंहीं अशाच परिस्थितींत आम्ही जीवन कंठावे अशी ईश्वरेच्छा असेल तर त्यालाही माझी तयारी आहे' असें सांगितले. तेव्हां मनाचा निश्चय करून ते सत्याग्रह चळवळींत भाग घेऊं लागले. ह्या पहिल्या सत्याग्रहाच्या काळांत त्यांना फक्त एक महिन्याची शिक्षा झाली व गांधी आयर्विन तहाप्रमाणें सत्याग्रह चळवळ तहकूब केल्यानंतर ते काँग्रेसचे कार्य करीतच राहिले

**कर्नाटक प्रांतिक राजकीय परिषद व १९३२ सालचा स्वातंत्र्याचा लढा.**

त्यानंतरच्या काळांत सन १९३१ साली कर्नाटकच्या राजकीय पुढाऱ्यांनी कर्नाटक प्रांतिक राजकीय परिषद हुक्केरीस भरविण्याचें ठरवून त्याच्या स्वागताध्यक्षपदीं पाटलांची नेमणूक करून परिषदेची सर्व जवाबदारी त्यांच्यावर टाकली. ह्या परिषदेचे अध्यक्षस्थान स्व. शेट जमनालाल बजाज यांनीं मंडित केले होते. पाटलांनीं व त्यांच्या स्नेह्यांनी ही परिषद अत्यंत यशस्वी रीतीनें पार पाडली. त्यामुळें साऱ्या कर्नाटकांत त्यांचे नांव गाजून काँग्रेसच्या नवीन जोमाच्या तरूण पुढाऱ्यांत त्यांची गणना होऊं लागली व अखिल भारत कांग्रेस कमिटीवरही त्यांची निवड झाली. नंतर १९३२ च्या प्रारंभीं पुन: स्वातंत्र्य लढ्यास प्रारंभ झाल्यामुळें ते भूमिगत होऊन आपल्या भागांत ह्या लढ्याची सघटना करूं लागले. परंतु थोड्याच काळांत ते पकडले जाऊन त्यांच्यावरील दोन खटल्यांत त्यांना एकंदर तीन वर्षे दहा महिन्याची शिक्षा झाली.

**कलेक्टरचा हास्यास्पद हुकूम.**

ह्यावेळीं दुसरी एक हास्यकारक घटना घडली. पाटलांना शिक्षा झाल्यामुळें व ते वतनदार पाटील असल्यामुळें त्यांचे वतन खालसा करावे म्हणून बेळगांव कलेक्टरनें आपल्या अधिकाऱ्यांस हुकूम दिला. तेव्हां पाटलांची वतनी जमीन नोकरी इनाम असल्यामुळें ती जप्त करतां येत नाहीं, परंतु पाटलांना कोणत्याही पाटीलकीच्या नेमणुकीस नालायख ठरवितां येईल असा त्यांनीं रिपोर्ट केला तेव्हां कलेक्टरनें पाटलांना कोणत्याही गांवी पाटीलकीच्या कामावर नेमूं नये असा हुकूम काढला. हा हास्यास्पद हुकूम सांप्रतही सरकार दप्तरी पडून आहे.

**बंदीवासातील जीवन व स्व. महादेवभाई देसाईंचा सहवास.**

ह्यावेळच्या दीर्घकाळाचा हा बंदीवास त्यांना व्यक्तीश: एका दृष्टीनें उपयुक्त

व लाभदायक ठरला. त्यावेळीं हिंडलगा ( बेळगांव ) तुरूंगांत कर्नाटकचे बहुतेक सर्व पुढारी होते त्यामुळे त्यांना त्यांचा निकट सहवास घडला. तसेंच तेथें श्री. दिवाकर यांच्याबरोबर त्यांनी शिवशरणांच्या वचन शास्त्राचेही अध्ययन केले. बंदीवासाच्या ह्या काळांतच श्री. दिवाकरांनी आपला 'वचन शास्त्ररहस्य' हा वचन शास्त्रावरील अधिकृत ग्रंथ लिहिला. कांहीं काळानंतर महात्माजीनी ब्रिटिश सरकारच्या जातीयनिवाड्याविरुद्ध उपोषण सुरू केल्यानंतर सरकारनें त्यांची सुटका करून त्यांचे आप्तकार्यदर्शी स्व. महादेवभाई देसाई यांची हिंडलगा तुरूंगास् रवानगी केली. तेथें त्यांना तेथील इतर राजकीय कैद्याबरोबर मिसळून ठेवूं नय म्हणून सरकारचा हुकूम असल्यामुळें तेथील जेल सुपरिंटेंडेंटने त्यांना एका लहानशा वार्डात निराळे ठेवून त्यांना सोबत म्हणून (companion) पाटलांना त्या वार्डात राहण्यास पाठविले. अशा प्रकारे स्व. महादेवभाई सारख्या नामांकित पुढाऱ्याच्या सहवासांत राहण्याची संधि मिळाल्यामुळें साहजिकच पाटलांना फार आनंद झाला व ह्या संधीचा त्यांनीं पुरेपूर फायदा उठविला. महादेवभाईची व त्यांची चांगली गट्टी जमली व महादेव भाईनीं अत्यंत मोकळ्या मनानें त्यांना भारतीय राजकारणाचे धागेदोरे, निरनिराळे विचार प्रवाह व अंतरंगातील अनेक गोष्टी सांगितल्या. महादेव भाईना महात्माजीची व सरदार वल्लभभाईची पत्रें येत व ती ही ते त्यांना वाचून दाखवीत. तेथें ते दोघेही भगवद्गीतेचे पारायण करीत व कांहीं वेळा धार्मिक विषयावर चर्चा करीत. अशा एका प्रसंगी पाटलांनी त्यांना श्री बसवेश्वरांच्या वचनांची कांहीं माहिती सांगितली. ते ऐकून महादेव भाईना फार आनंद झाला व पाटलांकडून त्यांच्या कांहीं वचनांचे इंग्लिश भाषांतर करवून घेऊन ती महात्माजीना आवडतील म्हणून त्यांनीं तीं आपल्या पत्रासोवत त्यांच्याकडे पाठविली. तेव्हां 'बसवेश्वरांच्या वचनांची मला माहिती आहे. ती उद्बोधक आहेत. कांहीं काळामागें कर्नाटकच्या एका गृहस्थानें आमच्याकडे येऊन त्याबद्दल माहिती दिली होती व त्यावेळीं तुम्ही हजर होतां. असें असून तुम्ही हें कसे विसरला ?' अशा मजकूराचे महात्माजीचे पत्र त्यांना आले. महादेव भाईनीं पाटलांस ते पत्र वाचून दाखवून 'ह्या म्हाताऱ्याची स्मरणशक्ति पाहा !' असें आश्चर्ययुक्त उद्गार काढले.

कांही काळानंतर महादेव भाईची सुटका झाली व त्यावेळीं 'बी' क्लासचे सर्व राजकीय कैदी सुटून गेले असल्यामुळे पाटील एकटेच राहिले. परंतु थोड्याच काळांत महाराष्ट्राचे त्यावेळचे एक तरूण, उत्साही नेते स्व. श्री रावसाहेब पटवर्धन यांना तेथें आणण्यांत आले व त्यामुळें पाटलांना त्यांच्या सहवासाचाही लाभ

मिळाला. त्यांच्याकडून त्यांना महाराष्ट्रातील राजकारणाची व तेथील राजकीय कार्यकर्त्यांची सविस्तर माहिती मिळाली. कांहीं काळानंतर त्यांची शिक्षा समाप्त होऊन ह्या दीर्घकाळाच्या बंदीवासातून सन १९३४ च्या अखेरीस त्यांची सुटका झाली.

### ह्याकाळांतील त्यांच्या कुटुंबाची हलाखीची परिस्थिती व श्रीमती पाटलांची स्वाभिमानयुक्त वर्तणूक.

याप्रमाणें दीर्घकाळाचा हा बंदीवास श्री पाटलांना त्यांच्या भावी सार्वजनिक आयुष्याच्या दृष्टीनें उपयुक्त व लाभदायक झाला तरी त्या काळांत त्यांच्या कुटुंबाचे फारच हाल झाले. दीर्घकाळाची शिक्षा अनपेक्षित असल्यामुळें त्यांनी कुटुंबाच्या खर्चाची कांही व्यवस्था केली नव्हती व त्या परिस्थितींत करणेंही शक्य नव्हते. श्रीमती पाटलांनी घरांतील थोडयाशा शिलकेवर व आपल्या अंगावरील कांहीं दागिने विकून कसेबसे एक वर्ष घालविले. परंतु नंतर खर्चाची अडचण भासू लागली. पाटलांना बंदीवास घडल्यानंतर त्यांच्या कांहीं मित्रांनी त्यांच्या कुटुंबास सहाय्य करण्याच्या उद्देशानें त्यासंबंधी श्रीमती पाटलाकडे विचारपूस केली. परंतु त्यांनी त्यांना खरी हकीकत न सांगतां खर्चाची सर्व व्यवस्था आहे, करितां तुम्ही कांहीं काळजी करू नका असेंच त्यांना सांगितले. परंतु घरची खरी परिस्थिती श्रीमती पाटलांना घरच्या कामांत मदत करीत असलेल्या एका मुलाला माहीत होती. त्या मुलाला पाटलानीच आपण स्थापिलेल्या एका सहकारी संघाचा सेक्रेटरी म्हणून नेमले होते. त्यामुळें तो मुलगा पाटील दांपत्याला आपल्या मातापित्यासारखें मानीत होता. पाटलांना शिक्षा झाल्यावर तो श्रीमतीना घरच्या व्यवस्थेंत मदत करीत होता. त्याला तेथें दरमहा वीस रुपये पगार होता. त्याच्या घरची परिस्थिती बरी असल्याकारणानें तो आपला पगार संघातच शिल्लक ठेवीत होता. श्रीमती पाटलांची खर्चाची अडचण पाहून आपला पगार घरच्या खर्चास घ्यावे म्हणून त्याने श्रीमतीना विनंति केली. त्याच्याकडूनही पैसे घेण्याची त्यांची इच्छा नव्हती. परंतु त्यानें फारच आग्रह केल्यामुळें व दुसरा उपायच नसल्यामुळें त्याचे पैसे कर्ज म्हणून घेण्याच्या अटीवर त्याला कबूली दिली व अत्यंत काटकसरीनें वागून त्याच्या पगारावर घरचा खर्च शेवटपर्यंत चालविला. त्यांनी कोणाकडून ही मदत घेतली नाहीं, एवढेंच नव्हे तर आपल्या घरची परिस्थिती कोणालाही कळवूं नये म्हणून त्यांनी त्या मुलाला ताकीद दिली होती. त्यामुळें अखेरपर्यंत त्या एका मुलाशिवाय दुसऱ्या कोणालाही त्यांच्या घरची हलाखीची परिस्थिती माहीत झाली नाहीं. श्रीमती पाटील पाटलाच्या भेटीस गेल्यावेळीं ते त्यांना घरच्या

खर्चासंबंधीं विचारीत. तेव्हां सर्व व्यवस्था आहे, तुम्ही कांही काळजी करू नका असेच ते त्यांना सांगत. तेव्हां आपले मित्रच त्यांना मदत करीत असले पाहिजेत अशीच त्यांची समजूत झाली. परंतु तुरुंग–भेटींत याचा खुलासा विचारणें धोक्याचें असल्यामुळें त्यांनी त्याचा खुलासा विचारला नाहीं व शेवटपर्यंत त्यांची हीच समजूत कायम राहिली. परंतु बंदीवासातून सुटका होऊन घरीं आल्यानंतर त्यांना ही हकीकत कळली व आपल्या मित्रांनीं देऊं केलेली मदत कां घेतला नाहीं असें त्यांनी आपल्या पत्नीस विचारले. तेव्हां त्या माऊलीनें 'येईल त्या संकटास तोंड द्यावयाचें, परंतु दुसऱ्यांच्या मदतीनें आपला प्रपंच चालवून आपल्या घराण्याची प्रतिष्ठा कमी करावयाचे नाहीं असा माझा दृढ निश्चय होता, म्हणून मी कोणाची मदत घेतली नाहीं' असें स्वाभिमानाचे उत्तर दिले. त्यांचे हे स्वाभिमानाचे उद्‌गार ऐकून पाटील आश्चर्यचकित झाले व असली स्वाभिमानी व दृढनिश्चयी सती आपणांस लाभल्याबद्दल धन्यता वाटून तिच्याबद्दलचा त्यांचा आदरभाव द्विगुणित झाला. नंतर ही गोष्ट पाटलांच्या स्नेह्यांना व इतरानाही कळली व त्या सर्वांचा श्रीमती पाटलाबद्दलचा आदरभाव वाढला.

**मुंबई विधान सभेचा सभासद म्हणून निवडणूक व कॉंग्रेस मंत्रीमंडळात पार्लमेंटरी सेक्रेटरी पदावर नेमणूक.**

त्यानंतर त्यांनी पुनः वकीलीस प्रारंभ करून त्या मुलाचें कर्ज फेडले व आपल्या प्रपंच्याचा जम बसविला. तालुक्याच्या स्थळीं वकीलीत विशेष प्राप्ती होत नसल्यामुळें व साऱ्यां बेळगांव जिल्ह्यांत त्यांचे नांव झाले असल्यामुळें ते बेळगांवास राहावयास गेले व तेथें वकीली सुरू केली. परंतु तेथेंही ते कांग्रेस कार्य करीतच राहिले. तेथें वकीलीचा जम बसतो न बसतो इतक्यांत सन १९३६ सालच्या ऐतिहासिक सार्वत्रिक निवडणुकांस सुरवात झाली व कांग्रेसनें ती निवडणूक लढविण्याचें ठरविले. आपल्या आर्थिक अडचणीमुळें त्या निवडणूकीस उभे राहण्याची त्यांची मुळींच इच्छा नव्हती. परंतु त्यांच्यासारखे कळकळीचे व लोकप्रिय कांग्रेस कार्यकर्ते निवडणूकीस राहिल्याशिवाय कांग्रेसला भरघोंस यश मिळणार नाहीं हें जाणून त्यांना आग्रहानें निवडणुकीस उभे करण्यांत आले व त्यांत ते निवडून आले. त्यानतरच्या काळांत स्थापन झालेल्या मुंबई प्रांताच्या कांग्रेस मंत्रींमडळांत त्यांना पार्लमेंटरी सेक्रेटरीच्या हुद्यावर नेमण्यांत आले. त्या मंत्रीमडळाचे मुख्यमंत्री दि. खेरसाहेबानीं पाटलांचा शेतीचा अनुभव व सहकारी क्षेत्रांतील त्यांचे कार्य लक्षांत घेऊन त्या खात्याचे मत्री माननीय श्री. मुरारजीं देसाई यांचे पार्लमेंटरी सेक्रेटरी म्हणून त्यांची नेमणूक केली. ह्या मंत्रीमंडळाचे एक उल्लेखनीय कार्य म्हणजे

त्यावेळीं त्यानें मंजूर केलेला कूळकायदा. जमीन मालक गरीब व असहाय कुळांना कसें नागवतात याचा कटु अनुभव खुद्द पाटलांना असल्यामुळें त्या कायद्याचा मसुदा तयार करण्यांत व तो विधीमंडळांत मंजूर करून घेण्यांत त्यांनी मुरारजीभाईना अत्यंत उत्साहानें सहाय्य केले. तसेंच ह्या हुद्यावर असतांना त्यांनी शेतकी, सहकारी व जंगल खात्यांचीही चांगली माहिती करून घेतली.

**पुन: कांग्रेस कार्य व स्वातंत्र्याचा लढा.**

सन १९३९ सालीं कांग्रेस मंत्रीमंडळानें राजीनामा दिल्यानंतर ते परत बेळगांवास राहण्यास आले. परंतु ह्यावेळीं त्यांनी पुन: वकीली धंद्यास प्रारंभ न करतां त्याला कायमचा रामराम ठोकून ते सतत कांग्रेसचे कार्य करीत राहिले. सन १९४० सालच्या वैयक्तिक सत्याग्रहांत त्यांनी भाग घेतला व त्यांत त्यांना एक वर्षाची सजा झाली. त्यानंतर सन १९४२ सालचा ऐतिहासिक स्वातंत्र्य लढा सुरू झाल्याबरोबर त्यांना डेटिन्यू म्हणून पकडून नाशिक तुरूंगांत ठेवण्यांत आले. तेथें मुंबई प्रांताच्या सर्व भागांतील प्रमुख कांग्रेस कार्यकर्त्यांना डेटिन्यू म्हणून ठेवले असल्यामुळें त्या सर्वांच्या ओळखी होऊन त्यांच्या सहवासाचा लाभही त्यांना मिळाला. तेथून सन १९४४ साली त्यांची सुटका झाली. तेव्हां बेळगांवास परत येऊन त्यांनी पुन: कांग्रेस कार्यास प्रारंभ केला.

**कर्नाटक प्रांतिक कांग्रेस कमीटीच्या अध्यक्षपदावर निवडणूक व सन १९४६ सालच्या सार्वत्रिक निवडणुकीतील कार्य.**

यावेळीं साऱ्या कर्नाटकभर त्यांची कीर्ति पसरली असल्यामुळें व नवउत्साहाच्या तरुण कांग्रेस कार्यकर्त्यांचा त्यांच्या नेतृत्वावर नितांत विश्वास असल्यामुळें कर्नाटक प्रांतिक कांग्रेस कमीटीच्या अध्यक्षपदीं त्यांची एकमतानें निवड झाली. ह्या पदावर असताना त्यांनी सर्व कर्नाटकभर दौरा काढून त्या प्रांतातील कांग्रेस संघटना बळकट केली. त्यानंतर सन १९४६ सालच्या सार्वत्रिक निवडणुकीचेवेळीं ते स्वत: कर्नाटक प्रांतिक कांग्रेस कमीटीचे अध्यक्ष असल्यामुळें साऱ्या प्रांतातून तरूण, होतकरु व स्वार्थत्यागी कांग्रेस कार्यकर्त्यांना निवडणुकीस उभे करून व साऱ्या प्रांतात आपण स्वत: दौरा काढून कांग्रेसचे सर्व उमेदवार बहुमतानें निवडून येतील अशी व्यवस्था केली व परिणामत: कांग्रेसचे सर्व उमेदवार त्या निवडणुकीत निवडून आले.

ह्या काळांत त्यांच्या मेहुण्यानां ( श्रीमती पाटलांचे सख्खे भाऊ ) सरकारी नोकरी मिळाली असल्यामुळें व ते सर्व पूर्वीपासूनच एकत्र राहात असल्यामुळें त्यांनी कुटुंबाचा सर्व भार उचलला होता व त्यामुळें ह्या काळांत पाटलाना आपल्या कुटुंब पोषणाबद्दल विशेष त्रास झाला नाहीं. परंतु त्यांची गरीब परिस्थिती होती तशींच राहिली.

## मंत्रीपदावर नेमणूक

निवडणुकीनंतर दि. खेरसाहेबांच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेल्या मुंबई प्रांताच्या कॉंग्रेस मंत्रीमंडळांत मंत्री म्हणून त्यांचा समावेश केला गेला व त्यांच्याकडे शेतकी व जंगल खाती सोंपविण्यांत आली. शेती तर त्यांचा जिव्हाळ्याचा विषय व त्याचा त्यांना भरपूर अनुभवही होता. त्यामुळें अधिकार स्वीकार केल्याबरोबर त्यांनी त्या खात्याच्या सुधारणेस सुरवात केली. त्यावेळीं शेतकी खात्याला महत्व नव्हते. परंतु अन्नधान्याच्या टंचाईमुळें कॉंग्रेस सरकारनें 'अधिक धान्य पिकवा' मोहीम सुरू केली व त्याच्या अंमल बजावणीवर विशेष भर दिला. साहजिकच हा कार्यक्रम यशस्वी रीतीनें अंमलात आणण्याची जबाबदारी पाटलावर पडली. परंतु त्यावेळीं हा कार्यक्रम अंमलात आणणें म्हणजे 'संन्याशाच्या लग्नाला शेंडीपासून तयारी' करण्यासारखेंच होते. खाते लहान व त्यांतही अनुभविक व कर्तबगार अधिकाऱ्यांची उणीव. शेतकीचे पदवीधर व कामगार (fieldmen) ह्यांची संख्याही फारच कमी. त्याकरितां त्यांनीं प्रथम शेती शिक्षणाच्या कार्यक्रमाकडे लक्ष देऊन त्याची समाधानकारक व्यवस्था केली. त्यावेळीं साऱ्या प्रांताकरितां पुण्यास एकच शेतकी कॉलेज होते. त्याची वाढ करून तेथें जास्ती विद्यार्थ्यांना शिकविण्याची व्यवस्था केली. परंतु जास्ती पदवीधरांची आवश्यकता असल्याकारणानें व गुजराथ आणि कर्नाटक भागातही अशा कालेजांची जरूरी होती म्हणून त्यांनीं गुजराथेंत आनंद येथें व कर्नाटकांत धारवाड येथें दोन नवीन कृषी महाविद्यालये स्थापिली. तसेंच शेती सुधारणेस पदवीधरापेक्षां प्रत्यक्ष शेतकऱ्यांशीं संबंध येणाऱ्या शेतकी कामगारांची फारच आवश्यकता आहे हें जाणून असे कामगार ( fieldmen ) तयार करण्याकरितां प्रांताच्या प्रत्येक जिल्ह्यांत एकेक शेतकी शाळा स्थापण्याचा कार्यक्रम त्यांनी आंखला. हा त्यांचा कार्यक्रम शेतकी शिक्षणाच्या बाबतींत एक अभिनव व आदर्श उपक्रम होता. ह्या शाळा त्यांनी 'स्वावलंबी शिक्षण' (Earning while Learning) ह्या तत्वाच्या आधारावर स्थापल्या. त्या शाळांतील विद्यार्थ्यांनीं दररोज शाळेच्या शेतावर (farm) चार पांच तास काम करावे व शिक्षकांनीही त्यांच्याबरोबरच काम करतांना त्यांना शेतीची व त्यामधील

नवीन सुधारणांची माहिती द्यावी असा हा शिक्षण क्रम होता. विद्यार्थ्यांना त्यांनी केलेल्या कामाबद्दल दरमहा चोवीस रुपये स्कालरशिप दिली जाई व ह्या रकमेतून विद्यार्थ्यांचा सर्व खर्च भागत असे. विद्यार्थ्यांच्या राहण्याची व जेवणाची सोयही शाळेच्या आवारांतच केली होती. शेतावरील सर्व कामे व जनावरांची जोपासना वगैरे सर्व कामें विद्यार्थीच करत. त्याच्याकरितां निराळी गडीमाणसे नेमलेली नव्हती. एवढेच नव्हे तर विद्यार्थी आपलें जेवणही आपणच सामूहिक रीतीनें पाळीपाळीनें तयार करीत व त्याच्याकरितां पगारी आचारी नेमला जात नव्हता. तसेंच शाळेचे शेत ( farm )शेतकऱ्यांना आदर्श शेत म्हणून दाखवावयाचे असेल व सुधारलेल्या शेती योजनेनें जास्ती उत्पन्न काढतां येते हे त्यांना पटवून द्यावयाचें असेल तर शाळेच्या शेतांतून शेतकऱ्यांच्या शेतापेक्षा जास्ती उत्पन्न (खर्च वजा जाऊन) निघालेंच पाहिजे असा त्यांनीं त्या शाळांना दंडक घालून दिला होता. त्यामुळें अशा शाळेच्या खर्चाचा बहुभागही ह्या उत्पन्नातून भागून सरकारवर त्यांच्या खर्चाचा विशेष भार पडत नव्हता. अशा पद्धतीनें चालविलेल्या दहावारा शेतकी शाळा त्यांनीं आपल्या कारकीर्दीत निरनिराळ्या जिल्ह्यांत स्थापल्या. शेतकी शिक्षणाच्या ह्या स्वावलंबी उपक्रमामुळें ह्या शाळा फारच लोकप्रिय झाल्या व बहुतेक सर्व शेतकी तज्ञांनी व शिक्षण तज्ञांनी त्यांची मुक्तकंठाने प्रशंसा केली. ह्या शाळांतून हजारों गरीब विद्यार्थी सुधारलेल्या शेतीचें व्यवहारिक शिक्षण घेऊन बाहेर पडले व त्यांच्यामुळें प्रांतातील शेतीसुधारणेस फारच मदत झाली. याशिवाय लहान पाटबंधारे, व लिफ्टइरिगेशन (Lift Irrigation) कंपोस्ट खत तयार करणें, दुष्काळी भागांतील कोरडवाहू जमीनीची बांधबंदिस्ति (bunding) सुधारलेल्या बी बियाणांचा वापर वगैरे अनेक उपयुक्त योजना अंमलात आणून त्यांनी प्रांतातील शेतीत गणनीय प्रगति केली. तसेंच सर्व प्रांतभर दौरा काढून व शेतकऱ्यांच्या सभा भरवून त्यांच्यांत जागृति निर्माण केली. याशिवाय शेतीच्या सर्वांगीण उन्नतीस जंगलवाढ आवश्यक आहे हें जाणून त्यांनीं सन १९४७–४८ साली 'वृक्षारोपण' मोहिमेची योजना आंखून ती साऱ्या प्रांतांत अंमलात आणली मुंबई प्रांतातील हा कार्यक्रम पाहूनच त्यावेळचे केंद्रीय शेतकी मंत्री दि. मुनशीनीं पुढच्या वर्षी 'वनमहोत्सव' नांवानें हा कार्यक्रम साऱ्या भारतांत प्रचारांत आणला.

**सहकारमंत्री नात्यानें सहकारी क्षेत्रांतील कार्य.**

त्यानंतर सन १९५१ सालच्या सार्वत्रिक निवडणुकींतही ते निवडून येऊन माननीय श्री. मुरारजी देसाई यांच्या नेतृत्वाखाली स्थापन झालेल्या मंत्रीमंडळांत त्यांचा समावेश झाला व त्यांच्याकडे सहकार व स्थानिक संस्था हीं खाती

सोंपविण्यात आली. सन १९५४ सालीं भारतातील सहकार चळवळीला पन्नास वर्षे भरत असल्यामुळें त्यावेळीं साऱ्या भारतांत त्याचा सुवर्ण महोत्सव आचरण्याचा कार्यक्रम आंखण्यांत आला. त्यावेळीं त्यांनीं साऱ्या प्रांतात ह्या कार्यक्रमाची व्यवस्थित आंखणी करून व प्रांतभर दौरा काढून हा महोत्सव मोठ्या समारंभाने साजरा केला. त्यांच्या ह्या कारकीर्दीत दुसरी महत्वाची कामगिरी म्हणजे सहकारी तत्वावर शेंतकऱ्यांच्या साखर कारखान्यांची स्थापना. सहकारी तत्वावर स्थापन झालेला भारतांतील पहिलाच लोणी सहकारी साखर कारखाना यशस्वी रीतीनें चाललेला पाहून मुंबई मंत्रीमंडळानें मुंबई प्रांतात आणखी दहावारा सहकारी साखर कारखाने स्थापण्याची योजना मंजूर केली. या योजनेशी सहकारी खात्याचा विशेष संबंध असल्यामुळें त्यांनी ही योजना अंमलात आणण्याच्या कार्यक्रमांत अत्यत उत्साहानें भाग घेऊन अशा कारखान्याच्या संघटकांना शक्य तेवढी मदत केली.

**अखिल भारत वीरशैव संघाची स्थापना व वीरशैव मासिकाचें प्रकाशन.**

ह्या काळांत महाराष्ट्रातील वीरशैव समाजाच्या उन्नतीकरितां त्यांनीं केलेले कार्य येथें उल्लेखनीय आहे. मंत्री नात्यानें त्यांनी त्यावेळच्या सर्व महाराष्ट्रभर दौरा केला असल्यामुळें त्यांना तेथील वीरशैव समाजाच्या अवनत परिस्थितीची जाणीव झाली व त्याच्या उन्नतीकरितां त्या समाजाच्या संघटनेची आवश्यकता आहे असे त्यांना कळून आले. करितां त्यांनी त्या समाजाच्या कांहीं कार्यकर्त्यांशीं विचार विनिमय करून सन् १९५४ साली 'अखिल भारत वीरशैव संघ' नांवाची रजिस्टर्ड संस्था स्थापन केली व समाजांत जागृति निर्माण करण्याकरिता त्या संघाच्या वतीनें 'वीरशैव' नांवाचे मराठी मासिक सुरू केले. ह्या मासिकाचें संपादन मुंबईचे सुप्रसिद्ध समाजकार्यकर्ते श्री. पालकंडवार यांनी केले. हे मासिक थोड्याच काळांत महाराष्ट्रीय वीरशैव समाजात फारच लोकप्रिय झाले व त्यामुळें समाजांत चांगली जागृति निर्माण झाली. तसेच सन १९५५ व १९५६ साली मुंबई शहरांत बसवजयंति समारंभही मोठ्या वैभवानें साजरे करण्यांत आले. ह्या प्रमाणें महाराष्ट्रीय वीरशैव समाजाच्या उन्नतीचें कार्य त्यांच्या नेतृत्वाखाली चालले असतांना सन १९५६ सालच्या अखेरीस भारताच्या सर्व राज्यांची पुनर्घटना होऊन त्यांत मुंबई प्रांतातील कर्नाटक भाग म्हैसूर राज्यास जोडला गेल्यामुळें त्यांना बेंगळूरास जावे लागले. त्यामुळें समाजोन्नतीच्या ह्या कार्यक्रमांत शिथिलता आली व शेवटीं वीरशैव मासिक बंद पडले.

**शारीरिक विकलांग परिस्थिती व सार्वजनिक कार्यातून निवृत्ति**

राज्यपुनर्घटनेनंतर म्हैसूर राज्यांत स्थापन झालेल्या श्री निजलिंगाप्पा मंत्रीमंडळांत त्यांचा समावेश होऊन त्यांच्याकडे महसूलखाते सोंपविण्यात आले. मुंबईस असतांनाच त्यांची प्रकृति ढांसळली होती व तेथें सुद्धां ते वरचेवर आजारी पडत. बेंगळूरास गेल्या नंतर त्यांची प्रकृति जास्तीच बिघडली व त्यांना गुडघ्याचा रोग (authroitis) झाला. तेथें त्यांनी त्याच्यावर कांहीं उपाय केले तरी त्याचा उपयोग न होतां तो रोग दिवसेदिवस बळावतच गेला. तशांत सन १९५८ साली निजलिंगाप्पा मंत्रीमंडळानें राजिनामा दिल्यामुळें त्यांनीही राजिनामा दिला व मंत्रीपदाची बारा वर्षांची आपली कारकीर्द संपुष्टात आणली. त्यानंतरही त्यांचा रोग अधिकच वाढत गेला व शेवटीं सन १९६० साली त्यांच्या गुडघ्याचे ऑपरेशन करावे लागले. ह्या ऑपरेशनच्यावेळी त्यांची प्रकृति अगदींच खालावली होती व ह्या रोगाच्या ऑपरेशननें त्यांचा जीव धोक्यांत येईल असे बहुतेक डॉक्टरांचे मत पडले परंतु त्या रोगाचे एक तज्ञ डॉक्टर हा धोका पत्करूनही ऑपरेशन करण्यास तयार झाले व त्याला पाटलानीही संमति दिली. त्याप्रमाणें त्यांच्या गुडघ्याचें ऑपरेशन होऊन त्यांत त्यांचा जीव बचावला, परंतु त्यामुळें त्यांचा पाय कायमचा अधू होऊन, चालणें तर बाजूलाच राहिले, परंतु आपल्या पायावर उभेंही राहतां येईनासे झाले व त्यांचे कानही बधिर झाले. ह्या विकलांग परिस्थितीमुळें ते तेव्हां पासून आजपर्यंत सतत बारावर्षे सदासर्वकाळ बिछान्यावर पडूनच आपले जीवन कंठीत आहेत.

**धार्मिक साहित्य क्षेत्रांतील कार्य. लीला–विश्वंभर ग्रंथाचे प्रकाशन.**

याप्रमाणे विकलांग परिस्थितीमुळें त्यांना सतत आंथरूणाला खिळून राहावे लागल्याकारणानें त्यांचे सार्वजनिक जीवन संपुष्टांत आले तरी त्यांची प्रकृति थोडीशी सुधारल्यानंतर बिछान्यावर पडूनच त्यांनी आपला आवडता विषय धर्म व तत्वज्ञान यांच्या अभ्यासास सुरवात केली. सन १९३२ साली तुरूंगात असतांना त्यांनी भगवद्गीता, वचनशास्त्र वगैरे धार्मिक ग्रंथांचा अभ्यास केला होताच. तसेंच मंत्रीपदावर असताना सुद्धा ते फावल्यावेळीं धार्मिक विषयावरील ग्रंथ वाचीत. परंतु आतां त्यांना आपला सर्व काळ धार्मिक विषयाच्या अभ्यासांत व चिंतनात घालविण्याची संधि मिळाली ह्या काळांत विशेषतः आपल्या वीरशैव धर्माचा सखोल अभ्यास करण्याकडे त्यांनी विशेष लक्ष पुरविले. ह्या धर्माच्या मराठी भाषेतील 'लीला विश्वंभर' नांवाच्या एका प्राचीन अमोलिक ग्रंथाचे हस्तलिखित कांहीं

दिवसांपासून त्यांच्याकडे पडून होते. त्यांनी तो ग्रंथ प्रकाशित करण्याचें ठरवून त्यावद्दल महाराष्ट्रीय वीरशैव समाजाचे नेते श्री. रत्नाप्पा कुंभार यांच्याशीं विचार विनिमय करून त्या ग्रंथाच्या प्रकाशना करितां त्यांच्यामार्फत त्यांनी देणग्या मिळविल्या. तसेंच कोल्हापूरचे विद्वान लेखक श्री. सार्दळ गुरूजी यांच्याकडून त्या ग्रंथाचे संपादन करवून व तो ग्रंथ समजून घेण्यास आवश्यक असलेला 'वीरशैव धर्म' नांवाचा महत्वपूर्ण प्रबंध स्वत: लिहून तो ग्रंथ सन १९६४ सालीं तयार केला. त्या ग्रंथाचे प्रकाशन श्री. रत्नाप्पा कुंभार यांनी कोल्हापूर मुक्कामीं मोठ्या समारंभानें स्व. माननीय काकासाहेव गाडगीळ यांच्या हस्ते करविला. सांप्रत हा लीला विश्वंभर ग्रंथ मराठी भाषेतील वीरशैव धर्माचा अधिकृत ग्रंथ म्हणून मानला जात असून तो साऱ्या महाराष्ट्रीय वीरशैव समाजांत अत्यंत लोकप्रिय झाला आहे.

**ज्ञानप्रसाद पाक्षिकाचे मासिकांत रूपांतर.**

लीलाविश्वंभर ग्रंथाच्या प्रकाशन समारंभाच्या काळीं त्यांचा माझा विशेष परिचय झाला. त्यावेळी मी महाराष्ट्रीय वीरशैव समाजाच्या सेवेकरितां 'ज्ञानप्रसाद' पाक्षिकाचे संपादन करीत होतो. परंतु समाजसेवेस पाक्षिकापेक्षां श्रेष्ठ दर्जाच्या मासिकाचा जास्ती उपयोग होतो असें त्यांनी सुचविले. परंतु असले श्रेष्ठ दर्जाचे मासिक चालविण्यास जास्ती खर्च येतो. करितां त्यावद्दल तें, मी व श्री. रत्नाप्पा कुंभार तीघांनी मिळून विचार विनिमय केला व लोकांकडून देणग्या मिळवून असले श्रेष्ठ दर्जाचे मासिक संपादन करण्याचे ठरविले. त्याप्रमाणें सन १९६५ साली ज्ञानप्रसाद पाक्षिकाचे मासिकांत रूपांतर करून ते आजपर्यंत यशस्वी रीतीनें चालविले जात आहे. सांप्रत हे मासिक महाराष्ट्रीय वीरशैव समाजाची करीत असलेली सेवा सर्वश्रुतच आहे. त्यांनीं ह्या मासिका करितां वेळोवेळी ज्ञानयुक्त व माहितीपूर्ण लेख लिहिले. सांप्रतचा हा ग्रंथ त्यांनीं ज्ञानप्रसाद मासिकाकरितां लिहिलेल्या लेखांचे संकलन आहे. वीरशैव धर्माच्या व समाजाच्या विविध विषया संबंधीचे त्यांचे हे लेख पाहिले तर ह्या विषयावरील त्यांच्या प्रभुत्वाची कल्पना येते.

**'होस बेळकु' कन्नड ग्रंथाचे प्रकाशन.**

तसेंच सन १९६७–६८ साली साऱ्या भारतांत साजरा केल्या गेलेल्या श्री बसवेश्वराच्या अष्टशतमानोत्सव काळीं त्यांनीं बसवेश्वरांच्या ऐतिहासिक चरित्राचें संपूर्ण संशोधन करून 'होस बेळकु' नांवाचा एक कन्नड संशोधनात्मक ग्रंथ प्रसिद्ध

केला. त्यांत त्यांनी वसवेश्वरासंबंधीची कांहीं नवीन माहिती उजेडांत आणली. त्यांनीं ह्या ग्रंथात वसवेश्वरा संबंधी केलेली नवीन विधानें आतां कर्नाटकांतील बहुतेक सर्व विद्वानांना मान्य झाली आहेत. सोलापूरचे नामवंत लेखक व नाटककार श्री. कुमार कोठावळे ह्यांनीं मराठी भाषेंत लिहिलेले 'महात्मा बसवेश्वर' नाटक ह्या 'होस वेळकु' ग्रंथाच्या आधारावरच लिहिले गेले आहे.

मागच्या वर्षापासून ते 'वीरशैव धर्माचा इतिहास व तत्वज्ञान' नांवाचा एक संशोधनात्मक बृहत् ग्रंथ लिहींत आहेत. वीरशैव धर्माच्या इतिहासाचे संशोधन अजून कोणाही विद्वानानें केलेले नाहीं. त्यामुळें या विषयासंबंधी स्वतःच संशोधन करून त्यांना हा ग्रंथ लिहावा लागत आहे.

**आदर्श सहधर्मचारिणी–कौटुंबिक सुखप्राप्ति.**

याप्रमाणें त्यांना आपले बहुतेक सर्व जीवन गरीबींत, हाल अपेष्टांत व सार्वजनिक कार्यांत कंठावे लागले तरी त्यांना कधींही कौटुंबिक सुखाची उणीव भासली नाहीं. त्यांच्या धर्मपत्नी श्रीमती लक्ष्मीबाई स्वभावानें अत्यंत नम्र व सोशिक असून कर्तबगार, स्वाभिमानी व खंबीर वृत्तीच्या होत्या. अत्यंत संकटकाळीं सुद्धां त्यांनी दाखविलेल्या स्वाभिमानी व खंबीर वृतीचे उदाहरण वर उद्‌धृत केलेलेच आहे. तसेंच त्या मृदुभाषिणी मनमिळाऊ व थोर उदार मनाच्या होत्या. लहानपणापासूनच आपल्या पतीबरोबर राहून ते त्यांच्या सुखदुःखाचे भागीदार झाले होते. गरीबांबद्दल त्यांना फार कळवळा होता. पाटील मंत्रीपदावर असताना ते त्यांच्या हाताखालील सरकारी नोकरांच्या घरच्या परिस्थितीची ही विचारपूस करून त्यांना अडीअडचणीच्यावेळीं मदत करीत. त्यामुळें ते सर्व त्यांना आपली आई म्हणून मान देत व प्रसंग विशेषीं त्यांचा सल्ला घेत. लहानपणी त्यांच्या अंगवळणी पडलेल्या साध्या, सोशिक व कष्टाळू जीवनाचा आपल्या पतीच्या मंत्रीपदाच्याकाळीं सुद्धां त्यांनी त्याग केला नाही. त्यावेळींही ते आपल्या घरचा स्वयंपाक, झाडलोट, धुणीं वगैरे सर्व घरची कामें बरोबर एक नोकर घेऊन स्वतःच करीत. त्याच्याकरितां त्यांनी आचारी अथवा इतर गडी माणसे नेमली नव्हती. पाटलांनी आपलें सर्व आयुष्य सार्वजनिक कार्यास वाहिल्यानंतर आपल्या घराण्याच्या व मुलाबाळांच्या व्यवस्थेची सर्व जबाबदारी त्यांनी आपल्या शिरावर घेतली व ती त्यांनीं यशस्वी रीतीनें पार पाडली. त्यामुळें पाटलांना स्वस्थ चित्तानें सार्वजनिक कार्यात भाग घेता आला. त्याचप्रमाणें ते आपल्या घरीं आल्यागेल्या

पाहुण्यांचे आदरातिथ्य काळजीपूर्वक व आत्मीयतेनें करण्यांत व आपल्या घराण्याचा गौरव व प्रतिष्ठा वाढविण्यांत अत्यंत दक्ष असल्यामुळें ह्या बावतीत सुद्धां पाटलांना स्वतः लक्ष घालण्याची आवश्यकता कधींही भासली नाहीं. कधीं काळीं पाटील त्यांच्याशीं कौटुंबिक विषयाबद्दल विचारपूस करू लागले तर 'तुमचे लग्न देशाशी लागले आहे, माझ्याशी नाहीं, करिता तुम्ही त्याची काळजी करा, आमची काळजी कां करता' असे ते त्यांना विनोदानें म्हणत. अशा रीतीनें श्रीमती लक्ष्मीबाई खऱ्या अर्थानें पाटलांच्या सहधर्मचारिणी होत्या.

याप्रमाणें दीर्घकाळपर्यंत पाटलांना कौटुंबिक सुख लाभले तरी सन १९६० नंतर ते त्याला वंचित झाले. तेव्हांपासून प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें त्यांना सतत बिछान्यावर पडून राहावे लागले एवढेंच नव्हे तर त्यांच्या धर्मपत्नीची ही प्रकृति दिवसेदिवस बिघडत गेली व त्या आजारामुळें सन १९६७ सालच्या मे महिन्यांत त्या कैलासवासी झाल्या. त्यानंतर ते आपले दुःख विसरतात न विसरतात तोंच साऱ्या कुटुंबाचा आधार असलेले त्यांचे कर्तबगार पुत्र श्री. एस. एम. पाटील सन १९६९ सालच्या मार्च महिन्यांत अकस्मात् हृदयविकारानें वारले. ह्यामुळें तर त्यांच्यावर दुःखाचा कडेलोटच झाला. एस. एम. पाटलामागें त्यांची विधवा पत्नी व त्यांची लहान चार अपत्यें एवढेंच राहिले. यामुळें त्यांच्या कुटुंबाची सर्व व्यवस्था पाहण्याची जबाबदारी आतां पाटलांवरच पडली आहे व ही जबाबदारी ते बिछान्यावर पडूनच पार पाडीत आहेत. ह्या दुःखद परिस्थितीमुळें त्यांना ह्या उतारवयांत फारच त्रास झाला. आपल्या साऱ्या जीवनांत आपल्या कुटुंबाची काळजी न करणाऱ्या आपणावर आतां म्हातारपणीं अंथरूणावर पडून राहून आपल्या कुटुंबाची व्यवस्था करण्याची जबाबदारी पडलेली ही घटना म्हणजे देवानें आपणाला आपल्या पूर्वाग्रुष्यांतील कुटुंबविषयक कर्तव्यच्युतीबद्दल दिलेली शिक्षाच आहे असें ते समजतात.

अपत्यपरिवार.

त्यांना तीन पुत्र व दोन कन्या अशी एकंदर पांच अपत्ये झाली. त्यापैकीं वडील पुत्र पुनगौडा सन १९५४ साली वारले. तसेंच त्यांचे दुसरे पुत्र शिवगौडा एक्झिक्युटिव्ह इंजिनीयर हुद्यावर होते. ते ही सन १९६९ साली वारले. त्यांचे तिसरे पुत्र जयवंत हे म्हैसूर राज्याच्या P.W.D. खात्यांत असिस्टंट इंजिनियर आंहेत. त्यांच्या एक कन्या सौ. शांताबाई यांचा विवाह म्हैसूर राज्याचे एक चीफ

इंजिनियर श्री. मगदुम यांच्याशी झाला आहे. दुसऱ्या कन्या सौ. सुशिलाबाई यांचा विवाह श्री. गौरी यांच्याशीं झाला आहे. हे गौरी विश्वसंस्थेच्या (united nations organisation) औद्योगिक विकास खात्याचे प्रमुख असून ते आपल्या कुटुंबासहित युरोपांतील व्हिएन्ना शहरीं राहतात.

### वैयक्तिक जीवन व त्यांची आराध्य दैवते

श्री. पाटील ध्येयवादी असून त्यांचे वैयक्तिक जीवन आदर्शनीय आहे. श्री छत्रपती शिवाजी महाराज, महात्मा गांधीजी व महात्मा बसवेश्वर हे महापुरूष त्यांचे आराध्यदैवत आहेत. त्यांच्या चरित्रांच्या वाचन मननाने त्यांचे सारे जीवन घडले आहे. शिक्षणाकरितां कोल्हापुरास असतांना त्यांनी शिवाजी महाराजांच्या चरित्राचा अभ्यास केला व त्याचा त्यांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. भावी काळांतील स्वातंत्र्य लढयांत प्रकट झालेल्या त्यांच्या स्वातंत्र्य प्रेमाचे व लढाऊ वृत्ताचे बीजारोपण त्यांच्या मनांत शिवाजी महाराजांच्या चरित्रानेंच झाले व महात्मा गांधीजीच्या नेतृत्वाखालील स्वातंत्र्य लढयाच्या काळीं त्याला पालवी फुटली. महात्मा गांधीजी व महात्मा बसवेश्वर यांचे जीवनचरित्र साऱ्या मानवाना आदर्शनीय आहे असे ते मानतात. त्यांच्या चरित्रांत त्याना विलक्षण साम्य आढळून आले व ते त्यांनीं आपल्या 'महात्मा गांधीजी व महात्मा बसवेश्वर' या लेखांत सोदाहरण दाखवून दिले आहे. ह्या ग्रंथात उद्धृत केलेला त्यांचा हा लेख उद्बोधक व मननीय आहे. ह्या महानुभावांबद्दल त्यांना असलेला पूज्यभाव नुसता पोकळ व दिखाऊ नसून त्यांनी उपदेशिलेली उच्च तत्वें ते आपल्या आचरणांत आणण्याचा कसोशीनें प्रयत्न करतात. त्यांची राहणी अत्यंत साधी असून ते निर्व्यसनी आहेत. साधी सुपारी सुद्धां ते खात नाहींत. मिलिटरीत मांसाहार व मद्यपान सर्वसामान्य व आवश्यक गोष्टी म्हणून मानल्या जातात. परंतु तेथें असतांनाही त्यांनी त्यांना शिवलेसुद्धां नाहीं. त्यांच्या घरीं धार्मिक वातावरण असले तरी तेथें सोवळया-ओंवळयाचे अथवा शिवाशिवीचे आडंवर नाहीं किंवा जातीभेद, स्पृश्यास्पृश्य, उच्च-नीच, श्रीमंत-गरीब, अशा भेदभावनेला थारा नाहीं. सर्वांशीच ते प्रेमादरानें व समभावानें वागतात. श्रीमती पाटीलही ह्या बाबतींत अंतःकरण पूर्वक व खुल्या दिलानें आपल्या पतीला साथ देत होत्या. 'तुमच्या सुधारणा घरच्या उंबरठयाबाहेर ठेवा, घरांत आणू नका' असें आपल्या पतीराजांना बजावणाऱ्या सहधर्मचारिणीं प्रमाणें (?) त्या नव्हत्या.

**धार्मिक साहित्याचा अभ्यास.**

धार्मिक साहित्याचा त्यांचा अभ्यास वाखाणण्याजोगा आहे. धार्मिक साहित्यांत भगवद्‌गीता, उपनिषदें, बसवेश्वरादि शिवशरणांचे वचनशास्त्र ह्या प्राचीन साहित्याला व महर्षि अरविंद, स्वामी विवेकानंद, रामकृष्ण परमहंस, माजी राष्ट्रपति डॉ. राधाकृष्णन्, गुरुवर्य रानडे यांच्या आधुनिक धार्मिक साहित्याला ते जास्ती महत्व देतात. ह्या सर्व साहित्याचे त्यांनी पारायण केले आहे. महाराष्ट्रीय संतसाहित्याचाही त्यांनी अभ्यास केला आहे. बसवेश्वरांची वचने व महाराष्ट्रीय संताचे अभंग ह्यांच्यातील साम्यस्थळे शोधून काढून त्यांच्यासंबंधी त्यांनी कांहीं लेख लिहिले आहेत. ते वेळोवेळीं आमच्या ज्ञानप्रसाद मासिकांत प्रकाशित झाले आहेतच. कर्नाटक व महाराष्ट्र ह्या प्रांतातील संतांच्या धार्मिक विचारधारांचा तुलनात्मक अभ्यास करणाऱ्यांना त्यांचे हे लेख फारच उपयुक्त आहेत. या सर्व धार्मिक साहित्याचे लहान मोठे ग्रंथ व इतरही कांहीं ठळकठळक धार्मिक ग्रंथ यांचे एक छोटेसे ग्रंथालयच त्यांनी आपल्या घरांत स्थापिले आहे.

**आध्यात्मिक आचरण.**

याप्रमाणें धार्मिक साहित्याचा त्यांचा अभ्यास प्रशंसनीय असला तरी त्यांत प्रतिपादलेल्या तत्वांप्रमाणें आपलें आचरण नसेल तर ते गाढवाने निरर्थक ओझे वाहिल्याप्रमाणे व्यर्थ आहे असे त्यांचे म्हणणें आहे. मानवांचे अंतिम ध्येय मोक्ष ( स्वर्गप्राप्ती ) नसून आपल्या व्यक्तीत्वाचे सर्वांगीण व पूर्ण विकास करून घेणें आहे असे ते मानतात. त्यामुळें त्यांचे दैनंदिन आचरण व कार्यक्रम त्या ध्येयाला परिपोषक असेच आहेत. सांप्रत ते आपला सर्वकाळ अध्यात्मचिंतन, मनन, पठण व लेखन यांतच घालवितात. प्रियपत्नीच्या व पुत्राच्या निधनामुळें त्यांच्यावर कोसळलेल्या दुःखमय परिस्थितीतही त्यांच्या ह्या कार्यक्रमाला खंड पडला नाहीं. उलट ह्या कार्यक्रमाच्या आचरणामुळेंच आपल्या मनांतील दुःखाचा भार कमी होऊन मनाला शांतिसमाधान लाभते असे ते म्हणतात. एकंदरीत त्यांचे सारे जीवन पाहिले तर ते एकाद्या कर्मयोग्याच्या जीवनाप्रमाणें असून ‘ साधी राहणी व उच्च विचारसरणी ’ ह्या उच्चतत्वाचे दिग्दर्शकच आहे असे म्हणावयास हरकत नाहीं. अशा ह्या श्रेष्ठ विद्वानाच्या ज्ञानाचा व अनुभवाचा लाभ यापुढेंही समाजाला मिळण्याच्या दृष्टीनें तो दयाघन परमेश्वर त्यांना आयुरारोग्य व शांती समाधान प्रदान करो अशी मी त्याची प्रार्थना करतो.





वीरशैव (लिंगायत) लेखसंग्रह

खंड १

धार्मिक व चारित्रिक लेख

लेखांक १

# आजच्या समस्या : आध्यात्मिक भूमिकेची निकड

(ज्ञानप्रसाद पाक्षिकाचे मासिकांत रूपांतर केल्यानंतर त्याच्या पहिल्या (जानेवारी १९६५) अंकाचा संपादकीय लेख)

ज्ञानप्रसाद पाक्षिकाच्या मागच्या व शेवटच्या अंकांत जाहीर केल्याप्रमाणें ज्ञानप्रसाद मासिकाचा हा जानेवारी – फेब्रुवारी जोड अंक, सचित्र सजवून व आधुनिक लेणी चढवून, आमच्या सहृदय वाचकांच्या हातीं देण्यांत आम्हाला धन्यता वाटत आहे. दि. १५ ऑगस्ट १९६२ च्या शुभ दिवशीं श्री गुरुरुद्रपशुपति कोळेकर महास्वामीजींच्या शुभ आशिर्वादानें जन्म पावलेल्या ह्या बालकाचे बोबडे बोल ह्या तीन वर्षांत आपण गोड करून घेतले, व वेळोवेळीं त्याला उत्तेजन देऊन व सक्रीय सहाय्य करून, ह्या लहान वयांतही आपली जास्तींत जास्त सेवा करण्याची संधी त्याला दिली, याबद्दल आम्ही आमच्या वाचक वर्गाचे, लेखकांचे व जाहीरातदाराचे व अनेक रीतीनें सहाय्य केलेल्या इतर लोकांचे आभार मानतो. ज्ञानप्रसादच्या प्रकाशनाला प्रांरभ करतांना त्यावेळी आमच्या

मनांत वावरत असलेली साधार भीती आज आम्ही आपल्यापुढे मांडत आहो. महाराष्ट्र वीरशैव समाजाच्या साहित्यक्षेत्रांत आजपर्यंत कांहीं नियतकालिकें जन्मास आलीं परंतु आवश्यक उत्तेजन व सहाय्याच्या अभावीं ती अल्पायुषी ठरली. त्याप्रमाणें ज्ञानप्रसादची गत होऊं नये म्हणून प्रथम पासूनच आम्ही हें नियतकालिक लहानशा प्रमाणावर आरंभ करून त्याला स्थैर्य येईल त्याप्रमाणांत त्याला प्रौढ व भव्य स्वरूप देत जाण्याचा आमचा इरादा होता. त्याप्रमाणें ज्ञानप्रसाद साप्ताहिकाचे ज्ञानप्रसाद पाक्षिकांत रूपांतर केले व आतांपर्यंतच्या अनुभवावरून आंता या पाक्षिकाचें मासिकांत रूपांतर करुन वीरशैव समाजाची याच्याहीपेक्षा महत्त्वाची व चिरंतन स्वरुपाची सेवा करणे शक्य होईल असा आम्हाला आत्मविश्वास वाटत असल्याने आम्ही हे महत्त्वाचे पाऊल आपल्या सर्वांच्या सहाय्यावर अवलवून पुढें टाकीत आहोत. सुदैवानें आमच्या समाजाचे थोर नेते व धडाडीचे कार्यकर्ते दे. भ. रत्नाप्पा कुंभार व इतर कांही सदगृहस्थांनी या कार्यास सक्रीय सहाय्य करण्याचे आश्वासन देऊन आम्हाला उत्तेजित केल्या-मुळे आमचा आत्मविश्वास वृध्दिगत झाला आहे. तशांत अ. भा. वीरशैव संघाने ह्या मासिकाला आपलें मुखपत्र ठरवून त्याला गुरूदीक्षा दिली. गुरूदीक्षेने पुनीत होऊन त्याच्या मार्गदर्शनाखाली व थोरामोठ्यांच्या आशीर्वादानें व विशेषत: आपल्या सर्वांच्या आत्मीयतेनें व सहाय्यानें हें मासिक उत्तरोत्तर उत्कर्ष पावून आपल्या सर्वांच्या चिरंतन सेवेस पात्र होवो एवढीच आमची त्या जगन्नियंत्याजवळ प्रार्थना आहे.

### अणुबाँब निर्मिती व शांतिस्थापना

इतके दिवस लहानशा क्षेत्रांत वालक्रीडा करणारा हा वालक युवावस्थेत पदार्पण करून ह्या विशाल जगावर दृष्टी फेकतांच त्याला त्याचे भयानक स्वरुप भेडसावीत आहे. अणुबाँब युध्दानें अखिल मानव समाजच नष्ट होणार हें स्पष्ट असतांना व त्याच्या निर्मितीविरुध्द प्रक्षुब्ध लोकमत प्रदर्शित केले जात असतांना एक दोन राक्षसी महत्वाकांक्षी व्यक्तींच्या प्रेरणेनें कांहीं राष्ट्रें अणुबाँब तयार करण्यात गुंतली आहेत ही खेदाची गोष्ट आहे. असलीं अणुशस्त्रें निर्माण करण्याचें सामर्थ्यं आपल्या अंगांत असतांनासुध्दां व चीनच्या भीतीनें ग्रासल्यामुळें आपणही अणुबाँबनिर्मिती करावी असा आग्रह आपलेच कांहीं लोक करीत असतांनाही त्यांच्या आग्रहाला बळीं न पडतां व आपलें धैर्य खचूं न देतां कांहीं झाले तरी आपण अणुबाँबनिर्मिती करुन जगाच्या शांतिस्थापनेस धोका आणणार नाहीं असा दुर्गापूर येथें भरलेल्या ६९ व्या कॉंग्रेस अधिवेशनात कॉंग्रेसनें घेतलेला

स्पष्ट निर्णय काँग्रेसला व देशासही भूषणावह आहे यांत संशय नाहीं.

**अन्नधान्याचा प्रश्न आहारोत्पादन.**

सांप्रतकाळीं आम्हा सर्वांना भेडसावीत असलेला दुसरा प्रश्न म्हणजे अन्नधान्याची समस्या व आहारोत्पादनाचा कार्यक्रम. देशांतील लोकसंख्या दिवसेंदिवस वाढत चालल्यामुळें व त्या प्रमाणांत जास्ती आहारोत्पादन होत नसल्यामुळें दिवसेंदिवस हा प्रश्न विकट व गुंतागुतीचा होत चालला आहे. ही समस्या सोडविण्याच्या दृष्टीने गेली १५/२० वर्षे अनेक प्रयत्न केले गेले असले तरी ही समस्या कांहीं सुटत नाहीं, हें आपणा सर्वांस भूषणावह नाहीं. हा अन्नधान्याचा प्रश्न थोडयाच दिवसांत सोडविला नाहीं तर 'बुभुक्षितं किं न करोति पापम्' या न्यायानें देशांत बंडाळी माजून अराजकता उत्पन्न होईल, अशा कांहीं जबाबदार नेत्यांच्या गंभीर इषाऱ्याकडे सरकार दुर्लक्ष करणार नांहीं अशी आशा आहे. अन्नधान्याच्या परदेशी पुरवठयावर अवलंबून हा प्रश्न सुटणार नाहीं. आपल्या देशांतील आहारोत्पादन वाढवूनच हा प्रश्न सोडविला पाहिजे. सांप्रत आम्हाला अनेक गोष्टींची गरज आहे, व त्याकरतां अनेक योजना अंमलात आणल्या जात आहेत. परंतु आहाराचा प्रश्न लोकांच्या प्राथमिक गरजेचा व महत्वाचा असल्यामुळें बाकीच्या गोष्टी कांहीं अशानें बाजूला सारुन आहारोत्पादनाच्या एकाच कार्यक्रमावर आपलें सर्व सामर्थ्य एकवटणें आवश्यक आहे. ह्या बाबतींत दररोज निरनिराळ्या योजना अंमलांत येत असून त्यांच्यावर कोटयवधि रुपये खर्च होत आहेत. असे असलेतरी त्यांचा खरा फायदा खालच्या पातळीवर शेतकऱ्यांना मिळत नाही ही ओरड सर्वत्र दिसून येते, व ती बऱ्हंशाने खरी आहे. या करतां नव्या नव्या योजना कागदोपत्रीं आखून त्या अमलात आणण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा सध्यांच्या योजनांची अंमलबजावणी समाधानकारक रीतीने कां होत नाहीं याचा विचार करून व ह्या योजना अंमलात आणणाऱ्या सरकारी यंत्रणेतील दोष काढून टाकून ही यंत्रणा प्रथम कार्यक्षम बनविणें अगत्याचे आहे. उगीच साप, साप म्हणून शेतकऱ्यांच्या नांवाने ओरडण्यात अर्थ नाहीं. आहारोत्पादनाची जबाबदारी वाहिलेल्या सरकारी व निमसरकारी यंत्रणामधील सर्व गुणदोष येथें दाखविणे शक्य नाही. त्याची साधक बाधक चर्चा आगामी अंकातील एका स्वतंत्र लेखात करणेचा विचार आहे.

**शांती समतेच्या स्थापनेस आध्यात्मिक भूमिकेची आवश्यकता.**

ह्या आहार समस्येचा जगाच्या पातळीवरून विचार केला तरी तेथेही

निराशाच दिसून येते. शांती, समता, विश्वबंधुत्व सारख्या उदात्त तत्वांचा सांप्रत प्रत्येक ठिकाणीं ' उदो उदो ' होत असला तरी प्रत्यक्ष कृतीत मात्र भयंकर विषमता व निरनिराळ्या राष्ट्राची आकुंचित राष्ट्रीय वृत्तीच दृष्टोत्पत्तीस येत आहे. अमेरिका, आस्ट्रेलिया, न्युझिलंड सारख्या तुरळक लोकसंख्येच्या राष्ट्रा-मध्ये आहारोत्पादन कल्पनातीत वाढल्यामुळे त्याचा कांही भाग नष्ट केला जात आहे व कायद्याच्या बळावर सुपीक जमीनी ओसाड पाडण्यात येत आहेत, तर हिंदुस्थान, चीन, जपान सारख्या बहुसंख्येच्या राष्ट्रातील लोकांना आपल्या पोटाची टीचभर खळगी भरण्यास जाडें भरडें अन्नही मिळत नाहीसे झाले आहे. ही विषमता शांती स्थापनेस सहाय्यकारक आहे असे कोण म्हणेल ? विज्ञान शास्त्राच्या कल्पनातीत प्रगतीने जगाच्या संपत्तीत भर पडत असली तरी त्या संपत्तीचा विनियोग जोपर्यंत सर्व मानव-समाजाच्या कल्याणाकरता होत नाही तोपर्यंत त्याचा काय उपयोग? ही विषमता नष्ट करुन समतेच्या तत्वांवर सर्व संपत्तीची विभागणी करण्याकरतां सांप्रत अनेक 'इजम (Ism)' अस्तित्वात आले आहेत. या इजमचीं तत्वें दिसण्यांत सुवक व आकर्षक असली तरी त्या तत्वांच्या प्रत्यक्ष आचरणांत समता तर दिसून येत नाहींच परंतु त्यामुळें परस्पर वर्गकलह व द्वेष भाव मात्र वाढत आहेत. प्राचीन काळीं भारतानें आध्यात्मिक क्षेत्राला जास्ती महत्व देऊन आधिभौतिक क्षेत्राची उपेक्षा केली व त्याचीं कटु फळें आज आपण भोगीत आहो. तसेंच सांप्रत काळीं आपण अधिभौतिक क्षेत्रालाच महत्व देऊन आध्यात्मिक आचरणाकडे दुर्लक्ष करीत आहोत परंतु ही एकांगी प्रगती आज नाहीं उद्या आम्हाला भोवल्या शिवाय राहणार नाही. याकरतां मानव समाजाची सर्वांगीण उन्नति होऊन ' सर्वेऽपि सुखिनः संतु ' अशी परिस्थिती निर्माण होण्यास त्याच्या अधिभौतिक सुधारणेबरोबर त्याची आध्यात्मिक प्रगतीही झाली पाहिजे व त्यांच्यामध्यें परस्पर सहकार व समतोलपणा राहिला पाहिजे. मानवी समाजाच्या या दोंन क्षेत्रांची प्रगतीची टोकें परस्पर विरुद्ध दिशेने जात आहेत असे दिसले तरी, पृथ्वीच्या एका टोकापासून विरुद्ध दिशेनें निघालेल्या रेषा, जशा त्याच्या उलट बाजूच्या टोकाच्या ठिकाणी मिळालेल्या दिसतील, त्याप्रमाणें ही परस्पर विरुद्ध दिसणारी हीं क्षेत्रे आतां परस्पराजवळ येत असून कांहीं काळानंतर त्याचा परस्पर समन्वय होण्याची शुभलक्षणे दिसत आहेत. हे घडून येईल तो खरोंखरच सुदिन !

### शिक्षणक्रमांत आध्यात्मिक व धार्मिक शिक्षणाचा समावेश

वरील हकीगतीवरून आपल्या तरुण विद्यार्थ्यांच्या अभ्यास क्रमांत आध्या-

त्मिक व धार्मिक शिक्षणाचा समावेश करण्याची आवश्यकता किती आहे हे दिसून येते. सांप्रत ही गोष्ट सर्वांना पटत असली तरी, आपल्या देशात अनेक धर्म प्रचलित असल्यामुळे सर्वांना मान्य होईल. अशी आध्यात्मिक व धार्मिक शिक्षणाची योजना अनेक अडचणीमुळे अजून अस्तित्वांत येत नाही. सांप्रतच्या प्रगतीच्या काळांत सर्व धर्मांचा समन्वय करून जगांत एकी, शांतता, समता प्रस्थापित करावेत असे उदात्त विचारांचे प्रवाह वाहत असतांना सर्वधर्म — समन्वयावर आधारलेली व सर्वमान्य अशी आध्यात्मिक व धार्मिक शिक्षणाची योजना आंखणें आपल्या शिक्षणतज्ञांच्या आवाक्यावाहेरचे आहे काय ?

**वीरशैव समाज व धार्मिक शिक्षण.**

अशा तऱ्हेची आध्यात्मिक व धार्मिक शिक्षणाची योजना सर्व. देशाकरता वस्तित्वांत येत नसली तरी आपल्या वीरशैव समाजापुरते तरी लिं. श्री. मृत्युंजय स्वामींनी हा प्रश्न सोडविला आहे, हें याच अंकात प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या चरित्रावरून दिसून येईल. ही योजना मूलतः वालक विद्यार्थ्यांकरतां असली तरी महाराष्ट्राच्या वीरशैव समाजातील धार्मिक अज्ञानाकडे पहाता ही योजना समाजातील प्रौढ स्त्रीपुरूषांना ही उपयुक्त ठरेल असें आम्हास वाटते. अ. भा. वीरशैव संघ व अ. भा. शिवानुभव संस्था यांनी ही योजना महाराष्ट्रांतील वीरशैव समाजात अंमलांत आणण्याचे ठरविलें आहे. त्याचा फायदा घेऊन ठिकठिकाणचे कार्यकर्ते आपापल्या स्थानी ही योजना अंमलात आणून समाजोद्धाराच्या कार्यास हातभार लावतील अशी आशा आहे. ही योजना अमलात आणण्यास कोणावरही विशेष भार न पडता सहजासहजी हे समाजकार्य होण्यासारखे आहे. परंतु ही योजना अंमलांत आणण्याची कळकळीची इच्छा मात्र पाहिजे.

## लेखांक २

# आदर्श शिवशरण

# लिं. पूज्य श्रीमृत्युंजय स्वामीजी

## धारवाड

जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति ।
देह कष्टविती उपकारें ।।

अखिल विश्वाची उत्पत्ति करुन त्याचा योगक्षेम चालविणाऱ्या विश्वकर्त्याच्या अनुग्रहानें या भूतलावर वेळोंवेळीं महानुभाव संत निर्माण होऊन जगाच्या कल्याणाकरतां चंदनाप्रमाणें आपला देह झिजवितात व ह्या उच्च ध्येयाच्या साधनेकरतां आपलें सर्व आयुष्य वेंचतात, म्हणून धिम्याधिम्यानें का होईना, सर्व जगाचें प्रगतीचें पाऊल पुढें पडत आहे. मानवजातीतील प्रत्येक समाजांत असे संत निर्माण होऊन त्यांनी लोकोद्धारचें कार्य केलें आहे. लौकिक दृष्टीनें ह्या संतांची गणना एखाद्या विशिष्ट धर्मांत अथवा समाजांत केली जात असली तरी, किंवा देशकाल परिस्थितीनुसार त्यांचें कार्यक्षेत्र एखाद्या धर्मापुरतें किंवा समाजापुरतें मर्यादित असलें तरी त्यांच्या कार्यांचा मूलभूत उद्देश सर्व जगाचें कल्याण हाच असतो असें आपणांस आढळून येईल.

बाराव्या शतकात समता, स्वतंत्रता व विश्वबंधुत्व यासारख्या उदात्त तत्वांवर वीरशैव लिंगायत धर्मांची पुनर्घटना करुन त्या धर्मांचें द्वार जातीभेद व

लिंग भेद न मानतां सर्व जातींच्या व वर्गांच्या लोकांना खुलें करुन विश्वधर्माची स्थापना करणारे श्री बसवेश्वर, श्री प्रभुदेव, श्री चन्नबसवेश्वर, संत महादेवी अक्का वगैरे शिवशरणांचा अशा संताच्या मालिकेतच समावेश होतो. हे शिवशरण वीरशैव लिंगायत धर्माचे संत म्हणून मानले जात ससलें तरो त्यांचें कार्य अखिल जगाच्या कल्याणाकरतांच होते. 'सर्व प्राणीमात्रांच्या कल्याणाची काळजी वाहाणाराच शिवशरण' असें त्यांनी शिवशरणांचे मुख्य लक्षण ठरविलें होतें. यावरुन त्यांच्या विश्वव्यापक व सर्वभूतहितरत दृष्टीची कल्पना येते. श्री बसवेश्वरादि शिवशरणांची ही उच्च, उदात्त व उज्वल संत परंपरा सांप्रतही वीरशैव समाजांत टिकून आहे, ही गोष्ट वीरशैव समाजाला भूषणावह व अभिमानास्पद आहे. अशा या.थोर संत परंपरेत तीन महिन्यामागें आपलें बहुमोल जीवन कार्य संपवून लिंगैक्य झालेले आधुनिक शिवशरण व थोर कर्मयोगी, धारवाड मुरघामठाचे मठाधीश, श्री. म. निं. प. ब्र. मृत्युंजय महास्वामीजी यांची प्रामुख्यानें गणना होते.

**जन्मस्थल–काल**

वीरशैव धर्म उदारमतवादी, प्रगतीशील व प्रवृत्तीपर असून कर्नाटकांत तो बहुजन समाजवाडी असल्यामुळें समाजाच्या सर्वांगीण उन्नतिकरतां समाजाच्या सर्व घटकांना शिक्षण देण्याच्या आवश्यकतेची जाणीव, त्याच्या धर्मोद्धारकांना पूर्वीपासूनच असून त्यांन या कार्यक्रमाकरितां आपल्या धर्माच्या संघटनेंत, मठसंस्थेला महत्वाचें स्थान दिलें आहे. ज्या ज्या ठिकाणीं वीरशैवांची वस्ती आहे त्या सर्व ठिकाणीं जरुरी प्रमाणें लहानमोठे मठ स्थापन झाले आहेत अशा मठांच्या अधिपतीनीं आपल्या भागांत धार्मिक प्रचार करावा, समाजाची धार्मिक कार्यें करावीत व त्याबरोबरच त्यांनी कोणताही भेदभाव न मानतां सर्व समाजाच्या बालकबालिकांना प्राथमिक शिक्षण द्यावें, व तेथील ग्रामस्थांनी मठाला धनधान्यरुपानें देणगी देऊन त्या मठपतींचा योगक्षेम चालवावा, अशा तऱ्हेची संघटना वीरशैव समाजांत पूर्वीपासूनच अस्तित्त्वात आहे. धारवाड जिल्ह्यातील इंगळहळ्ळी नावाच्या लहानशा खेड्यात असलेल्या अशा एका मठाचे अधिपति, कांतप्पय्या स्वामी नांवाचे एक सच्छील शिवभक्त होते, व त्यानी ग्रामस्थांच्या सहाय्यानें सर्व समाजाच्या बालकांकरतां अशी एक प्राथमिक शाळा चालविली होती. कांतपय्या स्वामीच्या धर्मपत्नीचें नाव चन्नवीरम्मा. हे दोघेही पतिपत्नीं स्वभावानें निगर्वी, पापभीरु व सदाचारी असून ते आपला सर्व वेळ समाजाची सेवा करण्यातच घालवीत असत. त्यामुळें ते तेथील समाजांत फारच लोकप्रिय झाले होते. अशा या

सुशील दांपत्याच्या पोटी श्रीमृत्युंजय महास्वामींचा जन्म दि. ९ एप्रिल सन १८८८ दिवशीं शुभ मुहुर्तावर झाला. अर्थातच त्यांच्या मातापित्यांना व इतर ग्रामस्थांना यामुळें अत्यानंद झाला व त्या सर्वांनी बालकाचा जन्मोत्सव मोठ्या आनंदानें साजरा केला.

**बालपण व शिक्षण**

श्री मृत्युंजय स्वामीची धार्मिक प्रवृत्ति त्यांच्या बालपणातच दिसून येऊ लागली, ब घरातील सात्त्विक वातावरणामुळे ती दिवसेंदिवस वृद्धिगत होत गेली. कन्नड तिसऱ्या इयत्तेपर्यंतचें त्यांचे शिक्षण अर्थातच त्यांच्या पित्याच्या देखरेखीखाली त्यांच्या शाळेतच झाले. तेथील शिक्षण संपल्यानंतर त्यांच्या वडिलांनी त्यांनां पुढील शिक्षणाकरतां धारवाड येथील शाळेत धाडले. परंतु तेथे त्यांना फार दिवस राहण्याचा योग त्या काळीं नव्हता असे दिसते. त्यांच्या बालपणात दिसून आलेली त्यांची धार्मिक प्रवृत्ति व शिवभक्तीकडे असलेला त्यांचा ओढा लक्षात घेऊन, त्यांच्या मातापित्यांनी आपल्या गांवातील करिसिद्देश्वर मठाला त्यांना अर्पण करण्याचें ठरविलें. हा मठ गदगच्या प्रसिद्ध जगद्गूरू तोंटदाचार्य मठाची शाखा होती. याकरीता, गदगला जाऊन त्यांनी त्या मठाच्या स्वामींना आपला संकल्प सांगून त्यांना त्या स्वामीच्या स्वाधीन केले. त्यावेळी त्यांचे वय फक्त दहा वर्षाचे होते.

तेथील मठांत त्यांनीं कन्नड भाषेचा अभ्यास संपवून संस्कृत भाषेचेंही ज्ञान संपादन केले. त्यांचा कंठ मधुर होता व शिवशरणांची भक्तीगीते गाण्याची त्यांना बालपणापासून आवड होती. त्यामुळे धार्मिक शिक्षणाशिवाय त्यांनी तेथे संगीत कलेचा ही थोडा बहुत अभ्यास केला. त्याप्रमाणें चारपांच वर्षात तेथील शिक्षण संपविल्यानंतर ते देशसंचारास निघाले. बेल्लारी, हरपनहळ्ळी वगैरे कर्नाटकांतील प्रमुख गांवाना भेटी देऊन सोलापुरास गेले. तेथे श्रीसिद्धरामेश्वराचें दर्शन घेऊन, त्यावेळी कै. अप्पासाहेब नारद यांनी तेथे चालविलेल्या संस्कृत पाठ-शाळेत त्यांनी कांही दिवस घालविले. तेथून ते बेळगांव जिल्ह्यातील अंकलगी येथील प्रसिद्ध अडवी मठास गेले. तेथील स्वामीनी त्यांची धार्मिक प्रवृत्ति व कडकडीत वैराग्यवृत्ति पाहून त्यांना अथणी येथील सुप्रसिद्ध शिवयोगी व वैराग्य-मूर्ती श्री मुरुघेंद्र स्वामी यांच्याकडे जाण्याचा सल्ला दिला. त्याप्रमाणें ते अथणीस जाऊन श्री मुरुघेंद्र माहास्वामीच्या सेवेंत निमग्न झाले.

गुरुदीक्षा.

अथणी येथील श्री मुरुघेंद्र शिवयोगीचें वास्तव्य असलेला मठ उपनिषद् कालीन ऋषींच्या आश्रमासारखा आश्रम होता. तो गांवापासून दूर असलेल्या एका रम्य व प्रशांत स्थानीं वसलेला असून त्याला लागूनच सदा फुलांनी फुललेला हिरवागार वगीचा होता. तसेंच श्री मुरुघेंद्र स्वामीही प्राचीन ऋषीप्रमाणें महा-तपस्वी व शिवयोगी होते. अशा या सात्त्विक व प्रशांत वातावरणांत आणि श्री मुरुघेंद्र स्वामीसारख्या शिवयोगीच्या सानिध्यांत आपले आयुष्य कंठण्याचा सूयोग लाभल्यामुळे श्री मृत्युंजय स्वामी तेथील वातावरणांत रममाण होऊन गेले. तेथील त्यांचे आचरणही उपनिषदांत वर्णिलेल्या एकाद्या आदर्श शिष्याप्रमाणेंच होते. प्रात:काली चारवाजतां उठून स्नान व लिंगपूजा संपवून सूर्योदयाच्यापूर्वी वागेतील विल्वपत्रें व फुलें आणून गुरुंच्या स्नानाची व लिंगपूजेची व्यवस्था करुन त्यांच्या सेवेस हजर रहावे, दोनप्रहरीं गांवभिक्षा मागून आणून मठातील दासोंहाची व्यवस्था करावी, फुरसतीच्या वेळी धार्मिक ग्रंथवाचन व भजन करावे असा त्यांचा नित्याचा कार्यक्रम होता. मठाची झाडलोट करणें, गुरूंचे कपडे धुणें, बागेतील शारिरिक श्रमाचीं कामे करणें, वगैरे लहानसहान कामेसुद्धा ते स्वत:च करीत. त्याचप्रमाणें शिवयोगींच्या दर्शनार्थ आलेल्या अतिथी अभ्यागतांचे आदरातिथ्य ते स्वत: अत्यंत आदरानें व सेवाभावनेनें करीत. अशारितीने प्रात:काळी चार वाजल्यापासून रात्रीं दहावाजेपर्यंत ते मठाच्या व्यवस्थेत व गुरुंच्या सेवेंत सदा मग्न असत. याप्रमाणें त्यांची आदर्श सेवा, कडकडीत वैराग्यवृत्ति व निगर्वी शुद्धाचरण पाहून श्री मुरुघेंद्र शिवयोगींची त्यांच्यावर कृपा झाली, व त्यांनीं गच्चीन मठाधिपती श्री सिद्धलिंग स्वामी यांच्याकडून त्यांना षट्स्थळ ब्रह्मोपदेश करवून गुरुदीक्षा दिली. गुरुदीक्षेनंतर सुद्धा पूर्वीप्रमाणेंच गुरुंची सेवा करीत ते तेथेंच राहिले. श्री मुरुघेंद्र स्वामींची, महान तपस्वी शिवयोगी म्हणून, सर्वत्र ख्याति असल्या कारणानें अनेक लोक त्यांच्या भेटीस येत. त्यांच्याशी परिचय झाल्यामुळें श्रीमृत्युंजय स्वामींची सुद्धां, एक सदाचरणी व वैराग्यसंपन्न आदर्श ब्रह्मचारी शिष्य म्हणून, चोहोकडे कीर्ति पसरली.

दावणगेरी मठाचा अधिकारस्वीकार.

त्यावेळी श्री प्रभुदेवांच्या शून्य सिंहासन परंपरेतील चित्रदुर्ग येथील शून्य सिंहासन पीठावर लिं. श्री जगद्गुरू जयदेव मुरुघाराजेंद्र महाराज विराजमान झाले होते. ते थोर तपस्वी, विद्वान व कर्मयोगी महास्वामी होते. त्यांनी

कर्नाटक, महाराष्ट्र वगैरे वीरशैव समाजाच्या सर्वभागांत संचार करून त्यांच्यात अपूर्व जागृति निर्माण केली. आपल्या संचारात त्यांनीं सुमारे दहा पंधरा लाख रुपये देणगी मिळवून ठिकठिकाणच्या मठांचा जीर्णोद्धार केला, व वीरशैव विद्यार्थी निलयें स्थापिली. कोल्हापूर येथील सांप्रतचा चित्रदुर्ग मुरुघामठ त्यांच्याच कर्तृत्वाचें फल आहे. त्यामुळे अखंड वीरशैव समाजात त्यांच्याबद्दल असामान्य पूज्यभाव व गौरव वसत होता. ठिकठिकाणच्या मठाकरितां मठाधीश निवडतांना वीरशैव समाजाचे लोक त्यांचीच सल्लामसलत घेत. अशा एका प्रसगी दावणगेरीच्या नागरिकांनी आपल्या मठाकरितां योग्य स्वामीची सूचना करावी म्हणून त्यांना विनंती केलो. श्री जगद्गुरुंच्या कानावर श्री मृत्युंजय स्वामींची ख्याति पूर्वीच पडली होती, म्हणून त्यांनीं त्यांची शिफारस केली. त्याप्रमाणे दावणगेरीचे प्रमुख नागरीक अथणीला जाऊन त्यांनीं श्री मृत्युंजय स्वामींना आपल्या मठाचा अधिकार स्वीकारण्याची गळ घातली. त्यांच्या गुरुंनीही त्याला अनुमति दिली. त्याप्रमाणे ते दावणगेरीला जाऊन सन १९०६ सालीं तेथील मठाचे मठाधीश म्हणून स्थानापन्न झाले.

### सार्वजनिक कार्याला प्रारंभ.

मृत्युंजय स्वामी ज्याप्रमाणे महान तपस्वी व ब्रह्मचारी वैराग्यमूर्ती होते त्याप्रमाणे ते एक कर्तबगार थोर कर्मयोगीही होते, म्हणून दावणगेरीला आल्या-नंतर इतर मठाधीशाप्रमाणें आळसांत वेळ न घालवतां त्यांनी तावडतोब तेथील वीरशैव समाजोद्धाराच्या कार्याला प्रारंभ केला. दावणगेरी कर्नाटकातील प्रमुख शहर असले तरी त्यावेळीं तेथील वीरशैव समाज मागसलेला होता. त्यांच्या-मध्यें धर्मजागृति करण्याच्या इराद्याने श्री मृत्युंजय स्वामींनीं ‘ हितोपदेश संघ ’ नांवाची संस्था स्थापून त्याच्या मार्फत विद्वानांची व्याख्यानें करविणे, लहान लहान पुस्तकें प्रसिद्ध करून त्यायोगानें लोकांना आपल्या धर्माचे ज्ञान करवून देणें, वगैरे कार्यक्रमास सुरुवात केली. तसेंच तरुण कार्यकर्त्यांना आपली कर्तबगारी दाखवण्यास त्यांनी भरपूर वाव करून दिला. या संघाचेच अनुकरण करून पुढें कर्नाटकांत ठिकठिकाणीं ‘ वीरशैव तरुण संघ ’ स्थापन झाले, व कांहीं वर्षेपर्यंत अशा सर्व तरुणसंघाची वार्षिक अधिवेशनें ही भरत होती. ह्या सर्व कार्यांत श्री स्वामींना त्यावेळचे कर्नाटकचे नामांकित राष्ट्रवीर समाजसेवक कै. मंजाप्पा हर्डेकर यांची फार मदत झाली. या दोघांच्या प्रयत्नामुळें तेथील वीरशैव समाज खडबडून जागा झाला व त्यांच्यामध्ये नवचैतन्य निर्माण झाले. परंतु त्यावेळी स्वामीजींनी केलेले याच्यापेक्षांही महत्त्वाचे कार्य म्हणजे वीरशैव गरीब विद्या-

र्थ्यांना मदत करण्याकरतां 'वीरशैव विद्यावर्धक फंड' नांवाच्या संस्थेची स्थापना. प्रारंभी या कार्याला मुष्टीफंडापासून सुरुवात झाली विद्यार्थ्यांच्या राहण्याच्या व जेवण्याच्या सोयीकरता एक लहानसें विद्यार्थी निलयही स्थापले गेलें. प्रारंभी लहानशा प्रमाणावर सुरुं झालेलें हें कार्य स्वामीजींच्या सतत प्रयत्नानें व त्यांच्या कर्तबगारीने उत्तरोत्तर वाढत गेले. सांप्रत सुमारें शंभर विद्यार्थ्यांना या संस्थेचा लाभ मिळत आहे. या संस्थेची मदत घेतलेले शेंकडो विद्यार्थी पदवीधर होऊन सांप्रत मोंठमोठ्या हुद्यावर आहेत. अशा विद्यार्थ्यांमध्ये म्हैसूर राज्याचे सांप्रतचे मुख्यमंत्री व कर्नाटकचे सुप्रसिद्ध नेते श्री. निर्जलिंगप्पा यांची गणना होते, ही गोष्ट या संस्थेस भूषणावह आहे.

**बसवजयंती महोत्सव.**

त्याचप्रमाणे दावणगेरीतील आपल्या वास्तव्याच्या काळीं श्री मृत्युंजय महास्वामींनी आरंभिलेले दुसरे महत्त्वाचे कार्य म्हणजे '**बसवजयंती महोत्सव**'. बालपणापासूनच श्री बसवेश्वरांच्या व इतर शिवशरणांच्या चरित्रांचा त्यांच्या मनावर फार परिणाम झालेला होता व त्यांनी त्यांच्या वचन साहित्याचें गाढ मनन केलें होतें. एवढेच नव्हे तर आपल्या सर्व आयुष्यांत ते श्री बसवेश्वरांचाच आदर्श आपल्या दृष्टीपुढें ठेवून त्याप्रमाणें ते कार्य करीत होते. इतर साधुसंतांच्या जयंत्या साजऱ्या केल्या जात असतांना, श्री बसवेश्वरांसारख्या युगप्रवर्तक महात्म्याची जयंति साजरी करण्याचें कोणालाही सुचूं नये, हें पाहून त्यांना वाईट वाटत होतें. त्याकरतां त्यांनीं स्वतः ह्या बाबतीत पुढाकार घेऊन बसवजयंतीची तिथी निश्चित करून सन् १९११ सालीं बसवजयंती मोठ्या समारंभाने साजरी केली. तेव्हापासून ह्या जयंतीला चालना मिळाली व सांप्रत ही जयंती सर्वत्र मोठ्या समारंभाने प्रतिवर्षी साजरी केली जात आहे.

**धारवाड मुरघामठाचे अधिपतीस्थानीं नेमणूक.**

याप्रमाणें दावणगेरी शहरांत यशस्वी रीतीने समाजोन्नतीचे कार्यक्रम अमलांत आणून त्या भागात अभूतपूर्व जागृति निर्माण केल्यानंतर त्यांना तेथून धारवाडला जाण्याचा योग आला. चित्रदुर्ग शून्य सिंहासन धर्मपीठाचा एक शाखामठ धारवाडला आहे. त्या मठाला नवीन अधिपती निवडावयाचा होता. श्रीमृत्युंजय स्वामींची कीर्ति त्यावेळीं कर्नाटकांत चोहोकडे पसरली होती. त्यामुळें आपल्या मठाला श्रीमृत्युंजय स्वामींचीच निवड करावी असा धारवाडच्या नागरिकांनी चित्रदुर्गच्या

श्री ज. गु. जयदेव मुरुघेंद्र स्वामींना गळ घातली. परंतु दावणगिरीचे लोकही त्यांना सोडावयास तयार नव्हते. त्यावेळीं धारवाड हे कर्नाटकांतील मुख्य शिक्षण केंद्र असून, ते कर्नाटकातील सर्व सार्वजनिक कार्याचेही केंद्र बनले होते. जगद्गुरुना श्रीं मृत्युंजय स्वामींच्या कर्तबगारीची पूर्ण जाणीव होती. असे कर्तबगार स्वामी धारवाड येथे राहिल्यास त्यांच्या कर्तबगारीचा लाभ नुसत्या धारवाडला नव्हे तर साऱ्या कर्नाटकाला मिळेल ह्या दूरदृष्टीनें विचार करुन त्यांनीं त्यांना धारवाडचें निमंत्रण स्वीकारण्यास सांगितले. त्याचप्रमाणें त्यांच्या गुरुंनीहीं त्यांस धारवाडला जाण्याचा सल्ला दिला. धारवाड कर्नाटकचें प्रसिद्ध केंद्र असले तरी त्यावेळी तेथील ह्या मठाची परिस्थिती फारच शोचनींय होतीं. त्या मठाला कांहींच उत्पन्न नव्हतें. मठही म्हणजे नादुरुस्त झालेलें एक मोडकें घर. अशा मठाचा अधिपति होण्यास कोणीही सामान्य मनुष्यसुद्धां तयार झाला नसता. परंतु निष्काम कर्मयोगी श्रीमृत्युंजय स्वामींनीं गुरुंची आज्ञा शिरसावंद्य मानून सन १९१६ सालीं धारवाडला प्रयाण करुन तेथील नाममात्र मठाचे मठाधीश बनले.

### सार्वजनिक कार्यारंभ, प्रसादनिलयाची स्थापना.

धारवाडला आल्याबरोबर आपल्या स्वभावाप्रमाणें त्यांनी तेथेही तावडतोब सार्वजनिक कार्यास प्रारंभ केला. प्रथम भक्तांच्या साह्यानें मठाची थोडीशी डागडुजी केली व संस्कृत पाठशाला सुरुं केली. यांत प्रथम पांचच विद्यार्थी होते. शहरातून मागून आणलेल्या भिक्षेवरच ते व विद्यार्थी आपला उदरनिर्वाह चाल- वित होते. परंतु हळू हळू तेथील लोकांना स्वामींजींच्या सार्वजनिक कार्याची कळकळ, निस्पृह बाणा ,नम्र स्वभाव, सदाचारी वर्तन, वगैरे सद्गुणांची जाणीव होऊन ते त्यांच्याकडे आकर्षिले गेले व त्यांनी आरंभलेल्या कार्यास स्वेच्छेनें सक्रीय मदत करूं लागलें

उच्च शिक्षणाच्या दृष्टीनें कर्नाटक त्यावेळी फारच मागसलेला होता. साऱ्या उत्तर कर्नाटकांत त्यावेळी चारच हायस्कुले होतीं व तींही बेळगांव धारवाड शहरांतच होती. साऱ्या कर्नाटकांत एकही कॉलेज नव्हते. सन १९१९ सालीं सरकारनें धारवाडला सरकारी कॉलेज काढण्याचे ठरविले. त्यावेळीं मुंबई कौन्सिलच्या एका सन्माननीय विद्वान(?) नामदारानें (चितळे) धारवाडला कॉलेज सुरुं करणें म्हणजे एका निर्जन घोर जंगलात कॉलेज सुरुं करण्यासारखे आहे, असे वक्तव्य केले होते. याच्यावरून त्यावेळच्या कर्नाटकातील शिक्षणाच्या

परिस्थितीची कल्पना येईल. अशा परिस्थितीत उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना धारवाडला येऊन रहावे लागत होते. परंतु तेथे गरीब विद्यार्थ्यांकरतां कांहींच व्यवस्था नसल्यामुळें अशा विद्यार्थ्यांची कुचंबणा होत होती. स्वामीजींनी ही परिस्थिती जाणून गरीब विद्यार्थ्यांना मोफत राहण्याची व जेवणाची व्यवस्था करण्याकरतां सन १९१७ साली आपल्या मठांत प्रसाद निलयाची (मोफत विद्यार्थी वसति गृहाची) स्थापना केली. त्यावेळी हा एक अभिनव उपक्रम होता. साऱ्या वीरशैव समाजात त्यावेळी दोन तीनच विद्यार्थी वसतिगृहे होती. परंतु ती गरीब विद्यार्थ्यांकरतां मोफत नव्हती. त्या दृष्टीने साऱ्या वीरशैव समाजात हे पहिलेच मोफत 'प्रसाद निलय' म्हणण्यास हरकत नाही. आतां हे प्रसाद निलय भरभराटींत असून त्याकरतां लोकांकडून भरपूर देणग्या मिळत असल्या तरी आरंभीं हे प्रसाद निलय चालविण्यास स्वामीजींना भारी कष्ट करावे लागले. ह्या संस्थेकरतां फंड गोळा करण्याकरतां त्यांना खेडोपाडो हिंडावें लागलें. त्यावेळीं ते आपल्या लिंगपूजेचे सामान व थोडासा कपडालता एका हशवींत (पिशवी) भरुन ती हशवी खांद्यावर टाकून एकटेच अनवाणी खेड्याहून खेड्यास प्रयाण करीत. खेड्यांत गेल्यावर तेथे एकाद्या भक्ताच्या घरीं, नाहींतर देवळांत अथवा मठांत वस्ती करीत व सर्व ग्रामस्थांना जमवून त्यांना धर्मोपदेश करीत. त्याचवेळीं त्यांना आपण आरंभिलेल्या कार्यांची माहिती देत. ग्रामस्थ ही त्यांच्या कार्याचें महत्व जाणून आपल्या शक्तीनुसार धनधान्याच्या रुपाने देणग्या देत असत. अर्थात्च या देणग्यामध्यें पैशाचा भाग फारच कमी असून आहारधान्य व इतर सामानाचा भागच मोठा असे. त्यावेळीं श्रीमंत लोकांना प्रसादनिलयाचें महत्व कळलें नसल्याकारणानें कांहीं वर्षे पर्यंत त्यांना मोठाल्या देणग्या मिळाल्याच नाहींत. हें प्रसादनिलय चालविण्यांत त्याना आरंभी कितीतरी अडचणी आल्या. परंतु या सर्व अडचणींना तोंड देऊन व अत्यंत चिकाटीनें सतत प्रयत्न करुन त्यांनी ही संस्था भरभराटीस आणली. सांप्रत या संस्थेत तीनशे विद्यार्थ्यांची मोफत व्यवस्था केली जाते. त्यांना राहण्याकरतां त्रेसष्ट पुरातन संताच्या नांवानें त्रेसष्ट खोल्यांची एक भव्य इमारत उभारली गेली आहे. तेथल्या विद्यार्थ्यांना सात्विक पण पौष्टिक आहार दिला जातो. या प्रसाद निलयाकरतां आजपर्यंत सुमारें सात लाख रुपये खर्च झाले असून हजारो गरीब विद्यार्थ्यांना त्याचा लाभ झालेला आहे. त्यांच्यापैकीं कांहीं जण आज पदवंधर बनून आमदार, नामदार, खासदार, न्यायाधीश, डॉक्टर्स, वकील इत्यादि मोठमोठ्या हुद्यांवर काम करीत आहेत. स्वामीजींनी यशस्वीरीतीनें चालविलेल्या ह्या संस्थेचें अनुकरण करुन सांप्रत कर्नाटकांत व महाराष्ट्रांतही अशा अनेक संस्था स्थापन झाल्या आहेत व हजारो गरीब विद्यार्थी त्याचा लाभ घेत आहेत. असे असले तरी स्वामीजींच्या ह्या

संस्थेंची जीं कांहीं वैशिष्ट्यें आहेत ती अन्य संस्थात आढळून येत नाहींत. ती वैशिष्ट्यें खालीं दिली आहेत.

१) सरकारी ग्रँट घेतली असतां सरकारी नियमांचे बंधन स्वीकारावे लागतें म्हणून स्वामीजींनी आजपर्यंत सरकारी ग्रँट मुळीच न घेंता स्वप्रयत्नानें लोकाकडून देणग्या मिळवून त्यांनी ही संस्था चालविलीं आहे.

२) या प्रसादनिलयातील सर्व विद्यार्थ्यांना धार्मिक व नैतिक शिक्षण दिलें जातें.

३) सामान्यत: विंद्यार्थ्यांकरतां खोल्या वांधण्यास देणग्या देणाऱ्यांची नांवें त्या खोल्यावर कोरली जातात, परंतु स्वामीजींनी ही प्रथा मोडून देणगीदारांच्या संमतीनें ह्या खोल्यावर त्रेसष्ट पुरातन संतांची नांवें कोरुन त्यांनीं लोकांना एक आदर्श धडा घालून दिला आहे.

४) नुसत्या पुस्तकी ज्ञानानें विद्यार्थ्यांची सर्वांगीण उन्नति होत नाहीं. त्याला जगाच्या अनुभवाच्या ज्ञानाची जोड पाहिजे. स्वामीजींना या गोष्टीची पूर्ण जाणीव होती म्हणून सुट्टीच्या दिवसांत विद्यार्थ्यांच्या प्रवासाचा कार्यक्रम आंखून ते स्वत: त्यांना घेऊन प्रवासास जात. अशा प्रवासात त्यांच्याबरोबर शंभरदीडशे विद्यार्थी असत. त्या सर्वांची व्यवस्था व प्रवासखर्च ते स्वत: करीत. अलीकडे बहुतेक शिक्षण संस्था विद्यार्थ्यांना प्रवासास नेतात. परंतु तें नुसते प्रेक्षणोय स्थळे पाहण्याकरितां. त्यांत विद्यांर्थ्यांना देशातील ग्रामीणजीवनाचे ज्ञान मिळत नाहीं. परंतु स्वामीजींच्या विद्यार्थ्यांचे दौरे वैशिष्ठचपूर्ण होते. ते आपल्या विद्यार्थ्यांचा मेळा घेऊन खेडयातून संचार करीत. मुक्कामाच्या ठिकाणी विद्यार्थ्यांसमवेत गांवातील रस्त्यांची साफसफाई करीत. तेथील लोकांची सभा भरवून त्यांत ते स्वत: धार्मिक विषयावर प्रवचन करीत. तसेंच त्या सभेत आपल्या विद्यार्थ्यां-कडून शिवशरणांची वचने म्हणविणें, भक्तिगीते गाणे, भजन करणें, वगैरे कार्यक्रम ही करवीत. कांहींकांहीं ठिकाणी तर ते आपल्या विद्यार्थ्यांकडूनही प्रवचनें करवीत. अशा सर्व कार्यक्रमामुळें लोकामध्ये धर्मजागृति होत होती व विद्या-र्थ्यांच्या ज्ञानातही भर पडत होती. स्वामीजींच्या या धर्मोन्नतीच्या कार्यामुळे व ते गरीब विद्यार्थ्यांकरतां निस्वार्थ बुद्धीने करीत असलेल्या कार्याचे प्रत्यक्ष दृष्य विद्यार्थीरूपानें लोकापुढे उभें रहात असल्यामुळे, लोकांत त्यांच्याबद्दल आदरभाव वाढून, आपल्या विद्यार्थीमेळ्यासह ते आपल्या गांवी आल्यावेळीं, लोक त्यांचा मोठा आदरसत्कार करून त्यांची सर्व व्यवस्था करीत. तसेच स्वामीजी

व त्यांचे विद्यार्थी यांची राहणी अत्यंत साधी असल्यामुळें त्यांची व्यवस्था करण्यास लोकांनाही विशेष प्रयास करावे लागत नसत. अशा प्रकारचे दौरे स्वामीजींनी कांहीं वर्षे काढले. परंतु पुढे वार्धक्यामुळें त्यांना पायी प्रवास करणें अशक्य झाल्यावर हा दौऱ्याचा कार्यक्रम रहित करावा लागला. या सर्व हकीगतीवरून गरीब विद्यार्थ्यांना सहाय्य करून व त्यांना सर्वांगीण शिक्षण देऊन आपल्या आगामी जीवनासाठी त्यांना कार्यक्षम बनविण्याकरतां ते स्वतः किती कष्ट सोशीत असत याची कल्पना येते.

## अखिल भारत शिवानुभव संस्थेची स्थापना.

बाराव्या शतकांत श्री बसवेश्वरादि शिवशरणांनी स्थापिलेल्या शिवानुभव मंटपाच्या कार्याचा स्वामीजींच्या मनावर फारच परिणाम झालेला होता. सांप्रत काळींसुद्धां अशी एक संस्था स्थापून त्या मार्फत लोकांत धर्मप्रचार करण्याची आवश्यकता आहे, ही गोष्ट जाणून स्वामीजींनी कांहीं विद्वानांच्या सल्यानें सन १९४० सालीं आपल्या मठांत 'अखिल भारत शिवानुभव संस्थेची स्थापना केली. ह्या संस्थेची वार्षिक अधिवेशनें कांहीं वर्षे कर्नाटकाच्या निरनिराळ्या भागांत भरविलीं गेली. अशा अधिवेशनांस अनेक विद्वान लोक व पंडित येऊन अधिवेशनाच्या कार्यक्रमांत भाग घेतात व अनेक धार्मिक विषयांवर प्रवचन व चर्चा करतात. जनसमुदायही मोठ्या प्रमाणावर जमतो. अशारीतीनें कर्नाटकातील निरनिराळ्या भागांतील लोकामध्ये धर्मजागृति केली जाते. याप्रमाणें कांहीं वर्षे हीं अधिवेशनें निरनिराळ्या भागांत भरविल्यानंतर अलीकडे या संस्थेची अधिवेशनें धारवाडांत भरविली जात आहेत.

## शिवानुभव परीक्षांची योजना

आपल्या देशाची राज्यघटना निधर्मी स्वरुपाची असल्यामुळे व देशांत निरनिराळे धर्म प्रचलित असल्यामुळे आपल्या देशाच्या शिक्षण कार्यक्रमांत धार्मिक शिक्षणाचा समावेश झालेला नाहीं. विद्यार्थ्यांना धार्मिक शिक्षण देण्याची योजना अनेक अडचणीमुळें अजूनही अस्तित्वात येत नाही. स्वामीजींनी ह्या बिकट प्रश्नाचा विचार करुन निदान आपल्या समाजापुरता तरी हा प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीनें त्यांनी वीरशैव धर्मीच्या विद्यार्थ्यांना धार्मिक शिक्षण देण्याची एक महत्वाची व अभिनवपूर्ण योजना आखून, ती ह्या सातआठं वर्षांत अंमलात आणली आहे. या योजनेचे सामान्य स्वरुप खाली लिहिल्याप्रमाणें आहे.

१) या योजनेत विद्यार्थ्यांकरतां प्रवेश, परिचय व भूषण अशा तीन परीक्षा नियुक्त केल्या आहेत. परीक्षेच्या अभ्यासक्रमाकरतां वीरशैव धर्माचीं तत्वें, त्याचा इतिहास व आचारविचार, तसेच वीरशैव संतांचीं चरित्रें वगैरे विषयावर निरनिराळ्या विद्वांनाकडून सोप्या कन्नड भाषेंत लहान लहान पुस्तके लिहवून तीं या परीक्षा करतां क्रमिक पुस्तकें म्हणून मंजूर केली आहेत.

२) ह्या क्रमिक पुस्तकांचा अभ्यास करीत असतांना विद्यार्थ्यांना शिक्षकांच्या मार्गदर्शनाची आवश्यकता आहे. त्याकरतां ठिकठिकाणी असे शिक्षक नेमले गेले आहेत. सामान्यतः हे शिक्षक स्थानिक कार्यकर्ते असून त्यांच्यामध्यें प्राथमिक शिक्षकांचाच भरणा जास्त आहे. हे सर्व शिक्षक विनावेतन आपापल्या केंद्रातील विद्यार्थ्यांना धार्मिक क्रमिक पुस्तकांचा अभ्यास करण्यांत सहाय्य करतात.

३) परंतु या शिक्षकांनाही आरंभी आपल्या धर्माचे ज्ञान नसते, म्हणून अशा शिक्षकांना धार्मिक शिक्षण देण्याकरतां दरसाल सुमारे दहा दिवसाच्या मुदतीचा एक ट्रेनिंग क्लास ( Training Class ) या संस्थेतर्फे चालविला जातो. ह्या वर्गांत दररोज निरनिराळ्या विद्वानांची व्याख्यानें व चर्चा करवून शिक्षकांना धार्मिक शिक्षण दिले जाते. तसेच या वेळीं शिक्षकांच्या अडीअडचणींचाही विचार करून त्यांना जरूर असलेलें सहाय्य व मार्गदर्शन केलें जातें.

४) ह्या परिक्षा घेण्याकरतां परिक्षामंडळ नेमले आहे. ज्या ज्या ठिकाणीं हे शिक्षक कार्य करीत आहेत त्या सर्व ठिकाणीं परिक्षा केंद्रे उघडली आहेत अशा प्रत्येक केंद्रांत तेथील विद्यार्थ्यांची परिक्षा घेण्याची व्यवस्था तेथील शिक्षकच करतात. परिक्षा मंडळ परीक्षाकरतां प्रश्न पत्रिका तयार करुन परिक्षा केंद्रांना धाडतात व तेथील शिक्षक विद्यार्थ्यांची परिक्षा घऊन त्यांच्या उत्तर पत्रिका परिक्षा मंडळाकडे पाठवतात. नंतर परीक्षक उतर पत्रिका तपासून निकाल जाहीर करतात.

५) परीक्षांत पास झालेल्या विद्यार्थ्यांना सर्टिफिकिटे दिली जातात. प्रत्येक केंद्रांत छोटासा समारंभ करुन अशा समारंभांत हीं सर्टिफिकिटे वांटली जातात, व त्यावेळी विद्यार्थ्यांना धार्मिक उपदेशही केला जातो. विशेष प्राविण्य दाखवलेल्या विद्यार्थ्यांना सोन्यारुप्यांची पदकें व पारितोषकें देऊन त्यांचा जाहीरसभेंत गौरव केला जातो. ट्रेनिंग क्लासमध्यें शिक्षण घेतलेल्या शिक्षकांनाही प्रशस्तिपत्रकें देऊन त्यांचाही

गौरव केला जातो. वर लिहिल्याप्रमाणें ही योजना अंमलात आली असून त्याचें जाळें सर्व कर्नाटकभर पसरलेले आहे. परीक्षेकरतां निवडलेलीं पुस्तकें सोपी व थोडी असल्यामुळें विद्यार्थ्यांच्या नित्य शालेय अभ्यासांत व्यत्यय न येतां विद्यार्थी हा धार्मिक अभ्यास मोठ्या हौसेने करतात. तसेंच धार्मिक शिक्षणाची तळमळ असणाऱ्या शालेय शिक्षकांनासुद्धां एवढे धार्मिक कार्य करण्यास विशेष कांही प्रयास पडत नाहींत. यामुळें ही योजना दिवसेंदिवस फारच लोकप्रिय होंत चालली आहे. सांप्रत कर्नाटकात या योजनेची सुमारे शंभर परीक्षा केंद्रे उघडली असून त्या परीक्षांना दरसाल सुमारे तीन हजार विद्यार्थी बसतात. त्यांत सात आठशें विद्यार्थिनी असतात. शिक्षकांच्या ट्रेनिंग क्लासचा स्थानिक खर्च त्या त्या ठिकाणचे स्थानिक लोक करतात. बाकीचा खर्च शिवानुभव संस्था करते. अलीकडे या ट्रेनिंग क्लासला येणाऱ्या शिक्षकांची संख्याही वाढत चालली आहे. सुमारे शंभर एक शिक्षक ट्रेनिंग क्लासला येतात. त्यामध्यें सुमारे पंधरावीस स्त्रिया असतात. ह्या सर्व योजनाकरतां शिवानुभव संस्था दरसाल सुमारे पंधरा हजार रुपये खर्च करते. ह्या संस्थेचे प्रणेते व मुख्य सूत्रधार स्वामींजी असले तरी ह्या संस्थेच्या कोणत्याही अधिकारी स्थानावर ते नाहीत, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. सांप्रत या शिवानुभव संस्थेचे कार्याध्यक्ष बळ्ळारीचे माजी M. L. C. व श्रींचे निष्ठावंत भक्त उद्योगपति वाय. महाबळेश्वराप्पा हे आहेत. त्यांनी आपल्या सहकारी कार्यकर्त्यांसमवेत संस्थेचें कार्य आदर्श व उज्वल ठेवलें आहे.

धार्मिक शिक्षणाची ही योजना महाराष्ट्रातील वीरशैव समाजांतही अमलांत आणावी अशी स्वामीजींची प्रबल इच्छा होती. परंतु त्याच्याकरतां जरूर असलेली वीरशैव धर्मावरील मराठी क्रमिक पुस्तके लिहिणारांचा व विद्यार्थ्यांना त्या पुस्तकांच्या अभ्यासात सहाय्य करून त्यांची परिक्षा घेणाऱ्या शिक्षकांचा अभाव असल्यामुळे त्यांना ही योजना महाराष्ट्रांत अमलांत आणता आली नाहीं. परंतु अलीकडे एकदोन वर्षांत गडहिंग्लजचे श्री. घटिगेप्पा मजती या समाजकार्यकर्त्यांनी ३–४ प्राथमिक पुस्तकांचे मराठींत भाषांतर केल्यावर कोल्हापूर, सांगली, मिरज, जयसिंगपूर ह्या भागांत ही योजना अंमलांत आणण्याची व्यवस्था झाली आहे. पहिल्या प्रवेश परिक्षेकरतां जरूर असलेलीं क्रमिक पुस्तकें मराठींत प्रसिद्ध केली गेली असून त्या भागांतील कांही विद्यार्थी प्रवेश परिक्षेचा अभ्यास करीत आहेत. त्यांची परिक्षा घेण्याकरतां दहा परीक्षा केंद्रे उघडली गेली असून ह्या पहिल्या परीक्षेस सुमारे शंभर दोडशे विद्यार्थी बसतील असा अंदाज आहे. महाराष्ट्रातील वीरशैव समाजाच्या मुख्य मुख्य केंद्रांत ही

योजना अंमलात आणण्याचा शिवानुभव संस्थेचा विचार असून त्यांच्याशीं याबाबतीत अखिलभारत वीरशैव संघही सहकार करीत आहे.

## साहित्य प्रकाशन.

बाराव्या शतकापासून आजपर्यंत अनेक शिवशरणांनीं व वीरशैव कवींनी वीरशैव धर्मासंबंधी बहुमोल ग्रंथ रचले आहेत. त्यांपैकी कांहीं ग्रंथांचें प्रकाशन झाले असले तरी अनेक हस्तलिखित ग्रंथ अजून प्रकाशनाअभावीं असेच पडून आहेत. वीरशैव धर्मोन्नतीच्या दृष्टीनें या सर्व ग्रंथांचें संपादन व प्रकाशन होणें जरूर आहे. ही गोष्ट जाणून स्वामीजींनी सन १९४१ सालीं 'बाललीला महंतेश ग्रंथमाला' नांवाची ग्रंथमाला सुरु केली आहे, व विद्वानांकडून महत्त्वाच्या जुन्या ग्रंथांचे संपादन करवून ते या मालेंत प्रकाशित केले आहेत. तसेंच आधुनिक काळाला अनुसरून त्यांनी नवीन ग्रंथरचनाही करवून ते प्रकाशित केले आहेत. या ग्रंथमालेतून आजपर्यंत लहान मोठे सुमारे पन्नास ग्रंथ प्रकाशित झाले आहेत. तसेच शिवानुभव संस्थेच्या कार्याचा व स्वामीजींच्या इतर सार्वजनिक कार्याचा प्रचार करण्याकरतां ह्या संस्थेतर्फे 'सावधान' नांवाचें पाक्षिकही सन १९४७ सालापासून नित्यनियमानें प्रकाशित केले जात आहे. या ग्रंथप्रकाशनाच्या कार्याकरतां आजपर्यंत लाखो रुपये खर्च झाले आहेत.

## गुरुचेंद्र शिवयोगी यात्रामहोत्सव.

श्री मृत्युंजय स्वामींचीं गुरुभक्ती अनुपम व आदर्शनीय होती. अथणी येथील आपल्या गुरुच्या आश्रमांत असतांना ते त्यांच्या सेवेत किती निमग्न असत हें वर दाखविलेंच आहे. मठाधीश झाल्यानंतर ते सदासर्वकाळ सार्वजनिक कार्यांत निमग्न असले तरी ते त्यांतल्या त्यांत वेळ काढून प्रतिवर्ष नित्य नियमानें आपल्या गुरुंची भेट घेत. कांहीं वर्षानंतर त्यांचे गुरु लिंगैक्य झाल्यानंतर सुद्धा त्यांनीं हा परिपाठ चालूच ठेवला. परंतु तेवढ्याने त्यांचें समाधान न होतां आपणाला आपल्या गुरुंचे सांनिध्य सतत मिळावे म्हणून सन १९२८ सालीं त्यांचीं एक सुंदर शुभ्र संगमरवरी मूर्ति प्रसादनिलयाच्या मध्यभागीं स्थापून त्यांच्या नांवानें दरसाल माघ शुद्ध पंचमीस यात्रामहोत्सव करण्याचा प्रघात पाडला. हा यात्रामहोत्सव इतर यात्रेप्रमाणें नसून त्यांनी त्याला धार्मिक व सांस्कृतिक संमेलनाचे स्वरुप दिले आहे. या महोत्सवाला कर्नाटकाच्या निरनिराळ्या भागांतून अनेक विद्वान, शास्त्री, पंडित, पुराणिक, कीर्तनकार वगैरे येतात. एवढेच नव्हे तर

संगीततज्ञ, वाद्यकार, गायक, शाहीर, लावण्या, व गीगी पदाचे मेळेवाले, वगैरे कलाकारही येतात. तसेंच स्वामींजीच्या आमंत्रणावरुन कांहीं मठाधीशही या महोत्सवास हजर राहून भक्त मंडळीस धर्मोपदेश करतात. हा महोत्सव दरसाल चित्रदुर्ग मठाच्या श्री जगद्‌गुरुंच्या देखरेखीखाली सतत पांच दिवस साजरा केला जातो. प्रत्येक दिवसाचा कार्यक्रम, महोत्सवास आलेल्या एकेका मठाधीशांच्या अध्यक्षतेखाली आचरला जातो. सकाळपासून रात्री दहावाजेपर्यंत पुराणवाचन, प्रवचन, कीर्तन, वचनवाचन, गायनतज्ञांच्या बैठका, लावणी, गी गी पदे गाणाऱ्यांचे कार्यक्रम, असे विविध धार्मिक व सांस्कृतिक कार्यक्रम सतत चाललेले असतात. त्यामुळे हा महोत्सव म्हणजे लोकांना ज्ञानसंपादन करण्यास उघडलेलें ज्ञानसत्रच म्हणावयास हरकत नाहीं. या महोत्सवास येणारे विद्वान, शास्त्री, पंडीत व कीर्तनकार यांचा त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें मानसन्मान केला जातो. तसेंच विविध कलाकारांनाही पारितोषिकें व बिदागी देऊन त्यांच्या कलेचें चीज केले जाते. शिवाय या महोत्सवाच्यावेळीं विद्वज्जनांची परिषद, ग्रंथप्रकाशन, शिवानुभव संस्थेचे वार्षिक संमेलन, वगैरे इतर महत्त्वाचे कार्यक्रमही आचरले जातात. ह्या महोत्सवाचे एक वैशिष्टच म्हणजें परगांवाहून या महोत्सवास आलेल्या सर्वजातींच्या व धर्माच्या लोकांना राहण्याची स्नानाची व जेवणखाणाची मोफत व्यवस्था मठाकडून केली जाते. दररोज सुमारे दहापंधरा हजार लोकांच्या जेवणाची व्यवस्था करावी लागते. ही सर्व व्यवस्था स्वामींच्या देखरेखीखालीं चोखरीतीनें केली जाते. प्रसादनिलयाचे तीनशे विद्यार्थी व इतर भक्तगण, कांहीं स्वयंसेवक, ह्या महोत्सवाचेवेळी लोकांची व्यवस्था करण्यांत सदैव तत्पर असतात. या सर्व कार्यक्रमामुळें व या महोत्सवात दिसून येणाऱ्या सात्त्विक व धार्मिक वातावरणामुळें या महोत्सवाचे महत्त्व दिवसेंदिवस वाढत असून त्याला येणाऱ्या लोकांची संख्याही वाढत आहे. ह्या पांच दिवसांत ह्या मठाला एकाद्या प्रसिद्ध धार्मिक क्षेत्राचेंच स्वरुप प्राप्त होते.

**स्वामीजींच्या कार्यपद्धतीचें वैशिष्टच.**

वरील हकीगतीवरून स्वामीजींच्या सार्वजनिक कार्याचा पसारा किती व्यापक आहे याची कल्पना येईल. ह्या सर्व कार्यांकरता दरसाल सुमारे एक लाख रुपये खर्च येतो व हा सर्व खर्च त्यांना मिळालेल्या देणग्यातूनच चालतो. तसेच स्वामीजींच्या सार्वजनिक कार्यांचा व्याप नुसते धारवाडपुरते मर्यादित नसून ते सर्व कर्नाटकभर पसरलेले आहे. कर्नाटकाच्या सर्व भागांत अनेक वेळां संचार

करून त्यांनी ठिकठिकाणच्या मठांचा जीर्णोद्धार केला व विद्यार्थी निलये व शिक्षणे फंड उभारण्यास मदत केली. त्यांच्या सार्वजनिक कार्याचीं स्मृतिचिन्हें आज अखंड कर्नाटकभर दिसून येत आहेत. निजाम हैद्राबाद फंड व मुंबईतील लिंगायत फंड व बसव सदन हीं त्यांच्याच प्रेरणेनें अस्तित्वांत आलीं आहेत. यावरून त्यांच्या सर्वव्यापक व विविधमुख सार्वजनिक कार्याची कल्पना येते. परंतु एवढें सर्व अवाढव्य कार्य करीत असतांना त्यांत त्यांची दिसून येणारी साधी, निस्पृह व कीर्तिविन्मुख वृत्ति अत्यंत प्रशंसनीय आहे. त्यांनीं एवढ्या सार्वजनिक संस्था स्थापन करून त्या चालविल्या होत्या तरी, त्या संस्थांच्या कोणत्याही अधिकारपदावर ते नव्हते. यात्रा महोत्सवाचे वेळीं सुद्धां महोत्सवास आलेल्या इतर मठाधीशांना मान देऊन आपण स्वतः मागें राहून महोत्सवाच्या सर्व कार्यक्रमाची देखरेख करीत. इतर मठाधीशाप्रमाणें त्यांनीं आपणांकरतां कधीही लवाजमा बाळगला नाहीं. त्यांचा प्रवासमुद्धां अगदीं साधा व अवडंबररहित असे. प्रवासांत एक सेवक व आवश्यक असलेलें पूजासाहित्य वगैरे थोडे सामान याच्याशिवाय ते आपल्याबरोबर दुसरें कांहीं घेत नसत. इतर मठाधीश सर्व संग परित्यागी असले तरी, संत महादेवीअक्कांनीं आपल्या एका वचनांत म्हटल्याप्रमाणें ह्या योग्यांना 'पराक्रमायेची' ( कीर्तीची हाव ) बाधा असते. परंतु श्री मृत्युंजय स्वामीजींना ह्या मायेचीही ( कीर्ती ) बाधा नव्हती. त्यांनीं कधींही पालखीत पाय ठेवला नाहीं कीं भक्तांना आपली मिरवणूक काढण्यास संमती दिली नाहीं. यामुळें कांहीं वेळां त्यांचे भक्त नाखुष होत असत. परंतु स्वामीजी त्यांची समजूत काढून, अशा दिखाऊ कार्यक्रमापासून त्यांना परावृत्त करीत. अशा रीतीनें प्राचीनकाळच्या शिवशरणाप्रमाणें आपलें सर्व आयुष्य जनतेच्या सेवेत घालवून, आपल्या वयाच्या ७७ व्या वर्षी त्यांनीं इहलोकीची यात्रा संपविली. अलीकडे कांहीं वर्षे ते वार्धक्यानें जर्जरीत झाले होते. शेवटी दि. १३ ऑक्टोबर १९६४ मंगळवार ( आश्विन शुद्ध अष्टमी शके १८८६ ) रोजीं प्रातःकाळीं ते आपला पार्थिव देह येथें सोडून लिंगैक्य झाले. ज्योतींत ज्योत मिळाली. ही दुःखद वार्ता हां हां म्हणतां सर्व कर्नाटकभर पसरली व सर्व भागांतून सर्व जातीचे व सर्व धर्मांचे लोक धारवाडला धावून जाऊन या महात्म्याच्या पार्थिव देहाला आपली भक्तीपूर्वक श्रद्धांजली वाहिली. शेवटी त्यांच्या पार्थिव देहाला त्यांच्या गुरूंच्या मूर्तीच्या सानिध्यांतच समाधी देण्यांत आली.

**शिष्य परंपरा.**

श्री स्वामीजींच्या लिंगैक्यामुळें सारे लोक हळहळले व त्यांनी स्थापलेल्या

अनेक संस्थांचें कार्य पुढें कसें चालणार अशी शंका कांहीं लोकांच्या मनांत उद्भवली आहे. परंतु ही शंका अस्थायीं आहे. स्वामीजी जसे कर्तबगार कर्मयोगीं होते त्या प्रमाणेंच त्यांचा चाणाक्षपणा व दूरदृष्टीपणा वाखाणण्याजोगा होता. आपल्या मागें आपलें कार्य अखंडरीतीनें व भरभराटीनें चालावें या दृष्टीनें त्यांनीं आपल्या ह्यातींतच या कार्याकरतां कार्यक्षम कार्यकर्तेही निर्माण केले आहेत. अशा निवडक कार्यकर्त्या मध्यें त्यांचे पट्टशिष्य व उत्तराधिकारी श्रीमन्निरंजन प्र स्व. महांत स्वामीजी हे प्रमुख आहेत. हे स्वामी आपल्या गुरुंचे 'शिष्यादिच्छेत्पराजयम्' अशांपैकी शिष्य आहेत. आपल्या गुरुप्रमाणे त्यांचीही गुरुभक्ती असामान्य आहे. त्यांनीं बालपणापासूनच सद्गुरुजवळ राहुन सेवाभावाने त्यांचें सर्व सद्गुण आत्मसात केले आहेत. गुरुप्रमाणें त्यांचीही वाणी प्रसादवाणी झाली आहे. त्यांचे आचार विचार व उच्चार गुरुवत् शिवशरणाप्रमाणेंच झाले आहेत. श्रीमृत्युंजय स्वामीजी वार्धक्यानें हतबल झाल्यानंतर श्री महान्तस्वामीजीच त्यांच्या सर्व सार्वजनिक कार्यांचे संचालन व देखरेख व्यवस्थितपणें व चोखरींतीनें करीत आहेत. त्यांमुळे श्रीमुत्युंजय महास्वामीजी लिंगैक्य झाले असले तरीं त्यांची उज्वल व भव्य परंपरा श्री महांत स्वामीजी मोठया कर्तबगारीनें चालवतील, एवढेंच नव्हेतर त्यांत जास्ती भर घालून वीरशैव समाजोन्नतीच्या कार्यक्रमांत ते भरीव कामगिरी करुन दाखवितील, असा सर्वांना आत्मविश्वास वाटतो. हा आत्मविश्वास सकारणीं ठरुन आपल्या गुरुप्रमाणें त्यांच्याकडूनही समाजोन्नतीचें भरीव कार्य घडून येवो अशीच सदिच्छा कोणीही वीरशैव प्रकट करील.



लेखांक ३

# वीरशैव वीर रमणी कित्तूर राणी चन्नम्मादेवी

लेखक : म. पु. पाटील

( सन्न १९६५ मार्च महिन्याच्या अंकांतील लेख )

ही शूर खरोखर मर्दानी, चन्नम्मा बिजली राणी ।

एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं इंग्रजांनीं हिंदुस्थानांतील मुगलशाही, मराठेशाही वगैरे प्रमुख हिंदू मुसलमानांची राज्यें खालसा करुन सर्व हिंदुस्थानभर इंग्रजशाही स्थापल्यानंतर हिंदुस्थानांतील लोकांचे डोळे उघडले. त्यांनीं आपापसांतील भेदभाव विसरुन एकजुटीनें सन १८५७ सालीं स्वातंत्र्याचा झेंडा उभारला, व परकीय सत्तेचे उच्चाटन करण्यासाठीं आटोकाट प्रयत्न केले. हा इतिहास आज सर्वांच्या परिचयाचा आहे. या स्वातंत्र्य लढ्यामध्यें नानासाहेब पेशवे, तात्या टोपे वगैरे मर्द वीराबरोवर खांद्यास खांदा लावून व आपलें प्राण पणास लावून लढणारी वीरांगना, झांशीची राणी लक्ष्मीवाई, हिचें नांवही हिंदुस्थानच्या इतिहासांत अजरामर झालें आहे. त्यांचप्रमाणें या स्वातंत्र्य लढ्याच्या पूर्वी कांहीं वर्षे म्हणजे सन १८२४ सालीं कर्नाटकांतील वीरशैव कित्तूर संस्थानची राणी चन्नम्मा हिनेंही राणी लक्ष्मींवाई प्रमाणे आपल्या संस्थानच्या

स्वातंत्र्या करतां शक्तीशाली इंग्रजसत्तेशीं लढा देऊन, त्यांना त्राही त्राही करुन सोडलें. हा इतिहास दुर्दैवानें कर्नाटकावाहेर कोणास विशेष माहीत नाहीं. या लढ्याचा इतिहासही स्फूर्तिदायक व बोधप्रद असल्याकारणानें त्याची हकीकत खालीं दिली आहे.

### कित्तूर संस्थानचा इतिहास.

कित्तूर हें गांव पुणें-बेंगळूर रस्त्यावर बेळगांव व धारवाड यांच्या मध्यावर वसलेले असून इतिहास प्रसिद्ध आहे. सुमारें १२ व्या शतकापासूनच या गांवच्या अस्तित्वा संबंधीं शिलालेख आढळून येतात. १६ व्या शतकाच्या उत्तर भागांत कित्तूरच्या आसपासच्या प्रदेशावर विजापूर आदिलशाहीची सत्ता प्रस्थापित झालेली होती. त्या बादशाहीच्या सैन्यामध्यें हिरेमल्ल व चिक्कमल्ल नांवाचे दोघे शूर अधिकारी होते.त्यांनीं दाखविलेल्या बहादुरीमुळें बादशहाकडून वडील भाऊ हिरेमल्ल याला हुबळी भागाच्या जहागिरीची सनद व समशेर-जंग-बहादूर हा किताब मिळाला होता. त्यांनीं व त्यांच्या वंशजांनीं कित्तूर आपले ठाणें करून तेथें किल्ला बांधला व तेथूनच ते आपल्या जहागिरीचा कारभार पांहू लागले. हिरेमल्ल बंधु व त्यांचे वंशज कर्तबगार, शक्तिशाली व चाणाक्ष राज्यकर्ते असल्यामुळे त्यावेळच्या अंदाधुंदीच्या परिस्थितीचा फायदा घेऊन त्यांनीं आपल्या जहागिरी– सभोवारचा मुलुखही आपल्या ताब्यांत घेऊन आपल्या मुलुखाचा दर्जा वाढविला. त्यामुळे त्याला संस्थानचा दर्जा प्राप्त होंऊन तें कर्नाटकांतील एक प्रमुख संस्थान म्हणून गणले जाऊं लागले. या संस्थानच्या भरभराटीच्या वेळीं सध्याच्या बेळगांव, धारवाड व कारवार जिल्ह्यांच्या बऱ्याच मोठ्या भागांवर त्यांचा अंमल चालत होता. हे संस्थानिक विजापूर बादशहाचे मांडलिक म्हणून मानले जात असले तरी ते नाममात्रच मांडलिक होते व आपल्या संस्थानचा कारभार स्वतंत्र रितीनेंच चालवीत होते. विजापूर आदिलशाहीच्या पतनानंतर हे संस्थान पेशव्यांच्या अमलांखाली गेले. तिसऱ्या पानिपतच्या लढाईच्या वेळी कित्तूर राजघराण्यांतील वीराप्पा देसाईनें पेशव्यांच्या वतीनें पानिपत लढाईमध्यें भाग घेतला होता. पेशव्यांचे मांडलिक म्हणून असतांना सुद्धा कराराप्रमाणें ठरलेली खंडणी घेण्याशिवाय पेशव्यांना संस्थानावर दुसरा कांही अधिकार नव्हता. कसलाही दुर्धर प्रसंग आला तरी त्याला धैर्यानें तोंड देऊन त्यांनीं आपला स्वाभिमान व स्वातंत्र्य कायम राखलें होतें.

### राजा मल्लसर्ज

कित्तूर संस्थानच्या राज्यकर्त्यांमध्ये मल्लसर्ज नांवाचा कर्तबगार, हुषार,

बुद्धीमान व चाणाक्ष राजा होऊन गेला. तो इ. स. १७८२ सालीं गादीवर आला. कितूर संस्थान जवळजवळ स्वतंत्रच असल्यामुळें पेशवे व टिपूसुल्तान या दोघां-कडूनही मलसर्जेला त्रास होत होता. खंडणी देण्याचे नाकारल्यामुळें टिपू सुलताननें कित्तूरवर स्वारी करून मल्लसर्जेला पकडून नेऊन कपाळदुर्ग तुरुंगांत ठेवलें. तो तेथून निसटून जाऊन, रानावनांत लपत छपत व अनन्वित हाल अपेष्टा भोगीत, शेवटीं आपल्या संस्थानला येऊन पोहोचला, व पेशव्याच्या सहाय्यानें टिपूच्या सैन्याला आपल्या संस्थानांतून हाकलून लावले. पुढे कांहीं काळानंतर पेशव्यांचे व त्याचे विनसल्यामुळे त्यांनीं त्याला पुण्याला बोलावून घेऊन तेथेंच तीन वर्षे नजरकैदेत ठेवले. ह्याप्रमाणें हालअपेष्टामध्येच त्याचे आयुष्य गेल्यामुळें नजर कैदेत असतांनाच त्याची प्रकृती बिघडली. तेव्हां पेशव्यानीं त्याला बंधमुक्त केले. परंतु प्रकृति फारच बिघडल्यामुळें आपल्या मायभूमीकडे येत असतांना वाटेतच इ. स. १८१६ सालीं त्याचें प्राणोत्क्रमण झालें. मरणसमयीं त्याला रुद्रम्मा व चन्नम्मा नांवाच्या दोन बायका, व तीन मुलगं होते. त्याच्या मरणानंतर त्याचा वडील मुलगा शिवलिंगसर्ज हा गादीवर आला.

## राणी चन्नम्मा

चन्नम्मा ही मल्लसर्जची धाकटी पत्नी. हिचा जन्म बेळगांवजवळच्या काकती येथील लिंगायत देसाई घराण्यांत इ. स. १७७८ साली झाला. ती जात्याच हुशार व चाणाक्ष होती. लहानपणापासूनच घोड्यावर बसून रपेट करणें, दांडपट्टा खेळणें, भाला बर्चीचे खेळ खेळणें, तीर मारणें, नेमबाजी वगैरे मर्दानी खेळांचा तिला नाद होता. प्रकृति धडधाकट असून ह्या सर्व मर्दानी खेळांत तिनें प्राविण्य संपादन केले होते. स्वभावानेंही गोड, सरळ, दिलदार असून थोर घराण्याला साजेल असेंच तिचें वर्तन होतें. त्यासर्वांवर कळस म्हणून ती रुपानेंही अत्यंत सुंदर होतीं. तिची ही सर्व शुभ लक्षणें पाहून मल्लसर्जनें तिच्याशीं लग्न केलें. लग्नानंतर ती कित्तूरला आल्यानंतर तिच्या कर्तबगारीला भरपूर वाव मिळाला. संस्थानच्या दैनंदिन राज्यकारभारांत ती नवऱ्याला मदत करूं लागली. साधारणतः सवत बायकांचे एकमेकाशीं पटत नाहीं, हा सामान्य नियम आहे. परंतु या नियमाला चन्नम्मा अपवाद ठरली. आपली वडील सवत रुद्रम्मा हिला वडील बहिणीप्रमाणें मान देऊन व तिच्याशीं प्रेमादरानें वागून तिनें तिचा स्नेह संपादन केला. राजघराण्यांतील सर्व माणसांशीं प्रेमानें व मिळून मिसळून वागून त्या सर्वांचें प्रेमही संपादन केलें. आपल्या दिलदार,

मनमिळाऊ व वात्सल्यपूर्ण स्वभावानें तिनें आपल्या प्रजेचेंही प्रेम संपादन केलें. तिने मल्लसर्जच्या गैरहजेरीत संस्थानचा कारभार अत्यंत चोख रितीनें चालवून आपल्या कर्तबगारीची व बुद्धिमत्तेची चुणूक सर्वांना दाखविली. त्यामुळें संस्थानातील लहान थोर सर्व लोक तिच्यावर बेहद्द खूष होते, व तिला आपली माता मानून तिचा आदरभाव करीत होते. परंतु दुर्दैवाने तिला कांहीं मूलबाळ नव्हते. ही एकच कमतरता तिच्या आयुष्यामध्ये होती. परंतु स्वभावानें ती दिलदार आणि निर्मत्सरी असल्यामुळें तिनें ही कमतरता आपल्या सवतमुलांवर प्रेम करून भरून काढली,

राजा शिवलिंगरुद्र.

राजा मल्लसर्जच्या मरणानंतर त्याचा वडील मुलगा राजा शिवलिंगरुद्र संस्था– नच्या गादीवर आला. हा रुद्रम्माचा मुलगा असला तरीं लहानपणापासून त्यांचे पालनपोषण चन्नम्मानेंच केलें होतें. त्याचें शिक्षणही तिच्या देखरेखी– खालींच झालें होतें. त्यामुळें त्याचे आपल्या आईपेक्षां चन्नम्मावरच जास्त प्रेम होते, व विश्वासही होता. तो गादीवर आल्यानंतरसुद्धां संस्थानच्या कारभारामध्यें तिचाच सल्ला घेई. याप्रमाणे अप्रत्यक्ष चन्नम्माच्या देखरेखी– खालींच संस्थानचा कारभार चालल्यामुळें संस्थानच्या प्रजाजनांचीही सर्व तऱ्हेनें भरभराट चालली होती. या सुमारास दक्षिण भागामध्यें पेशवे व व इंग्रज यांच्यामध्ये युद्ध चालू होतें. कित्तूरकरांचे व पेशव्यांचें विनसलेले पाहून, इंग्रजांचा त्यावेळचा सेनापती मन्रो यांनें पेशव्यांविरूद्ध कित्तूरकरांची मदत मागितली. पेशव्यांच्या अमानुष छळणुकीमुळें मल्लसर्ज राजाला प्राणाला मुकावें लागलें होतें, ही गोष्ट कित्तूरकरांना खटकत होती. पेशव्यांच्या विरूद्ध सर्वांचीच मनें विटलेलीं होतीं. अशा परिस्थितींत राजा शिवलिंगरुद्रानें पेशव्यांविरूद्ध इंग्रजांना मदत केली. परंतु ही मदत देण्यापूर्वी त्यानें इंग्रजांशी स्पष्ट करार करून दरसाल रु. १,७०,००० खंडणी देण्याच्या करारावर कित्तूरसंस्थान स्वतंत्ररीतीनें आपल्या घराण्यांत चालविलें जाईल असा तहनामा करून घेतला. ता. २८ जुलै १८१८ रोजी थॉमस मन्रोशीं केलेल्या तहनाम्यांत खालील करार नमूद आहे.

"An annual tribute of Rs. 1,70000 will be taken from you and the Sansthan continued to your children from generation to generation." यावरून ठरलेली खंडणी घेण्याच्या हक्काशिवाय

इंग्रजांचा संस्थानावर कोणत्याही तऱ्हेचा अधिकार नव्हता, ही गोष्ट स्पष्ट आहे.

**धारवाडचा कलेक्टर श्री. थॅकरे याची लूडबूड.**

सन १८१८ साली पेशवाईच्या पतनानंतर कर्नाटकांतील संस्थानिक व जहागीरदार यांच्याशी असलेल्या इंग्रजांच्या धोरणांमध्यें बदल झाला. त्यांना विरोध करणारी कोणतीही वलिष्ठ राजकीय शक्ति हिंदुस्थानांत राहिली नाहीं. यामुळें त्या लहान लहान संस्थानांच्या कारभारामध्यें ढवळाढवळ करण्याचे व संधी साधल्याबरोबर तीं संस्थानें रद्द करण्याचे त्यांचें धोरण सुरू झाले. कित्तूरकर संस्थानिक स्वातंत्र्यप्रेमा व प्रजाहितदक्ष असल्याबद्दल त्यांना जाणीव असल्यामुळे, सन १८१८ सालच्या तहनाम्याच्या वेळेपासून पांचसहा वर्षे त्यांनीं कोणत्याही रीतीनें संस्थानच्या कारभारांत हात घातला नाहीं. परंतु दुर्दैवानें राजा शिवलिंगरुद्र सन १८२४ च्या सप्टेंबरमध्यें मरण पावला. त्याला मूलबाळ नसल्याकारणानें मरणापूर्वी त्यांनें आपल्या एका नातेवाईकाच्या शिवलिंगाप्पा नांवाच्या मुलास दत्तक घेऊन, त्याप्रमाणें त्यावेळचा धारवाडचा कलेक्टर व रेसिडेंट थॅकरे यास कळविले हा थॅकरे दुष्ट, दुर्वर्तनी व हेकेखोर स्वभावाचा होता. इंग्रज सरकारच्या बदललेल्या धोरणाचा फायदा घेऊन व आयती चालून आलेली ही नामी संधी साधून, कित्तूर संस्थान खालसा करण्याच्या दुरुद्देशानें त्यानें ह्या दत्तकप्रकरणांत कुरापत काढली. कित्तूरला आपला सिव्हिल सर्जन पाठवून व दत्तकापूर्वीच राजा वारल्याचे दिसते, असा त्याच्याकडून खोटा रिपोर्ट घेऊन, हें दत्तक झालेलेंच नाहीं, व राजाच्या मरणानंतर त्याच्या कुटुंबियांनीं व नोकरांनीं हें खोटेंच दत्तक प्रकरण निर्माण केले आहे, असा मुंबई सरकारला रिपोर्ट पाठविला, व आपल्या सरकारच्या हुकुमाची वाटसुद्धां न पहातां तावडतोब कित्तूरला जाऊन तेथील खजिन्याला सील ठोकले, व संस्थानच्या मालमत्तेच्या देखरेखीकरतां आपले दोघे कारभारी नेमले. आपला राजा वारल्यामुळे तेथील सर्व मंडळी दुःखांत होती. अशा समयीं तेथें जाऊन सहानुभूतीचा एक उद्गारसुद्धां न काढतां त्यांनें खजिन्याला सील करून मालमत्तेचा तपास करण्याचा धुमधडाका चालविल्यामुळे सर्वांनाच त्याची चीड आली. सर्वांनीं या बाबतीत त्याच्याशीं सहकार करण्याचें नाकारले. त्याचप्रमाणें राणी चन्नम्मा व मृत राजाची विधवा पत्नी राणी ईरव्वा यांच्यामध्येंही भेदभाव उत्पन्न करण्याचा हीन प्रयत्न आपल्या हस्तकामार्फत केला. परंतु तोही साधला नाहीं. वस्तुतः त्याला संस्थानच्या कारभारामध्ये हात घालण्याचा

कांहींच अधिकार नव्हता. संस्थानिकानें दत्तक घेण्याकरितां इंग्रजसरकारची परवानगी घेणेची अट, त्यांच्यामध्यें झालेल्या करारामध्यें अथवा त्यावेळी काढलेल्या कोणत्याही सरकारी हुकुमामध्यें नव्हती. वादाकरतां, राजा जिवंत असतांना दत्तक झाले नव्हते असें गृहीत धरलें तरी, हिंदूकायद्याप्रमाणें त्याच्या विधवा पत्नीला दत्तक घेण्याचा संपूर्ण अधिकार होता. दत्तक मुलगा 'शिव–लिंगप्पा' ह्याला दत्तक घेण्याला विधवाराणी ईरव्वाची संपूर्ण संमती होती. त्याचप्रमाणें या दत्तकाच्या विरुद्ध राजाच्या कुटुंबापैकी किंवा त्याच्या नातेवाईका-पैकी कोणाचीही तक्रार नव्हती. असें असतांना संस्थानच्या कारभारामध्ये थॅकरेने चालविलेली ही लूडबूड अगदी अनधिकाराची व दुष्टपणाची होती. त्यावेळच्या त्याच्या वर्तनावरून कांहीं तरी निमित्त काढून संस्थान खालसा करण्याचाच त्याचा उद्देश आहे, हें सर्वांना स्पष्ट दिसून आलें.

## चन्नम्मा राणीची दक्षता.

थॅकरेच्या ह्या कारवाया पाहून चन्नम्मा राणींचें पित्त खवळले. संस्थान खालसा करण्याचाच त्याचा दुष्ट हेतू आहे हें तिनें पूर्णपणें जाणलें. त्यामुळे भविष्यकाळीं संस्थानावर ओढवणाऱ्या संकटाची तिला कल्पना आली. करितां लगेच तिनें संस्थानचा अधिकार आपल्या हातीं घेतला. दत्तक समारंभाच्या निमित्तानें आपल्या सर्व आश्रितांची व प्रजाजनांच्या पुढाऱ्यांची एक सभा कित्तूरला बोलावली. दत्तक प्रकरणाची व थॅकरेच्या लुडबुडीची सर्व हकीगत यापूर्वीच संस्थानच्या कोनाकोपऱ्यांत सुद्धा पोचली असल्याकारणानें, संस्थानचे सारे प्रमुख झाडून त्या सभेला हजर राहिले. राणी चन्नम्मानें त्यांच्यापुढे घडलेली सर्व हकीकत मांडली, व त्यांचा सल्ला विचारला. राणी चन्नम्माप्रमाणें संस्थानचे प्रजाजनही कट्टे स्वातंत्र्य प्रेमी व स्वामीभक्त होते. प्राण गेला तरी अपमानकारक अटी कबूल करावयाच्या नाहींत, व संस्थानला धक्का लागू द्यावयाचा नाही, व त्याकरतां आपण सर्वजण पाहिजे तो स्वार्थत्याग करण्यास व प्राण पणास लावून लढण्यास तयार आहों, असें सर्वांनीं एककंठानें सांगितले. संस्थानच्या कारभारांतील कांहीं थोड्याशा व्यक्तीमध्ये परस्पर व्यक्तीद्वेष होते. तेही तिनें सामोपचारानें मिटवून सर्वांची एकजूट केली. प्रत्येक खेड्यापाड्यांतून संस्थानचे सैनिक व खंदे वीर आपापलीं शस्त्रास्त्रें घेऊन कित्तूर किल्ल्यांत दाखल होऊ लागले. पुढच्या संकटाला तोंड देण्याचा कार्यक्रम आंखून, त्याप्रमाणें ताबडतोब कार्यास सुरवात केली. किल्ल्याचीं डागडुजी, अन्नसामुग्री व शस्त्रास्त्रांचा संग्रह वगैरे कार्यक्रमही रात्रंदिवस चालू राहिले. याप्रमाणे प्रसंग पडल्यास सुसज्जित रीतीनें लढण्याची जय्यत तयारी केली गेली.

### तडजोडीचे प्रयत्न

स्वातंत्र्य रक्षणाच्या दृष्टीनें ही तयारी चालू ठेवली तरी आपल्या चिमुकल्या संस्थानच्या शक्तीची चन्नम्माला पूर्ण जाणीव होती. आपण सर्वजण कितीही शौर्यानें लढलों तरी इंग्रज सरकारच्या अफाट सामर्थ्यापुढें आपला टिकाव लागणार नाहीं, हें तिला माहीत होतें. करितां शक्य ती सर्व खटपट करुन हा तंटा आपसातींत मिटवावा, व भविष्यकाळी होणारी प्राणहानी, वित्तहानी टाळावी, या उद्देशानें तिनें त्यावेळचे दक्षिणभागाचे कमिशनर व मुंबईचे गव्हर्नर यांच्याकडे खलिते पाठविले. दंगाधोपा करण्याचा किंवा बंड उभारण्याचा आपला मुळीच इरादा नसून, दत्तकाला मंजूरी देऊन आपलें संस्थान पूर्वीच्या कराराप्रमाणें दत्तक मुलाकडे चालवावे, व तसें केल्यास संस्थानच्या व इंग्रज सरकारच्या हिताच्या आड येणारी कोणतीही घटना येथे घडणार नाहीं, याबद्दल आपण हमी घेण्यास तयार आहों, असें कळवून त्यांच्याकडे रदबदली करण्याकरतां आपले वकीलही मुंबईपुण्याला धाडले. संस्थानचें स्वातंत्र्य राखण्याची हमी दिल्यास व सरकारची इच्छा असल्यास आपण काशीस जाऊन तेथेंच धर्माचरणामध्यें आपले शेवटचे दिवस घालविण्यास तयार आहों असेंही तिनें कळविलें. परंतु या सर्व खटपटीचा व रदबदलीचा कांहींच उपयोग झाला नाहीं. थॅकरेच्या खोटयानाटया रिपोर्टावर विश्वास ठेवून मुंबई सरकारनें तिनें केलेली विनंती धुडकावून लावली व दत्तक नामंजूर केलें.

### स्वातंत्र्य लढयाचा पहिला विजय

इकडे कित्तूरहून परत आल्यानंतर थॅकरेनें आपलें कारस्थान चालूच ठेवले. चन्नम्मा राणीच्या विरुद्ध व बंडाच्या तयारीचे अतिरंजित वर्णनाचे खोटेनाटे रिपोर्ट त्याच्याकडून सरकारकडे जातच होते. चन्नम्मा राणीशी खुद्द वाटाघाट करण्याच्या निमित्तानें त्यानें तिच्या भेटीची मागणी केली. परंतु त्याच्या दुष्ट हेतूची तिला पूर्ण जाणीव असल्याकारणानें त्याची भेट घेण्याचें तिनें स्पष्ट नाकारले. त्यानंतर संस्थानचे कारभारातील प्रमुख सरदार गुरुसिद्दप्पा वगैरे मंडळींना त्यानें आपल्या भेटीला धारवाडला बोलाविले. परंतु त्यांनीं सर्वांनीं त्याला भेटण्याचे स्पष्ट नाकारले. तेव्हां चिडून जाऊन आपण स्वतः कांही गोरे अधिकारी, व तोफखानासहीत लष्कर बरोबर घेऊन कित्तूरास जाऊन गांवाबाहेर तळ ठोकला. किल्ल्यांतील खजिना व इतर मालमत्ता तपासण्याच्या निमित्तानें किल्ल्यात शिरण्याचा प्रयत्न केला. परंतु चन्नम्माच्या आज्ञेवरुन पहारेकऱ्यांनी त्याला किल्ल्यांत येऊं दिलें नाहीं. नंतर संस्थानची तिजोरी व मालमत्ता सुरक्षित नाहीं, करितां जाणाऱ्या येणाऱ्यावर

देखरेख ठेवणें जरुर आहे, या निमित्तानें किल्ल्याच्या दरवाजावर आपले पहारेकरी नेमले.

दरवाजाचे आंत संस्थानचे पहारेकरी व बाहेर थॅकरेचे पहारेकरी, असा दुहेरी पहारा सुरु झाला. संस्थानच्या प्रमुख पुढाऱ्यांना निरनिराळे बोलावून त्यांच्यामध्यें तट पाडण्याची खटपट केली. पण तोही प्रयत्न फुकट गेला. तेव्हां त्यानें त्यांना दहशत घालून संस्थानची तिजोरी व मालमत्ता सुरक्षित ठेवण्याबद्दल हमी मागितली. परंतु राणी चन्नम्माच्या आज्ञेशिवाय आपण कांहीं करण्यास तयार नाहीं असें त्या सर्वांनीं स्पष्टपणें सांगितले. त्यामुळें चिडून जाऊन त्यांना आपला दरारा दाखवून शरण येण्यास भाग पाडण्याच्या दृष्टीनें लष्करी तोफा आणून किल्ल्याच्या दरवाजाजवळ उभ्या केल्या. आतां हें प्रकरण विकोपास जाणार असें ओळखून चन्नम्मानें रात्रीच्यावेळीं किल्याचे दरवाजे बंद करविले. सकाळी उठून किल्ल्याचे दरवाजे बंद झालेले पाहून त्याचें डोकें फिरलें, व लढाई सुरु करण्याच्या जय्यत तयारीनें आपल्या सर्व तोफा व लष्कर आणून किल्ल्याबाहेर उभे केले व किल्ल्याच्या दरवाजावर तोफा रोखून २४ मिनिटाच्या आंत दरवाजा उघडला नाहीं तर तो उडविला जाईल अशी धमकी दिली. असा कांही दुर्धर प्रसंग उद्भवणार याची पूर्ण जाणीव चन्नम्माला असल्यामुळें तिनेंही तयारी ठेवली होती. तोफ डागतांच दरवाजा उघडून त्यांनीं इंग्रजांवर हल्ला चढविला. दोन्ही बाजूनें तयारी असल्यामुळें प्रत्यक्ष लढाईस सुरुवात झाली. राणी चन्नम्मा व तिचे सैनिक हिरीरीनें लढत होते. आमटूर बाळप्पा नांवाच्या चन्नम्माच्या खास तैनातीतील एका शूर व नेमबाज सैनिकानें थॅकरेवर बंदुकीची गोळी झाडून त्याला घोड्यावरून खाली पाडले. लगेच चन्नम्माच्या सैनीकांनीं त्याच्यावर तुटून पडुन त्याच्या देहाचे तुकडे तुकडे केले. त्याच प्रमाणे त्यांच्या तोफखान्यावर हल्ला करून तो बंद पाडला. कॅ. ब्लॅक व डिघ्टन नांवाच्या दोघां ऑफीसरांनाही ठार केले. त्यामुळें इंग्रजांचे लष्कर गतधैर्य होऊन रानोमाळ पळून गेले.

कित्तूरच्या सैन्यानें इंग्रजांच्या तोफा व दारुगोळा आपल्या ताब्यांत घेतले व सांपडलेल्या लोकांना कैद केले. स्टिव्हन्सन, ईलियट व श्रीनिवासराव असे इंग्रजांचे तीघे अधिकारी पळून जाऊन गांवातील एका घरांत लपून बसले. चन्नम्मानें त्यांचे प्राण वांचवले व कैद करून किल्ल्यांत ठेवले. या प्रमाणें स्वातंत्र्य लढ्याच्या पहिल्या चकमकींत त्यांना विजयश्रीनें माळ घातली.

इंग्रजांच्या उरांत भरलेली धडकी.

वस्तुतः यावेळीं लढण्याची कित्तूरकरांची मुळींच इच्छा नव्हती. मुंबई गव्हर्नराचा शेवटचा निकाल त्यांना अजून समजलेला नव्हता. ते त्याच्या निकालाची वाट पहात होते. परंतु थॅकरेच्या मूर्खपणामुळें व त्यानें आरंभिलेल्या दांडगाईमुळें आपल्या बचावार्थ त्यांना त्यांच्यावर हल्ला करावा लागला. सुदैवानें ह्यांत हा दुष्ट मनुष्य मारला जाऊन त्याचें सैन्य रानोमाळ पळून गेले. या पराभवाची हकीकत धारवाडला पोहोचतांच तेथील सर्व अंमलदारांची पांचावर धारण बसली व मदती करतां ताबडतोब बेळगांवला जासूद रवाना केला. त्यावेळी त्याच्या उरांत भरलेली धडकीची कल्पना त्यांनीं लिहिलेल्या पत्रावरुन येते. ते खालीलप्रमाणें आहे.

" Direction – Ride. Ride. ........ Any officer whatever at Belgaum Speed all speed. For God's sake send a force immediately to Kittur. The artillery are cut to pieces. Capt. Black killed and cut to pieces, Several expected to die. Dighton killed. and Thackeray's two assistants Elliot and Stevenson not heard of ... ... for God's sake send immediately. Our force is no use whatever as we only muster 100 strong. " Dharwar 8' O' clock at night October 23.

Yours.
Walker Fullerton,
Asstt. Collector.

"धावा ! धावा ! बेळगांवांत जे कोणी असाल ते शक्य तेवढ्या वेगानें धावून या ! कृपा करुन तावडतोब कित्तूरला सैन्य पाठवा. तोफ दळाचे तुकडे तुकडे केले. थॅकरे ब्लॅक, डिघ्टन मारले गेले ! सेवेल मरणांतिक स्थितीत आहे. ईलियट, स्टीव्हनसनचा पत्ता नाही. कृपा करुन तावडतोब मदत पाठवा ! येथील १०० लोकांचे आमचें सैन्य अगदीं निरुपयोगी आहे. "

धारवाड,
२३ अक्टोबर,
रात्रौ ८ वाजता.

तुमचा
वाकर फुलर्टन
असि. कलेक्टर.

शेंवटचा लढा देण्याची इंग्रजाची योजना.

कित्तूरकरांच्या मर्दुमकीची व इंग्रज सैन्याच्या पराभवाची वार्ता हां हां म्हणतां चहुंकडे पसरली व इंग्रजाची नाचक्की होऊन त्यांचे धाबे दणाणून गेले. मुंबईच्या गव्हर्नरानें ताबडतोब जाहीरनामा काढून कित्तूर संस्थान खालसा केल्याचें जाहीर केलें. कित्तूरमधील बंडवाले लोकांना मदत करणाऱ्यांची मालमत्ता जप्त करुन त्यांना शिक्षा होईल अशी धमकी दिली. त्याच वेळीं अमूक मुदतीच्याआंत जे बंडखोर (?) शरण येतील त्यांना माफी देण्यांचें आश्वासन ही जाहीर केले. कित्तूरमध्यें उभारलेल्या ह्या बंडाचा (?) वणवा ताबडतोब विझवला नाहीं तर तो चोहीकडे पेटेल या भीतीनें मुंबईच्या गव्हर्नरनें बेळगांव, पुणे, सोलापूर, बेल्लारी वगैरे ठिकाणच्या सैन्यांना कित्तूरकडे कूच करण्याचे हुकूम पाठविले. मद्रास, बेंगळूर अर्काट वगैरे ठिकाणच्या सैन्यांना जय्यत तयारीत राहण्याचे संदेश पाठविले. त्या प्रमाणें सैन्याच्या हालचाली सुरु झाल्या. तसेंच कोल्हापूर, म्हैसूर व कर्नाटकांतील संस्थानिकांना व इतर जहागीरदारांना खलिते पाठवून, कित्तूर संस्थान खालसा केल्याचें कळवून तेथील बंड मोडण्यास सैन्याची मागणी केली. परंतु हें ढोंग वर-पांगीच होते. त्यांच्यावर त्यांचा मुळीच विश्वास नव्हता. उलट गुप्तरीतीनें त्या सर्वांच्या हालचालीवर सक्त नजर ठेवण्यांत आली होती. दक्षिण भागचा कमिशनर चॅपलिन याच्या खलित्याप्रमाणें इंग्रजांना मदत करण्याच्या निमित्तानें कोल्हापूरकर सैन्यासह बेळगांवास त्याच्याकडे निघाले असतांना, त्यांचा संशय घेऊन, सध्यां आपणास भेटावयास सवड नाहीं, करितां आपण कोल्हापूरास परत जावे असा त्यांना निरोप पाठविला. त्याचवेळी त्यांच्याविरुद्ध गव्हर्नरकडे गुप्त रिपोर्ट पाठवून कित्तूरचे प्रकरण संपल्यावर कोल्हापूरकरांचा समाचार घेतला पाहिजे असें कळविलें.

It will be expedient, in my opinion, when the Kittur affair is settled to call him (Kolhapurkar) to account for his conduct. Meanwhile a strict watch is kept upon his proceed-ings, which if not hostile, have much of the effect of hostility at such a conjunction as the present one.

यावरुन इंग्रज सरकारचे धोरण कसे दुटप्पी होते याची कल्पना येते.

कित्तूर संस्थानचा पश्चिम भाग सह्याद्रीचा डोंगराळ प्रदेश असून त्याच्या पलीकडे गोव्यामध्यें पोर्तुगीजांची सत्ता होती. कित्तूर सैनिक गनिमी काव्यानें लढण्यामध्यें अनुभविक व तरबेज असून कित्तूरचा किल्ला काबीज केला तरीं ते

गोव्याच्या पोर्तुगीजांशीं संधान बांधून सह्याद्रीच्या डोंगराळ प्रदेशांतून गनिमी काव्यानें आपणाशी लढत राहतील या भीतीनें इंग्रजांनीं गोव्याच्या बाजूलाही आपलें सैन्य उभे केले. तसेंच म्हैसूर संस्थानातील बिळगी वगैरे भागांतील लोकांशीं कित्तूरकरांचा संबंध असल्यानें तिकडेही कांही गडबड होऊ नये किंवा त्यांच्याकडून कित्तूरकराना कांहीं मदत पोहचूं नये म्हणून तेथेंही आपलें सैन्य उभे केले. याप्रमाणें संशयित सर्व ठिकाणीं सैन्याचा कडेकोट बंदोबस्त करुन व चोहोंकडून नाकेबंदी करुन, कित्तूर किल्ल्यावर हल्ला चढविण्याची योजना अमलांत आणून व त्याप्रमाणें सैन्याच्या हालचाली करुन कित्तूरचें बंड बीमोड करण्याचे सर्वाधिकार गव्हर्नरनें चॅपलिनकडे सोपविलें. हा चॅपलिन थॅकरेचा दुसरा अवतारच होता. त्याला दयामाया, माणुसकी, वगैरे गुणांचा गंधही नव्हता. येन केन प्रकारेण स्वातंत्र्याच्या लढ्याचा बीमोड करुन व कित्तूरकरावर सूड उगवून त्यांचे संस्थान घशांत घालण्याच्या एकाच उद्देशानें तो प्रेरित झालेला होता.

**राणी चन्नम्माचे समेटाचे अखेरचे प्रयत्न.**

याप्रमाणें सर्व सिद्धता करुन व चोहोकडचा बंदोबस्त करुन चॅपलिनने जमलेल्या सैन्यासह कित्तूरकडे कूच करुन कांहीं अंतरावर आपला तळ ठोकला. या सर्व हालचालीची चन्नम्माला बातमी होती. तिनेंही या संकटाला तोंड देण्या-करतां शक्य तेवढा कडेकोट बंदोबस्त केला होता. परंतु कांहीं केलें तरी आपलें संस्थान लहान व बाहेरून कोणाचीही मदत नाहीं, अशा परिस्थितींत अखिल हिंदुस्थानावर सत्ता गाजवणाऱ्या इंग्रज राज्याशीं यशस्वी टक्कर देणें अशक्य आहे हे तिनें जाणले होते. याकरतां समेटाचा पुनः एकदा प्रयत्न करून पहावा म्हणून तिने चॅपलिनला पत्र लिहून समेटाची विनवणी केली. परंतु बिनशर्त शरण आल्याशिवाय आपण कांहींही करणार नाहीं, असें त्यानें कळविलें. अर्थांत ही अट चन्नम्माला व तिच्या सैनिकांना पसंत पडणें शक्यच नव्हतें. त्या सर्वांनीं विचारविनिमय करून प्राण गेला तरी शत्रूला शरण जावयाचें नाहीं व प्रसंग पडल्यास शत्रूशीं लढून धारातीर्थी देह ठेवण्याचाच त्यांनीं निश्चय केला. याप्रमाणें दोन्हीं पक्ष हट्टाला पेटल्यामुळें समेटाचा मार्गच बंद पडला. चॅपलिननें असें बेदरकारपणाचें उत्तर दिले तरी, कैदेमध्यें असलेल्या गोऱ्यावद्दल त्याला काळजी लागली होती. किल्ल्यावर हल्ला केल्यास त्या कैद्यांना ताबडतोब यमसदनाला पाठविले जाईल अशी धमकी चन्नम्मानें दिली होती. त्यामुळें सर्व दिशाकडून सैन्य जमा होऊन हल्याची पूर्ण तयारी झाली असतांनासुद्धां हल्ला करण्याचा बेत तो पुढें पुढें ढकलींत होता. शेवटी आपल्या गोऱ्या कैद्यांच्या सुटकेकरतां त्यानें

एक व्यूह रचला. पाहिजे तर आपल्या गोऱ्या कैद्यांकडून आमच्या सद्धेतूंबद्दल खात्री करून घ्यावी असें चन्नम्मानें आपल्या समेटाच्या पत्रामध्यें लिहिले होते. त्याचा फायदा घेऊन त्या कैद्यांची सुटका करावी व त्यांनीं येऊन तुमच्याशीं समेट करण्याचा सल्ला दिला तर आपण त्याचा सहानुभूतीपूर्वक विचार करूं असें त्यानें चन्नम्मास कळविलें. गोरे कैदी सुटका झाल्यावर चन्नमाच्या वतीनें तरफदारी करणार नाहींत या विश्वासावर त्यानें हें वचन दिलें. परंतु चन्नम्मानें त्या कैद्याना फारच चांगल्या रीतीनें वागविले होते. कैदेत असतांना त्यांनीं तेथील सर्व परिस्थितीचें निरीक्षण केले होते. त्याचप्रमाणें कित्तूरकर व थॅकरे यांच्यामध्यें झालेल्या दुर्दैवी लढाईची घटना थॅकरेनें आपल्या मूर्खपणानें आपणावर ओढून घेतली होती, त्यांत कित्तूरकरांचा कांहीं दोष नव्हता, याचीही त्यांना बालंबाल खात्री झाली होती. त्यामुळें चन्नम्मानें त्यांच्यांशी वाटाघाट करून बंड करण्याचा अथवा इंग्रज सरकारला त्रास देण्याचा आपला मुळींच इरादा नाहीं, व संस्थान पूर्वीप्रमाणेंच दत्तक मुलास चालविल्यास पूर्वीप्रमाणेंच आपण इंग्रजाशीं स्नेहानें व इमानें इतबारें वागण्यास तयार आहों याची त्यांना खात्री करून देऊन, त्यांच्या बरोबर आपले दोघे वकील देऊन त्यांची चॅपलिनकडे रवानगी केली. त्या कैद्यांनीं प्रामाणिक-पणानें थॅकरेच्या लडबुडीच्या कारभाराची व त्यानें मूर्खपणानें आपणांवर ओढून घेतलेल्या संकटाची हकीकत चॅपलिनला सांगितली. त्याचप्रमाणें चन्नम्मा राणीच्या सद्धेतूबद्दलही आपली खात्री असल्याचें सांगून हा तंटा आपसांत मिटवावा असें त्यांनीं आग्रहानें सांगितलें. त्यांचें हें अनपेक्षित वर्तन पाहून चॅपलिन चपापला परंतु येनकेन प्रकारेण संस्थान घशांत घालण्याचें त्याचें मूळचें धोरण कायम असल्या-कारणानें त्यानें आपण दिलेलें वचन मोडलें व कांहीं झालें तरी बिनशर्त शरण आल्याशिवाय आपण तडजोड करणार नाहीं असें सांगून त्यांची विनंती धुडकावून लावली. राणी चन्नम्मा ही अट कधींच मान्य करणार नाहीं असें सांगून तिचे वकील कित्तूरला परतले.

**स्वातंत्र्याचा शेवटचा लढा.**

आपण रचलेला व्यूह यशस्वी होऊन गोऱ्यांची सुटका झाल्यावरोबर चॅपलिननें तावडतोब किल्ल्यावर हल्ला करण्याचा हुकूम सोडला. किल्ल्यावर तोफा डागल्या. कांहीं ठिकाणीं किल्ल्याला भगदाडे पडली. चन्नम्मा, तिचा सरदार गुरसिद्दाप्पा व त्यांचे सैनिक जीवावर उदार होऊन शत्रूशीं लढले. परंतु अफाट व सुसज्ज शत्रूसेनेपुढें त्यांचा टिकाव कसा लागणार? परंतु अशा परिस्थितींतसुद्धां त्यांनीं सेनापती मन्रोचा बळी घेतलाच. हातघाईच्या लढाईत

दोन्हीं पक्षाचे बरेंच सैनिक रणांगणीं पडले. परंतु त्यामध्यें इंग्रज सैन्याच्या सैनिकांचीच संख्या मोठी होती. शेवटीं इंग्रजांनीं चन्नम्मा राणी, सरदार गुरसिद्दप्पा वगैरे प्रमुखांना व इतर सैनिकांना कैद करून किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. याप्रमाणें सन १८२४ च्या डिसेंबर महिन्यांत या स्वातंत्र्य संग्रामाचा शेवट होऊन त्याच्या इतिहासाचें शेवटचें पान लिहिलें गेलें. सरदार गुरसिद्दापा व संगोळी रायण्णा वगैरे प्रमुखांना व इतर सैनिकांना बेळगांवच्या किल्ल्यांत कैद करून ठेवले. गुरसिद्दाप्पाचे पुढें काय झाले कळत नाहीं. परंतु संगोळी रायण्णाची सुटका झाली. हा रायण्णा चन्नम्माचा शूर शिपाई व स्वामीभक्त सनदी होता. सुटका झाल्यावर गतधैर्य न होतां त्यानें कित्तूर संस्थानच्या सामान्य जनतेची संघटना करून सन १८२९ मध्यें पुन: स्वातंत्र्याचा झेंडा उभारला. दऱ्याखोऱ्यांत लपून राहून त्यानें गनिमी काव्यानें इंग्रजाशीं लढून त्यांना त्राहि त्राहि करून सोडले. त्याला पकडण्याकरतां त्यांनीं जंग जंग पछाडले. परंतु त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. शेवटी त्याच्याशीं लढून नव्हे, तर फंद फितूरीनें नि:शस्त्र असतांना त्याला पकडून फांशी दिले. ह्या स्वातंत्र्य संग्रामाचा इतिहासही स्फूर्तिदायक, बोधप्रद, व मनोरंजक आहे. राणी चन्नम्मा व तिची सून ईरव्वा यांना बैलहोंगलमध्यें नजरकैदेत ठेवलें गेलें. तेथें चन्नम्मा राणीने शेवटचे आयुष्य धर्माचरणांत घालविलें. तेथेंच २१ फेब्रुवारी १८२९ रोजीं तिचा अंत झाला. बैलहोंगलमधील कल्मठामध्यें तिची समाधि बांधली आहे.

इंग्रजाशी लढा चालू असतांना चन्नम्माराणीनें दक्षिण भागातील सर्व संस्थानिकांना व जहागीरदारांना खलिते पाठवून अशा आणीबाणीच्या प्रसंगीं स्वातंत्र्य रक्षणाकरतां सर्वांनीं एक जुटीनें प्रयत्न करण्याची आवश्यकता दाखवून मदतीची याचना केली होती. परंतु कोल्हापूर करा शिवाय कोणी एकानेंही हूं का चूं केलें नाहीं, किंवा तिच्या खलित्याला उत्तर धाडले नाहीं. कोल्हापूरकरांनीं थोडीशी हालचाल केली, परंतु तीसुद्धा कशी निष्फळ ठरली हे वर दाखवलेच आहे. तिच्या सूचनेप्रमाणें इतर संस्थानिकांनीं व जहागीरदारांनीं त्यावेळीं उठाव केला असता तर १८५७ सालामध्यें उत्तर हिंदुस्थानांत आरंभ झालेल्या स्वातंत्र्याचा संग्राम सन १८२४ मध्येंच दक्षिण हिंदुस्थानांत सुरु झाला असतां. अर्थात् त्याचा परिणाम काय झाला असतां हें कोणी सांगावें ? परंतु निदान स्वातंत्र्याकरतां सर्वस्वाची होळी करुन लढणारे वीर म्हणून त्यांची कीर्ती इतिहासांत अजरामर होऊन राहिली असती.

वरील सर्व वर्णनावरुन राणी चन्नम्माच्या अलौकिक मर्दुमकीची व कर्तबगारीची कल्पना येते. परंतु त्यापेक्षांही तिनें आपल्या वात्सल्यपूर्ण व प्रजाहितदक्ष वर्तणूकीनें आपल्या प्रजाजनांचे संपादलेलें प्रेम पाहून आश्चर्यंच वाटतें. इंग्रजाशीं चाललेल्या लढ्याचे वेळीं संस्थानातील सारे प्रजाजन संस्थानाकरतां प्राण पणास लावून लढण्यास तयार होते व दूरदूरच्या खेडयांतील लोकसुद्धा इंग्रज सैनिकाशी असहकार करुन त्यांना सळो कीं पळो करुन सोडीत होते. याबद्दल त्यावेळीं इंग्लिश अधिकाऱ्यांनीं लिहिलेल्या पत्रांमध्येंच अनेक आधार मिळतात. ह्या स्वातंत्र्य संग्रामाचा इतिहास गतकालीन वडया इतिहाकारांच्या जाडया ग्रंथामध्यें कोठें झळकून दिसत नसला तरी, कर्नाटकांतील जनतेच्या हृदयावर मात्र तो कायमचा कोरला गेला आहे. चन्नम्माच्या चरित्रावर व ह्या संग्रामाबद्दल जेवढे पोवाडे, कथा व गाणीं कन्नडमध्यें झाली आहेत, तेवढी कोणत्याही स्वातंत्र्यवीरा बद्दल झाली असतील कीं नांहीं याची शंका आहे. आजहीं हे पोवाडे नित्य कर्नाटकातील खेडयापाडयांतून भावनावश होऊन गाइले जातात. ते ऐकण्याकरता लोकांच्या झुंडीच्या झुंडीं जमतात. हे पोवाडे ऐकत असतांना वीरश्रीनें तरुणांचे बाहु स्फुरण पावतात व लोकांच्या डोळयांतून अश्रुधारा वाहूं लागतात. त्यावेळचें हें दृश्य पाहून कोणाचें ही हृदय भरुन आल्याशिवाय राहणार नाही. सन १९४२ सालच्या स्वातंत्र्य संग्रामामध्यें कर्नाटक प्रांत आघाडीवर होता. त्यावेळीं कर्नाटकांत स्वातंत्र्याकरतां लढणारे सारे वीर चन्नम्मा राणीच्या स्वातंत्र्य संदेशानें भारावून गेलेले होते, व खेडयापाडयांतील सामान्य जनता सुद्धां नुसत्या तिच्या नांवाच्या स्मरणानें स्फूर्ती पावून स्वातंत्र्य संग्रामांत उडी घेत होती. १९४२ सालच्या स्वातंत्र्य संग्रामामध्यें कर्नाटकने गाजविलेल्या मर्दुंमकीचें श्रेय बव्हंशी स्वातंत्र्यवीर चन्नम्मा राणीच्या पुण्यस्मृतीलाच आहे.

स्वातंत्र्य प्राप्तीनंतर कॉंग्रेस सरकारनें ह्या स्वातंत्र्य संग्रामाच्या इतिहासाचें संशोधन करुन त्याला प्रसिद्धी दिली व ह्या स्वातंत्र्यदेवी राणी चन्नम्माच्या स्मरणार्थ बेळगाव कित्तूर व बैलहोंगल येथें तिची स्मारकें उभी करुन तिच्या पुण्यस्मृतीला आपली व जनतेची भक्तीयुक्त श्रद्धांजलीं अर्पण केली. बेळगांव शहरांतील हमरस्त्यावर उभारलेला तिचा मर्दानी पुतळा आजही तेथून जाणाऱ्या येणाऱ्यांना स्वातंत्र्याचा स्फूर्तिसंदेश देत तेथें उभा आहे.



टीप :– सांप्रत म्हैसूर सरकारनें कित्तूर येथें राणी चन्नम्मादेवीचें भव्य स्मारक उभारलें असून तेथेंच एक प्राचीन ऐतिहासिक वस्तुसंग्रहालयही स्थापलें आहे. त्याचप्रमाणें तेथें तिच्या नांवानें अखिल भारत पातळीवरील एक सैनिकी कन्याशाळाही ( Rani Channamma Girls' Military School ) सुरू केली आहे. ह्या शाळेंत सांप्रत शंभर दीडशे मुली शिक्षण घेत आहेत. सध्यां कित्तूर, प्रवासी केंद्र म्हणून मान्यता पावले असून, त्या केंद्राला भेटी देणाऱ्या प्रवाशांच्या सोयी करितां सरकारनें एक सुसज्जित प्रवासी मंदीरही बांधलें आहे. त्याचप्रमाणें बैलहोंगल येथील तिच्या समाधीचें पुनरुथ्थापन केले गेलें असून तेथेंही तिच्या नांवानें एक कॉलेज स्थापले गेले आहे.

म्हैसूर सरकारनें स्थापलेल्या कित्तूर चन्नम्मा राणी स्मारक समितीला भारताचे पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधीनीं खालील प्रमाणें संदेश पाठविला होता.

" भारतांतील अनेक शूर वीर स्त्रियांमध्यें प्रकाशणारी कर्नाटकची आदर्श वीर राणी कित्तूर चन्नम्मादेवी ह्या अमररूपानें आम्हां सर्वांच्या हृदयमंदिरांत सदैव तळपत राहतील. त्यांची चिरस्मरणीय कामगिरी भारतांतील असंख्य युवकांना स्फूर्ति देत राहील. "

— लेखक



लेखांक ४

# आधुनिक कर्ण - लिं. श्री. लिंगाप्पा जायप्पा सरदेसाई - शिरसंगीकर

(सन १९६५ जानेवारी – फेब्रुवारी अंकांतील लेख)

कोणत्याही समाजाच्या प्रगतीला प्रथम शिक्षणाची आवश्यकता आहे ही गोष्ट जाणून कांहीं श्रीमंत दानशूर लोकांनीं लक्षावधी रुपयांचे ट्रस्ट करुन त्यांचा विनियोग समाजाच्या शिक्षण कार्याकडे करीत असलेलीं उदाहरणें आम्ही पाहतो. परंतु या उदात्त व पवित्र कार्यांकरतां आपलें सर्वस्वच अर्पण करणारे थोर दानशूर महात्मे क्वचित्‌च आढळून येतात. असे एक श्रेष्ठ दानशूर थोर पुरुष वीरशैव समाजांत गेल्या शतकाच्या शेवटीं होऊन गेले व त्यांच्या असामान्य व अलौकिक दातृत्वामुळे शिक्षणांत अत्यंत मागसलेला वीरशैव समाज आज सुशिक्षित होऊन आपल्या प्रगतीचें पाऊल झपाट्यानें पुढें टाकीत आहे ही गोष्ट या समाजास भूषणावह आहे. ह्या महानुभावांनीं सुमारें साठसत्तर हजार रुपये वार्षिक उत्पन्नाची सारी जहागीरच समाजाच्या शिक्षण कार्याला सुपुर्द करुन नुसत्या वीरशैव समाजालाच नव्हे तर देशांतील सर्व दानी लोकांना एक उदात्त आदर्शणीय उदाहरण घालून दिले आहे. या महाभागाची जयंती रविवार दि. १० जानेवारी रोजीं अखंड कर्नाटकभर मोठ्या वैभवानें साजरी करण्यांत आली. अशा थोर पुरुषाचें चरित्र महाराष्ट्रीय वीरशैवांना मार्गदर्शक होईल म्हणून त्यांचें संक्षिप्त चरित्र खाली देऊन आदरांजली वाहिली आहे.

घराण्याचा इतिहास.

शिरसंगीकर देसाईसाहेबांचें घराणें फार जुनें व ऐतिहासिक आहे. ह्या घराण्याचे संस्थापक व मूळ पुरुषाचें नांव विठ्ठाप्पा. ते सोलापूर जिल्ह्यातील भीमा नदीच्या कांठावर वसलेल्या औराद गांवचे पाटील. ते मोठे पराक्रमी व शूर लढवय्ये होते. सोळाव्या शतकांत होऊन गेलेल्या विजापूरच्या इब्राहिम आदिलशहाच्या कारकीर्दींत त्यांनीं पराक्रमानें व कर्तबगारीनें सरदाराची पदवी व कोकटनूर परगण्याची देसगत संपादन केली. त्यानंतर अली आदिलशहाच्या कारकीर्दींत मुसलमान बादशहा व विजयनगरचे राजे यांच्यामध्यें सन १५६५ सालीं झालेल्या प्रसिद्ध ऐतिहासिक तालीकोटच्या लढाईत त्यांनीं अतुल पराक्रम दाखविल्यामुळें बादशहानें त्यांना नवलगुंद संस्थानची जहागीर व 'तीन लक्ष वराहांचा मुंडीपाच्छा' नांवाची गौरवयुक्त पदवा बहाल केली. त्यानंतर बादशहाच्या इच्छेप्रमाणें त्यावेळीं अत्यंत मजबूत असलेला तोरगल किल्ला व त्याच्या आसमंतातला प्रदेश त्यांनी जिंकला. बादशहानें त्यांच्या पराक्रमावर खूष होऊन सन १५६६ सालीं त्यांना तोरगल प्रांताचे सरदेसाई म्हणून नेमले. याप्रमाणें मूलत: एका खेडेगांवाचे पाटील असलेले विठ्ठाप्पा आपल्या पराक्रमानें व कर्तबगारीनें कोकटनूर परगणें, नवलगुंद संस्थान व तोरगल प्रांत एवढ्या मोठ्या प्रांताचे सरदेसाई बनले.

त्यांच्या नंतर ह्या घराण्यांत प्रसिद्धीस आलेले दुसरे पुरुष म्हणजे जायाप्पा. ते मोठे बुद्धिमान व कर्तबगार होते त्यांनी अत्यंत प्रयासानें आपली जहांगीर वाढवली. सध्याचा सौंदतीचा किल्ला त्यांनींच सन १७३४ सालीं बांधला. सरदेसायांची ही जहागीर उत्तरेस पेशवे दक्षिणेस हैदरअल्ली व टिपू यांच्या राज्यांच्या सीमेवर असल्यामुळें त्यांना त्या दोघाकडूनही वरचेवर त्रास पोंहचत होता. त्यामुळे त्यांच्या जहागिरींत चढउतार होत होते पेशव्यांच्या अंदाधुंदीच्या काळीं तर धोंडोपंत गोखले नांवाच्या एका कावेबाज सरदारानें कपटानें, व पेशव्यांच्या दरबारीं असलेल्या आपल्या वर्चस्वाच्या बळावर ह्या जहागिरीचा बहुभाग बळकावला होता. परंतु कोल्हापूरकरांच्या मदतीनें सरदेसायांनीं पुन: तो भाग आपल्या कबजांत घेतला. तथापि गोखले पुन: शिरजोर झाल्यामुळें सरदेसायांना आपल्या त्या जहागिरीच्या भागाला कायमचे मुकावें लागले. याप्रमाणें पेशव्यांच्या अंदाधुंदी कारभाराची झळ सरदेसायांना सोसावी लागून शेवटीं ब्रिटिश सत्ता स्थापन झाल्यानंतर त्यांच्या घराण्यास व देसगतीस स्थिरता आली.

### श्री. लिंगाप्पा सरदेसायांचा जन्म व दत्तक विधान.

श्री. लिंगाप्पाचा जन्म धारवाड जिल्ह्यांतील वनशिग्ली नांवाच्या खेड्यांतील एका गरीब शेतकऱ्याच्या घराण्यांत दि. १० जानेवारी सन १८६२रोजीं झाला. त्यांच्या वडिलांचें नांव धुळाप्पा व त्यांचें मूळ नांव रामाप्पा. हे आपल्या वडिलांचे चौथे पुत्र. ते जात्या सुदृढ, देखणे व बाणेदार होते. सरदेसायांच्या घराण्यांतील शेवटचे देसाई जायप्पा निपुत्रिक वारले. तेव्हां त्यांची धर्मपत्नी गंगाबाईनें दत्तक घेण्याचा आपला इरादा जाहीर केला. सामान्यत: अशा घराण्यांत दत्तक पुत्राची निवड योग्यायोग्यतेकडे न पाहतां वशीलेबाजीनेंच होत असते. परंतु गंगाबाई निर्भीड, कर्तव्यदक्ष व धीट स्वभावाची स्त्री होती. कोणाच्याही भीड मुर्वतीस बळी न पडतां तिनें आपला दत्तक घेण्याचा इरादा जाहीर करुन दत्तक मुलाची निवड करण्याकरतां आपल्या नात्यागोत्याच्या घराण्यांतील सर्व मुलांस आपल्या भेटीस बोलाविलें. रामप्पा सुदृढ, देखणा व बाणेदार असल्यामुळें त्याच्या बापानें आपल्या मुलांपैकीं त्यालाच मातोश्री देसायिणीच्या भेटीस पाठविलें. कर्मधर्म संयोगानें रामाप्पा तिच्या पसंतीस उतरला. त्याप्रमाणें तिनें त्याला कायदेशीर व विधियुक्त दत्तक घेऊन लिंगाप्पा म्हणून त्याचें नांव ठेवलें. परंतु त्या घराण्यातील रिवाजाप्रमाणें सर्व लोक त्यांना आप्पासाहेब या नांवानें संबोधू लागले. दत्तकाच्या वेळी त्यांचे वय अकरा वर्षांचें होतें. दत्तकानंतर गंगाबाईनें त्यांना इंग्लिश शिक्षण देण्याच्या इराद्यानें कोल्हापुरास ठेवून तेथें त्यांचीं सर्व व्यवस्था केली. परंतु त्यांच्या दुर्दैवानें थोड्याच काळांत गंगाबाई कैलासवासी झाली व तिची सवत उमाबाईनें आप्पासाहेबांच्या दत्तक विधानाविरुद्ध सरकारकडे अर्ज केला. त्यामुळें आप्पासाहेबांना लहान वयांतच शिक्षणाला रामराम ठोकून आपल्या गांवीं परत येऊन कोर्ट दरबारांत खेपा घालण्याचा प्रसंग आला. सदरी कज्जांत त्यावेळच्या दक्षिणभाग कमिशनर क्राफर्ड साहेबानें सन १८८० सालीं आप्पासाहेबांचे दत्तक रद्द ठरविलें. त्यावर आप्पासाहेबांनीं मुंबई सरकारकडे अपील केलें. त्या अपीलांत सन १८८१ सालीं मुंबईसरकारनें त्यांचे दत्तक विधान कायदेशीर ठरवून त्याला मंजूरी दिली.

### देसगतीची व्यवस्था व शेती सुधारणा.

आप्पासाहेब मूलत: गरीब शेतकरी घराण्यांतले असल्यामुळें व जात्या हुषार, बुद्धिमान व कर्तबगार असल्यामुळें त्यांचें दत्तक कायम झाल्यानंतर त्यांनीं आपल्या जहागिरीची नीट व्यवस्था लावून जहागिरींचें उत्पन्न वाढविलें. एवढेंच नव्हें तर

आपल्या रयतांच्या हिताकडेही त्यांनीं लक्ष पुरविलें. त्यांची जहागीर कर्नाटकाच्या दुष्काळी भागांत असल्यामुळें तेथील रयत लोकांना वरचेवर दुष्काळाचे दुष्परिणाम भोगावे लागत असत. पाटबंधाऱ्याची व्यवस्था नसल्यामुळें त्यांची शेती कधींही किफायतशीर होत नव्हती. आपल्या रयत लोकांची ही हींन दीन परिस्थिती जाणून त्यांना बागायत शेतीचा फायदा करुन देण्याकरतां त्या स्वस्ताईच्या काळांत सुमारें एक लक्ष रुपये खर्च करुन 'भवानी तलाव' नांवाचा एक मोठा तलाव बांधून आपल्या रयतांना पाटबंधाऱ्याच्या पाण्याची सोय करुन दिली. आपला समाज व देश शेतीप्रधान असल्यामुळें आपली शेती सुधारल्याशिवाय तरणोपाय नाहीं ही गोष्ट त्यांनी त्या काळींच ओळखली होती. म्हणून आपल्या जहागिरीतील शेती सुधारण्याकरतां त्यांनीं अनेकप्रकारे प्रयत्न केले व आपल्या रयताना सवलतीही दिल्या. शिक्षण कार्यास मदत करण्याकरतां त्यांनीं करुन ठेवलेल्या ट्रस्टमध्यें शेतकी शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना प्रथम व सढळ हाताने मदत द्यावी असें एक कलम त्यांनीं घालून ठेवलेले आहे. यावरुन त्यांच्या चाणाक्षतेची, दूरदृष्टीची व शेती सुधारणेविषयीं असलेल्या त्यांच्या कळकळीची कल्पना येते.

## सार्वजनिक जीवन

आप्पासाहेब मोठे सद्गुणी, उद्योगप्रिय व उदार मनोवृतीचे होते. त्यांचें शालेय शिक्षण इंग्रजी पांचव्या इयत्तेपर्यंत झालें असलें तरी जात्या बुद्धिमान असल्यामुळें सतत वाचनव्यासंगानें त्यांनीं आपल्या ज्ञानांत चांगलीच भर घातली. समाजोद्धाराकरतां आवश्यक असलेल्या शिक्षणाचें महत्व त्यांनीं पूर्वीपासूनच ओळखले होते. म्हणून आपल्या हयातींत त्यांनीं गरीब होतकरु विद्यार्थ्यांना सढळ हातानें मदत केली. तसेंच त्यावेळच्या वीरशैव समाजनेत्यांनीं आरंभिलेल्या समाजोद्धाराच्या कार्यात ते हिरीरीनें भाग घेऊं लागले. त्यावेळचे समाज नेते कै. गिलगिंची व अर्ताळ साहेब यांनी आरंभिलेल्या लिंगायत फंडाला त्यांनी सन १९०३ सालीं आपल्या कांहीं जमीनी विकून वीस हजार रुपयांची देणगी दिली. तसेंच समाजाचा व्यापार व उद्योगधंदे वाढविण्या करतां एक संघ स्थापून त्याच्या वतीनें समाजाच्या आर्थिकोन्नतीच्या कार्यास प्रारंभ केला. समाजांतील अनिष्ट चालीरीतीही नष्ट करण्याकरतां त्यांनीं आटोकाट प्रयत्न केले. ह्या सर्व सार्वजनिक कार्यामुळें ते कर्नाटकच्या त्यावेळच्या सार्वजनिक कार्यात प्रामुख्यानें चमकूं लागले. लिं. श्री हानगल कुमार स्वामींनीं योजिलेल्या अखिल भारत वीरशैव महासभेच्या स्थापनेस त्यांनीं सक्रीय सहाय्य केले. त्या महासभेच्या धारवाड येथील पहिल्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदाची माळही त्यांच्याच गळचांत पडली.

आप्पासाहेब जसे आपल्या सौजन्यानें, कर्तबगारीनें व उदार निर्मळ वृत्तीनें लोकप्रिय झाले होते, त्याच प्रमाणें राजदरबारींही त्यांना विशेष मानमरातब दिला जात होता. त्यांची सार्वजनिक कार्याची कळकळ पाहून मुंबई सरकारनें त्यांना मुंबई कौन्सिलचे सभासद नेमले होते व त्याना मॅजिस्ट्रेटचे अधिकारही दिले होते.

### खासगी जीवन व जहागिरीचा ट्रस्ट

याप्रमाणें सार्वजनिक जीवनांत गढून जाऊन त्यांत ते प्रामुख्यानें झळकत असले तरी त्यांच्या खासगी जीवनांत त्यांना सुख लाभलें नाहीं. त्यांची पहिली प्रियपत्नी निपुत्रिक वारली. त्यानंतर केलेल्या लग्नापासून त्यांना दोन मुलें झालीं तरी तीं अल्पायुषी ठरलीं. त्यामुळें संसारावरुन त्यांचें मन उडून आधींच असलेली त्यांची वैराग्यवृत्ति दृढ होंऊ लागली. समाजोद्धाराचें ध्येय तर त्यांच्या डोळ्यापुढें सतत उभे होतेंच. शेवटी त्यांनीं संपूर्ण विचार करुन आपल्या पश्चात् आपला वंश चालविण्याकरतां दत्तक न घेतां आपली सारी इस्टेट समाजाच्या शिक्षण कार्यास सुपूर्द करण्याचा निश्चय केला, व आपला हा निश्चय आपल्या आप्तेष्टांना व स्नेह्यासोबत्यांना कळविला. त्यावेळच्या काळांत आपल्या समाजांत एकादा संस्थानिक अथवा जहागीरदार असणें हें समाजाचें मोठे भूषण मानले जात असे. त्यामुळें आपल्या समाजाची ही जहागीर नष्ट होऊं नये अशीच त्यांच्या आप्तेष्टांची व स्नेह्यासोंबत्यांची इच्छा होती, म्हणून त्या सर्वांनी आप्पासाहेबांना आपल्या निश्चयापासून परावृत्त करण्याचा आटोकाट प्रयत्न केला. परंतु आप्पासाहेब उदात्त ध्येयवादी व दृढनिश्चयी असल्यामुळें त्यांच्या आग्रहास बळी पडले नाहीत. दत्तक घेऊन आपल्या समाजाच्या एकाद्या मुलाचा उद्धार करण्यापेक्षां समाजाची सर्व मुलें आपलींच आहेत व त्या सर्वांचा उद्धार करणें हें आपले पवित्र कर्तव्य आहे, एवढेंच नव्हें तर हें सत्कार्य दत्तकापेक्षां शतपटीनें श्रेयस्कर आहे, असा त्यांनीं त्यांना खडखडीत जबाब दिला. शेवटीं, कै. अर्ताळ साहेबासारख्या त्यांच्या स्नेह्यांना ही गोष्ट पटली व त्यांच्या सल्यानें त्यांनीं दि. ६ जून सन १९०६ या शुभ दिवशीं आपल्या सर्व जहागिरीचा ट्रस्ट करून तो कलेक्टर कचेरींत नोंदविला. हा शुभ दिवस खरोखरच वीरशैव समाजाच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं नोंदण्यासारखा आहे. त्यानंतर पूर्वीच खंगलेली त्यांची प्रकृती जास्तीच ढासळली व शेवटीं त्यांतच दि. २३ ऑगस्ट १९०६ गणेश चतुर्थीच्या दिवशीं त्यांनीं आपली लोकोत्तर इहयात्रा संपविली. याप्रमाणें त्यांचा पार्थिव देह नष्ट झाला तरी त्यांनीं आपल्या प्राणज्योतीनें पेटविलेला ज्ञानदीप आपल्या प्रशांत प्रकाशानें साऱ्या वीरशैव समाजाला प्रकाशित करीत आहे.

प्रथम ग्रासे मक्षिका-पातः !

आप्पासाहेबांनीं आपल्या अलौकिक व अभूतपूर्व स्वार्थत्यागानें वाढून ठेवलेल्या सुग्रास अन्नाचें सेवन करुन आतां आपला समाज घष्टपुष्ट होणार या सुखस्वप्नांत समाजाचे नेते असतांना त्यांच्या सुखस्वप्नाचा भंग करणारी एक दुर्दैवी घटना थोडयाच काळांत घडली. आप्पासाहेबाच्या निधनानंतर कांहीं विघ्न संतोषी लोकांच्या भूलथापांना बळी पडून त्यांच्या पत्नीनें दत्तक घेऊन आप्पासाहेबांनी केलेला ट्रस्ट रद्द व्हावा म्हणून ट्रस्टच्या विश्वस्ता विरुद्ध कोर्टांत दावा दाखल केला. याबाबतींत वीरशैव समाजाचा द्वेष करणारे कांही सुशिक्षित विघ्न संतोषी लोक त्या बाईला प्रोत्साहन देत होते, ही दुर्दैवाची गोष्ट आहे. हा कज्जा सतत बारावर्षे चालून शेवटीं प्रिव्ही कौन्सिलच्या अपीलांत सन १९१८ सालीं विश्वस्तातर्फे निकाल होऊन ट्रस्ट कायदेशीर ठरविण्यात आला. त्यानंतर विश्वस्त मंडळाचे चेअरमन बेळगांव जिल्ह्याचे कलेक्टर यांनीं ट्रस्टच्या सर्व मिळकतींचा ताबा घेऊन विद्यार्थ्यांना स्कॉलरशिप देण्यास सुरवात केली. ह्या कज्जाचा लढा प्रिव्ही कौन्सिल पर्यंत लढून त्यांत यश संपादन करण्यास कै. अर्ताळ साहेबांना व समाजाच्या इतर नेत्यांना फार कष्ट करावे लागले.

ट्रस्टची आर्थिक परिस्थिती.

ट्रस्टचा कारभार आरंभ झाल्यावेळीं ट्रस्टच्या मिळकतीचे वार्षिक उत्पन्न सुमारे रु. ६५००० होते. मिळकतीच्या व्यवस्थेकरतां होणारा खर्च सुमारे रु. २०००० वजा जातां बाकी राहिलेले सुमारे ४५००० रुपये स्कालरशिप देण्यात खर्च होतात. अलीकडच्या काळांत मुंबई सरकारनें मंजूर केलेल्या जहागिरी व इनाम रद्दीच्या कायद्यामुळें व कूळकायद्यामुळें ट्रस्टच्या उत्पन्नांत बरीच घट झाली. परिस्थितीनुसार पूर्वीचें उत्पन्न वाढून सांप्रत ट्रस्टचे एकंदर उत्पन्न रुपये ६५ हजार असून त्यांतून मिळकतीच्या व्यवस्थेचा खर्च रु. २० हजार वजा जातां उरलेली रक्कम सुमारें रु. ४५ हजार गरीव विद्यार्थ्यांना स्कॉलरशिप रुपाने दिली जाते. सन १९१९ पासून आजपर्यंत ट्रस्ट मंडळानें अजमासे ९ लाख ७ हजार रुपये गरीब विद्यार्थ्यांना सहाय्य करण्यांत खर्च केले आहेत. सुमारे ४७०० विद्यार्थ्यांनी ह्या फंडाचा लाभ घेऊन विद्यार्जन केले आहे. त्यांतील ३४ विद्यार्थ्यांनीं ह्या फंडाच्या सहाय्यानें परदेशांतील उच्च शिक्षण संपादन केलें आहे. ट्रस्टची स्कॉलरशिप घेऊन विद्यार्थी कर्तेसवरते झाल्यावर व मिळवूं लागल्यावर स्कॉलरशिप रुपानें त्यांनीं घेतलेली रक्कम कांहीं प्रमाणानें

ट्रस्टला परत करावी लागते. त्याप्रमाणें मदत घेतलेल्या विद्यार्थ्यांनीं आजपर्यंत ट्रस्टला परत केलेंली रक्कम सुमारे २ लाख ४२ हजार रुपये आहे.

**आप्पासाहेबांचे स्मारक.**

आप्पासाहेबांच्या या औदार्यामुळें वीरशैव समाजाच्या शिक्षणक्षेत्रांत क्रांतीच घडून आली. जवळजवळ अर्ध्या शतकाच्या ह्या दीर्घकाळांत हजारो गरीब विद्यार्थ्यांनी ह्या फंडाच्या सहाय्यानें विद्यार्जन करून, ते उन्नत पदास चढले आहेत, व ते आज निरनिराळचा कार्यक्षेत्रांत प्रामुख्यानें वावरत असून समाजास भूषणावह झाले आहेंत. यामुळें समाजाच्या प्रगतीचे पाऊल झपाटयानें पुढें पडत आहे. ह्याचें श्रेय मुख्यतः आप्पासाहेबांच्या औदार्यालाच आहे, यांत कांहीं संशय नाहीं. अशारितीनें वीरशैव समाजाला आपल्या औदार्यानें कायमचे ऋणी करुन ठेवलेल्या ह्या महाभागाच्या पुण्यस्मृतीला आपली भक्तिपूर्वक श्रद्धांजली वाहणें प्रत्येक वीरशैवाचें कर्तव्य आहे. हें कर्तव्य वीरशैव समाज अंशतः पार पाडीत असून त्यांच्या पुण्यस्मृतीचें कायम स्मारक करण्याच्या उद्देशानें समाजाच्या कांहीं संस्था त्यांच्या पवित्र नांवानें सुशोभित केल्या गेल्या आहेत. अशा संस्थांत बेळगांव येथील प्रसिद्ध लिंगराज कॉलेज प्रमुख आहे.

अशा या थोर दानशूर 'महाभागाचें अंशतः अनुकरण करुन वीरशैव समाजातील श्रीमंत धनिकलोक समाजोद्धाराच्या कार्यास हातभार लावतील तर वीरशैव समाजाच्या भरभराटीस वेळ लागणार नाहीं. परमेश्वर त्यांना अशी सद्‌बुद्धी देवो !



लेखांक ५

# शैवागम

( सन १९६५ एप्रिल महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख )

सर्ववेदानुसारित्वात् शैवतंत्र विशिष्यते—सिद्धांत शिखामणि.

वीरशैव धर्म शैवागमोक्त असून शैवागमांचें तत्त्वज्ञान व त्यांत वर्णिलेलें मुख्य धार्मिक विधी यांचा वीरशैव धर्मांत समावेश झाला असल्या कारणानें वीरशैव धर्मीयांना आपल्या धर्माच्या माहितीं बरोबर शैवागमांचीही थोडी वहुत माहिती असणें आवश्यक आहे. करितां शैवागमांचा संक्षिप्त परिचय करुन देण्याच्या दृष्टीनें हा लेख लिहिला आहे.

हिंदुधर्मात जेवढें विचार व आचार स्वातंत्र्य आहे तेवढें स्वातंत्र्य जगांतील इतर कोणत्याही धर्मांत असलेलें दिसून येत नाहीं. या मतस्वातंत्र्यामुळें हिंदु समाजांत एकजूट व शिस्त यांचा अभाव असून त्यामुळे त्यांत निरनिराळे पंथभेद निर्माण होऊन समाजांत विस्कळितपणा उत्पन्न झाला आहे. असें असलें तरी त्या विचार स्वातंत्र्यामुळें हिंदुधर्माच्या आध्यात्मिक क्षेत्रांत झालेली प्रगती प्रशंसनीय असून तेवढी प्रगती दुसऱ्या कोणत्याही धर्मांत झालेली नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे. वेदोपनिषदें व गीता ह्या धार्मिक ग्रंथातील अध्यात्मज्ञान जगांतील नामांकित विद्वानांच्या प्रशंसेला पात्र झाले असून त्यांनीं त्यांची मुक्तकंठानें स्तुति केली आहे. तसेंच त्या धर्मग्रंथावर जगांतील प्रमुख भाषांमध्यें ग्रंथरचना होत आहे.

हिंदुधर्मातील या विचार व आचार स्वातंत्र्यामुळें हिंदुधर्मीयांनीं निरनिराळ्या दैवतांना आपलें उपास्य दैवत मानून त्यांची पूजाअर्चा निरनिराळ्या पद्धतीनें करुं लागल्यामुळें हिंदुधर्मात प्राचीन काळापासूनच अनेक पंथ निर्माण झाले. त्यामध्यें शैव, वैष्णव व शाक्त हे पंथ प्रमुख आहेत. ह्या पंथांत वेदोपनिषदांना धार्मिक प्रमाण ग्रंथ म्हणून मानिले जात असले तरी त्यांचा सर्व आचारधर्म आपापल्या पंथांच्या आगमग्रंथांनाच अनुसरुन आहे. प्रत्येक पंथाचे आगम ग्रंथ निरनिराळे असून त्यांची संख्याही विपुल आहे. वैष्णव पंथाच्या आगम ग्रंथांची संख्या १०८ असून त्यांना 'पांचरात्र तंत्र' अथवा "पांचरात्र संहिता" असें नांव आहे. शाक्त पंथाचे आगम ग्रंथ सामान्यतः तांत्रिक ग्रंथ या नांवानें संबोधलें जात असून, ते कौलागम ६४ शुद्धागम ५ मिश्रागम ३ व इतर ५ असे एकंदर ७७ आहेत. शैवपंथाच्या आगम ग्रंथांना निराळे नांव नसून ते सामान्यतः 'शैवागम' अथवा 'शैवतंत्र' या नांवानेंच प्रसिद्ध आहेत. मुख्य शैवागम २८ असून त्यांतले पहिले द१ा शिवभेद व बाकीचे १८ रुद्रभेद या नांवानें प्रसिद्ध आहेंत. याशिवाय या मुख्य आगमांचे २१८ उपागम आहेत. कांहींच्या मतें ते २२३ आहेत. शैवपंथाचे धार्मिक वाङमय प्रचंड असून त्यांची श्लोकसंख्याही अगणित आहे. मुख्य शैवागमांचीं नांवें त्यांची श्लोकसंख्या कंसांत खाली दिली आहेत.

**शिवभेद** – १ कामिक (परार्ध), २ योगज (लक्ष) ३ चिंत्य (लक्ष) ४ कारण (कोटी), ५ अजित (नियत), ६ दीप्त (नियत), ७ सूक्ष्म (पद्म), ८ सहस्र (शंख), ९ अंशुमान (पंचलक्ष), १० सुप्रभेंद (त्रिकोटी)

**रुद्रभेंद** – ११ विजय (त्रिकोटी), १२ निश्वास (कोटी), १३ स्वायंभुव (त्रिकोटयार्ध–साडेतीन कोटी), १४ अनल (नियत), १५ वीर (नियत), १६ रौरव (अर्बुदाष्टक), १७ मुकुट (शतसहस्र), १८ विमल (त्रिलक्ष), १९ चंद्रज्ञान (त्रिकोटी), २० मुखबिंब (शतसहस्र), २१ प्रोग्दीत (लक्षत्रितय) २२ ललित (अष्टसहस्र), २३ सिद्ध (कोटी), २४ संतान (शतसहस्र), २५ सर्वोत्तर (द्विलक्ष), २६ पारमेश्वर (द्वादशलक्ष), २७ किरण (कोटीपंचक), २८ वातुल (शतसहस्र).

याशिवाय २१८ अथवा २२३ उपागमांची श्लोकसंख्या निराळी. याच्या वरून ह्या शैवागम वाङमयाच्या अवाढव्यतेची कल्पना येते.

या सर्व शैवागम वाङ्मयाचे अजूनपर्यंत पुरतें संशोधन झाले नसल्यामुळें व या अवाढव्य वाङ्मयापैकीं फारच थोडा भाग आज उपलब्ध असल्यामुळें हें वाङ्मय कसें व केव्हां निर्माण झालें व तें कोणी निर्माण केलें या बद्दल कांहीं ऐतिहासिक पुरावा मिळत नाहीं. या वाङ्मयाचा जो भाग सांप्रत उपलब्ध आहे त्याच्यावरुन पहातां हे आगम मानवनिर्मित नसून प्रत्यक्ष भगवान् शिवानेंच आपली अर्धांगी पार्वतीला धर्मोपदेश करतांना ह्या शैवागमांची निर्मिती केला आहे, असें त्यांत नमूद केले आहे. याच्यावरुन वेदाप्रमाणें शैवागम ग्रंथ हा अपौरुषेय आहेत, असें म्हणावयास हरकत नाहीं. या शैवागम ग्रंथांमध्यें वेदांचा उल्लेख दिसून येतो. ह्याच्यावरुन याची निर्मिती वेदानंतर झालेली असली पाहिजे यांत संशय नाहीं. परंतु यांची प्रत्यक्ष निर्मिती मागाहून झालेली असली तरी त्यांत नमून केलेले धार्मिक आचारविचार वेदांतील यज्ञयाग वगैरे कर्मकांडाहून निराळे असून ते वेदपूर्वकालीन व अत्यंत प्राचीन अशा शैवधर्माशीं संबंधित आहेत असें दिसून येते. भारतांत आर्यांचें आगमन होण्यापूर्वी या देशांतील सर्व भागांत द्रविडांची वस्ती होती. त्यांची संस्कृतीही सुधारलेली व परिणतावस्थेला पोंचलेली होती, हें मोहेंजोदारो व हरप्पा येथील उत्खननावरुन व अलीकडे केल्या गेलेल्या ऐतिहासिक संशोधनावरुन स्पष्ट झालेले आहे. त्याकाळीं सर्व भारतांत फक्त शैवधर्मच अस्तित्वांत होता. लोक शिव व त्याचें प्रतीक लिंग ह्यांचीच पूजा करीत होते. त्या काळच्या द्रविडांची संस्कृति नागरिक स्वरुपाची असून त्यांना योगशास्त्र, स्थापत्यशास्त्र (Engineering) व नगर रचना शास्त्र (Town planning) वगैरे शास्त्रांची माहितीं होती, व ते देवालयें बांधून त्यांत देवतांच्या मूर्तीची स्थापना करुन त्यांची पूजाअर्चा करीत होते, असें ऐतिहासिक पुराव्यावरुन आढळून आलें आहे. शैवागमांत मुख्यतः याच विषयांची चर्चा केली आहे. याच्या उलट वेदामध्यें मूर्तिपूजा, देवालय बांधणें, नगररचना वगैरे द्रवीड संस्कृतीच्या विषयांचा उल्लेख सुद्धां आढळून येत नाहीं. याच्यावरुन सांप्रत हिंदूधर्मामध्यें प्रचलित असलेली मूर्तिपूजा, लिंगपूजा, देवालये बांधून त्यांत देवतांच्या मूर्तीची प्रतिस्थापना करणें वगैरे धार्मिक आचार मूळ शैवधर्मीय द्रविड संस्कृतींत निर्माण झाले असून आर्य द्रविड संस्कृतींचा संगम झाल्यानंतर आर्यांनीही या धार्मिक आचारांचा अंगिकार केला असें दिसून येतें. ह्या ऐतिहासिक पुराव्यामळें, मूळ शैवागम प्राचीन तामीळ भाषेंत होते, ते कांहीं कारणानें नष्ट होऊन गेले, व संस्कृत भाषेतील सांप्रतचे शैवागम हे त्या तामीळ भाषेतील शैवागमांचे अनुवाद आहेत असें कांहीं विद्वानांचें मत झाले आहे. परंतु वरील सर्व विवेचनावरुन शैवागमांची उत्पत्ति वेदवाङ्मयापासून

नसून प्राचीन शैवधर्माच्या आचारविचांरानाच मूर्त स्वरुप दिलेले शैवपंथाचे धार्मिक ग्रंथ आहेत यांत कांहीं संशय नाहीं.

## शैवागमांचा काल‌निर्णय.

शैवागमांचा कालनिर्णय अजून जरी लागलेला नसला तरी सांप्रत उपलब्ध असलेल्या ऐतिहासिक पुराव्यावरुन पाहतां ख्रिस्तशकाच्या प्रारंभीं हे मुख्य २८ शैवागम अस्तित्वात होते, एवढेंच नव्हे तर त्यांचा प्रचार सर्वभारतभर व बाहेर जावा, सुमात्रा, कांबोज, चंपा वगैरे पूर्वेकडील देशामध्येंही झाला होता, असें दिसतें. ख्रिस्त शतकाच्या आरंभीं हिंदुस्थानांत होऊन गेलेलीं कुषाण, त्रैकुट, भवनाग, पल्लव, चोळ हीं राजघराणीं शैवधर्मीय असून त्यांच्या काळीं हे शैवागम अस्तित्वांत होते असें आढळून येतें दक्षिण हिंदुस्थानांतील कांची येथील कैलास-नाथ देवालयांत पांचव्या शतकाच्या अखेरीस कोरलेल्या एका शिलालेखामध्यें त्या शैवागमांचा उल्लेख केला गेला आहे. जावा सुमात्रा देशांत सांपडलेंल्या शिला-लेखामध्येंही शैवागमांचा उल्लेंख आढळून येतां. आरंभापासून नेपाळ देश शैवपंथी आहे. तेथील दरवार ग्रंथसग्रहालय एक अत्यंत प्रसिद्ध प्राचीन ग्रंथसंग्रहालय असून तेथें सर्व शैवागमांचीं नांवें असलेली एक जुनी यादी आहे व कांहीं हस्त-लिखित प्रतीही आहेत. या सर्व ऐतिहासिक पुराव्यावरून पाहतां हे मुख्य २८ शैवागम ख्रिस्तशकापूर्वीच निर्माण झाले असून त्या शकाच्या प्रारंभकाळीं त्यांचा प्रचार सर्व भारतभर व नेपाळ, जावा, सुमात्रा, वगैरे बाहेरील देशामध्येंही झालेला होता व ते शैवधर्माचे प्रमाणग्रंथ म्हणून मानले जात होते, असें दिसून येतें.

याप्रमाणें प्राचीन काळीं ह्या शैवागमांचा सर्वत्र प्रचार झालेला होता तरी कालानुसार त्यांचें महत्व कमी होऊन त्यांचा बहुतेक भाग कालोदरांत गडप झालेला आहे. किंवा कोठेंतरी अप्रकाशित स्थितींत पडून राहिलेला आहे. सांप्रत ह्या २८ शैवागमांपैकीं फक्त कामिक, कारण, सूक्ष्म, सुप्रभेद, रौरव, चंद्रज्ञान, सर्वोत्तर, पारमेश्वर, वातुल व मुरगेंद्र ह्यांचे कांहीं भाग मात्र उपलब्ध आहेत.

## शैवागमांचे विवरण

मुख्य शैवागमांतील विवरण क्रियापाद, चर्यापाद, योगपाद, व ज्ञानपाद असे चार भागामध्यें विभागलेले आहे. नगररचना, देवालयाचें बांधकाम, देवालयाचें

बांधकाम, देवतांच्या मूर्तींची घडण व त्यांची देवालयांत प्रतिष्ठापना वगैरे विषय सविस्तररीतीनें क्रियापादांत वर्णिले आहेत. चर्यापादांत नित्य व नैमित्तिक धार्मिक कर्में आचरण्याविषयींच्या नियमांचें विवेचन केले आहे. योगपादांत योगसाधना व तत्संबंधित शरीरशास्त्र यांचे विवेचन आहे ज्ञानपादांत शैवपंथाच्या तत्त्वज्ञानाची चर्चा केली गेली आहे.

## क्रियापाद.

सर्व शैवागमांची साधारण रचना पाहिली तर त्यामध्यें तत्त्वज्ञान अथवा आध्यात्मिक विषयांच्या चर्चेपेक्षां धार्मिक आचारांच्या विवेचनालाच जास्ती महत्त्व दिलें आहे. त्यामुळें शैवागम ग्रंथांचा बहुभाग क्रियापाद व चर्यापाद यांनींच व्यापलेला आहे. वर लिहिल्याप्रमाणें क्रियापादामध्यें मुख्यत: वसाहती व देवालयांचे बांधकाम व देवतांच्या मूर्तींची घडण व प्रतिष्ठापना या विषयींचे सविस्तर वर्णन आढळून येते. हें वर्णन ऐतिहासिक दृष्टीनें महत्वाचें व उद्बोधक असल्यामुळें त्यांचा सारांश खालीं दिला आहे.

## नगररचना

नवीन वसाहत स्थापण्याकरतां प्रथम वसाहतीला योग्य व नैसर्गिक अनुकूलता असलेली जागा निवडावी. होतां होईल तों ती जागा निसर्ग सौदर्यानें समृद्ध असावी. नंतर तीं जागा नांगरुन त्यांत कोणतें तरी धान्य पेरावें व त्याचे पीक तयार झाल्यावर तें गुरांना खाण्यास सोडावें. असें केल्यानें दुष्ट ग्रहांची, भुताखेतांची भावी पीडा टळते. नंतर वसाहत रचनेचा नकाशा (टाऊन प्लॅन) तयार करावा. त्यानंतर एका शुभ मुहूर्तावर शंकुस्थापना (पायाभरणी) समारंभ करून व निरनिराळ्या देवतांना तूप–दहीमिश्रित अन्नाचे बली (नैवेद्य) देऊन वसाहत बांधण्यास प्रारंभ करावा. शाकाहारी व मांसाहारी लोकांच्या वस्तीची व्यवस्था वसाहतीच्या वेगळ्या भागांत करावी. त्या त्या भागांतील लोकांच्या आराध्य देवतांचीं देवालयें त्या त्या भागांत बांधावीत तसेंच त्या त्या जातीच्या व वर्गांच्या लोकांना आवश्यक असलेल्या इतर सुखसोयींची व्यवस्था त्या त्या भागात करावी. बाजारहाट, सार्वजनिक इमारती वगैरे त्या त्या योग्य स्थळी बांधाव्यात. मोहेंजोदारो उत्खननांत आढळून आलेली आधुनिक पद्धतीची रेखीव नगररचना व शैवागमांतील नगररचनेचें वरील वर्णन यांच्यातील तंतोतंत जुळणारे साम्य

ऐतिहासिक दृष्टीनें महत्वाचें आहे. याच्यावरून शैवागमांचा वेदपूर्वकालीन प्राचीन शैवधर्मांशी असलेला निकटसंबंध स्पष्टपणे दिसून येतो.

### देवालयें

वसाहत रचनेच्या बाबतींत जागेची निवड करण्यापासून वसाहतीच्या प्रत्यक्ष बांधकामास सुरवात करण्यापर्यंतचे सर्व विधी देवालयाची स्थापना करण्याबाबतही करावेत. देवालयाच्या बांधकामाचा सविस्तर प्लॅन तयार करुन त्यावरहुकूम देवालय बांधावें. देवालयाचें गर्भगृह, पीठ, शिखर, मंटप, प्राकार, वगैरे भाग प्लॅनप्रमाणें त्या त्या भागांत व योग्य प्रमाणांत बांधावेत. देवालयांतील खांब, छत, भिंती वगैरे भागांवर खोदण्याच्या बारीक सारीक नक्षीकामाचा सुद्धां प्रथम प्लॅन तयार करून नंतर प्लॅनप्रमाणें शास्त्रोक्त खोदकाम करावें. बांधकाम संपल्यानंतर शुभ मुहूर्तावर देवालयांत देवतेची मूर्ति आणून समारंभानें त्याची प्रतिष्ठापना करावी. दक्षिण हिंदुस्थानांतील प्रमुख देवालयांची रचना व त्यांतील नक्षीकाम शैवागमांतील नियमांच्या आधारावरच केलेलीं आहेत. क्रियापादांतील वरील सर्व वर्णनावरून त्याकाळीं वसाहती, देवालयें अथवा इमारती बांधण्याचें स्थापत्य शास्त्र (Engineering) व नक्षीकामाचे शिल्पशास्त्र ( Architecture ) किती परिणतावस्थेला पोचलीं होतीं याची कल्पना येते.

### मूर्तिघडण व प्रतिष्ठापना :–

वसाहत व देवालयाच्या बांधकामाप्रमाणें देवतांच्या मूर्ति बनविण्याचे सविस्तर नियमही शैवागमांत नमूद केले आहेत. इतर देवतांच्या मूर्तीमध्यें प्रकार नाहींत. परंतु शिवाच्या बाबतींत त्याची मूर्ति व त्याचें प्रतीक लिंग असे दोन प्रकार आहेत लिंग हें शिवाचें निष्कल प्रतींक व मूर्ति सकल प्रतीक मानलें जातें. शैवागमांत लिंगाचे अनेक प्रकार नमूद केले असून ते कोणकोणत्या द्रव्यापासून तयार करावें, त्याचें पीठ व पिंड वगैरेचा आकार कसा व किती असावा वगैरे सविस्तर माहिती दिली गेली आहे तसेंच देवतांच्या मूर्ति घडविण्याचे नियमही सविस्तर दिले गेले आहेत. मूर्ति अथवा लिंग तयार केल्यानंतर त्याची प्रतिष्ठापना करणें हा एक महत्वाचा धार्मिक विधी आहे. मूर्तीची अथवा लिंगाची प्रतिष्ठापना झाल्यानंतर त्यांच्यामध्यें त्या देवतांचें चैतन्य वास करतें अशी भावना आहे. यामुळें प्रतिष्ठापनेशिवाय कोणतीहा मूर्ति अथवा लिंग पूजेला लायक होत नाहीं.

## चर्यापाद

चर्यापादामध्यें शैव गृहस्थानें स्नान, पूजा, जपतप, नैवेद्य केल्याशिवाय अन्न ग्रहण करू नये असा निर्बंध घातला गेला आहे तसेंच दीक्ष विधी, विवाहकार्य, अंत्यसंस्कार, वगैरे गार्हस्थ्य जीवनाशीं निगडित असलेले १६ संस्कार याबद्दलही सविस्तर नियम दिलेले आहेत. या बाबतींत वैदिक व आगमिक संस्कार यांच्यामध्यें विशेष कांहीं भेद नाही. परंतु आगमिक संस्कारांचें आधिदैवत शिव असून सर्व मंत्रतंत्र शिवोक्त आहेत. गायत्री मंत्राच्या ठिकाणीं 'नमः शिवाय' या पंचाक्षरी मंत्राचा अथवा 'ॐ नमः शिवाय' ह्या षडक्षरी मंत्राचा जप केला जातो. दीक्षाविधी शैवपंथाचे वैशिष्टय असून त्याचे नियम नमूद केले गेले आहेत. शैवागमाप्रमाणें दीक्षेचे समयदीक्षा व निर्वाणदीक्षा असे दोन भेद आहेत निर्वाणदीक्षा शक्तिपाताचा विधी आहे. परंतु समयदीक्षा सामान्यदीक्षा असून ती दीक्षा प्रयेक शैवानें घेतलीच पाहिजे, असा निर्बंध आहे.

## योगपाद

मोक्षप्राप्तीकरतां योगसाधना करणें हें शैवपंथाचें वैशिष्टय आहे. मोहेंजोदारो संस्कृतीच्या वेळींसुद्धां लोकांना योगाभ्यासाची माहिती होती हें तेथें सांपडलेल्या ऐतिहासिक पुराव्यावरून स्पष्ट आहे. त्याचीच परंपरा पुढें शैवपंथांत चालत आलेली आहे. यामुळें शैवागमांत योगसाधनेला विशेष महत्व दिलें गेलें आहे. योगाभ्यासाला शरीरशास्त्राची संपूर्ण माहिती आवश्यक आहे. त्याकरतां योगपादांत प्रथम शरीरशास्त्राचा सांगोपांग विचार केला गेला आहे. षट्चक्र, तीन मुख्य नाडया व सर्व शरीरभर पसरलेल्या ७२००० लहान लहान रक्त नाळ या सर्वांचें सविस्तर वर्णन केले गेले आहे. एवढेंच नव्हे तर सुप्रभेदागमात गर्भधारणेच्या वेळेपासून प्रसूतिपर्यंत गर्भाची वाढ कशी कशी होत जाते, याचेंसुद्धा सविस्तर वर्णन केलें गेलें आहे. याच्यावरुन त्यावेळीं शरीर शास्त्रांतसुद्धां किती प्रगति झाली होती याची कल्पना येते.

योग साधनेच्या विवेचनांत यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा व समाधि या योगसाधनेच्या अष्टांगांचें सविस्तर वर्णन केले गेले आहे. हें वर्णन थोडया बहुत फरकानें पातंजल योगशास्त्राशीं मिळतेजुळते आहे. शेवटचे दोन अंग ध्यान व समाधि यांचे सकल व निष्कल ध्यान व सविकल्प व निर्विकल्प समाधि असे दोन भेद कल्पिले आहेत. कांहीं शैवागमामध्यें शिवयोगाचें वर्णन

आढळून येतें. हा शिवयोग वरील योगसाधनेहून थोडासा निराळा असून त्याच्यामध्यें शिवलिंगपूजा, त्याची भक्ति, त्याच्या नांवाचा जप व ध्यान वगैरेचा समावेश होतो. या शिवयोगाचे अष्टांग, भक्ति, वैराग्य, अभ्यास व ध्यान, एकांत, भिक्षाटन, लिंगपूजा व शिवस्मरण अशी आहेत (पारमेश्वरागम). लिंगपूजेचे सामान्य पूजा व मानसपूजा असे दोन प्रकार असून त्यांत मानसपूजेलाच जास्त महत्व आहे. लिंगाची ही मानसपूजा 'अहिंसा, इंद्रियजय, सर्वभूतदया, क्षमा, ध्यान, तप, ज्ञान, व सत्य' या आठ फुलांनीं करावी असें सूक्ष्मागमांत सांगितले आहे. (पटल ६ श्लोक ३१,३२) सामान्य योग अथवा शिवयोग साधनेंत सिद्धि मिळविलेल्या योगी जनांना शिवयोगी असें नामाभिधान आहे.

ज्ञानपाद.

धार्मिकाचरणाच्या नियमांचें प्रतिपादन करणें हा शैवागमाचा मुख्य उद्देश आहे. त्यांत तत्वज्ञानाच्या विवेचनाला विशेष महत्व दिलेलें नाहीं. परंतु शैवागमाचें विशिष्ट तत्व ज्ञान त्यांत स्पष्टपणें मांडले गेले आहे. या तत्वज्ञानाला 'शैवसिद्धान्त' असें नांव आहे. शैवागमांत या तत्त्वज्ञानाचें विशेष विवेचन नसलें तरी, त्याच्यावर अनेक शैवाचार्यांनीं व इतर भाष्यकारांनीं बहुमोल ग्रंथ रचना केली आहे.

शैवसिद्धान्ताप्रमाणें जगाचा निर्माता, त्राता व संहारकर्ता 'परशिव' एकच असून तो निर्गुण, निराकार, अनाद्यनंत, द्वंद्वातीत व सच्चिदानंद असा आहे. त्याला महालिंग असे नांव आहे. तो स्वतः अकर्ता असला तरी त्याच्यामध्यें विश्वनिर्माणाच्या संकल्पाचा प्रादुर्भाव झाल्यावर त्याच्यामध्यें शक्ति निर्माण होते व तो स्वतः शिवरूप धारण करतो. ही शक्ति शिवापासून निराळी नसून फुलामध्यें त्याचा वास दडलेला असतो अथवा सूर्यामध्यें त्याचें तेज अधिष्ठित असतें त्याप्रमाणें परशिवाच्या ह्या शिवरुपामध्यें ही शक्ति अधिष्ठित असते. या शिवाचे १ शिव २ शांति ३ विद्या ४ नाद ५ बिंदु असे पांच रुपभेद आहेत. त्याचप्रमाणें शक्तीचीही १ पराशक्ति २ आदिशक्ति ३ इच्छाशक्ति ४ ज्ञानशक्ति व ५ क्रियाशक्ति अशीं पांच रुपें आहेत. या सर्वांना शिवसृष्टि असे नांव आहे. ह्यापासून लिंग अथवा सदाशिव तत्त्व निर्माण होते. त्याला सादाख्य असें नांव आहे. लिंगाच्या वरच्या भागांतून ईश्वर व खालच्या भागांतून सद्विद्या अथवा शुद्धविद्या हीं तत्वें निर्माण होतात. त्यांनाच ईश्वर पार्वती हें नांव आहे. हीं तत्वें मूल निष्कल शिवशक्तीचें सकल रुप आहे. ह्यापासून पुनः सात तत्वें निर्माण होऊन त्या नंतर 'सांख्य शास्त्रां'तील पहिलें तत्व प्रकृति निर्माण होते. त्यापासून सांख्य शास्त्रांतील चौवीस

तत्त्वें निर्माण होऊन त्यापासून सर्व विश्वाची निर्मिति होते. सांख्यशास्त्रांत शिवसृष्टीची चोवीस तत्त्वें मानलीं गेली आहेत. परंतु शैवसिद्धान्ता प्रमाणें ती छत्तीस आहेत. त्यांचीं नांवें खालील प्रमाणें —

**१ शिव, २ शक्ति, ३ सदाशिव अथवा सादाख्य, ४ ईश्वर, ५ शुद्धविद्या, ६ माया, ७ काल, ८ नियति, ९ कला, १० विद्या, ११ राग, १२ पुरुष, १३ प्रकृति, १४ महत् अथवा बुद्धि, १५ अहंकार, १६ मन, १७–२१ पांच ज्ञानेंद्रिये २२–२६ पांच कर्मेंद्रियें, २७–३१ पांच तन्मात्रा व ३२–३६ पंचमहाभूतें.**

शैवसिद्धांताप्रमाणें जीव हा शिवाचा अंश असून तो मलानें आवृत आहे. या सिद्धान्तांत जीवाला पशु, शिवाला पति व मलाला पाश अशी सांप्रदायिक नांवें आहेत. याप्रमाणें पशु, पति आणि पाश या तीन तत्त्वावर ह्या तत्त्वज्ञानाची उभारणी केली गेली आहे. पाश म्हणजे मल तीन प्रकारचे आहेत. आरंभापासूनच जीवाशी संलग्न असलेला व एकत्वामध्यें अनेकत्वाचा आभास उत्पन्न करणारा "आणव मल", मायेपासून निर्माण झालेला "माया मल" व पूर्वकर्मांनें उत्पन्न झालेला "कार्मिक मल" अशीं त्यांची नांवें आहेत. जोपर्यंत जीव ह्या तीन मलांनीं बद्ध आहे तोपर्यंत त्याला अध्यात्म ज्ञानाची प्राप्ति होणें शक्य नाहीं. परंतु गुरुनें दिलेल्या दीक्षेनें हे तीनही मल नष्ट होऊन तो जीवात्मा शुद्धात्मा बनतो, व मोक्ष मार्गाचें आक्रमण करण्यास लायक होतो. वेदान्त शास्त्रांत कर्मफल नष्ट होण्यास देवाच्या अनुग्रहाशिवाय दुसरा मार्ग नाहीं. परंतु हा अनुग्रह कधीं होईल याचा भरंवसा नसल्यामुळें तो पर्यंत जीवाला अनेक जन्म घेऊन कर्मफलें भोगावीं लागतात. परंतु शैवागम शास्त्राप्रमाणें गुरूच्या अनुग्रहाला शिवाच्या अनुग्रहा इतकेंच महत्व आहे त्यामुळें गुरुनें निर्वाणदीक्षा देऊन अनुग्रह केल्यावर जीवाची सर्व कर्मफलें नष्ट होऊन त्याला पुढें पुनर्जन्म घ्यावा लागत नाहीं. म्हणून सूक्ष्मागमामध्यें दीक्षेची व्याख्या "दीयते लिंगसंबंधः। क्षीयते कर्मसंचयः।" अशी केली आहे. याप्रमाणें शैव सिद्धान्तांत गुरुला व दीक्षाविधीला फार महत्व दिलें गेलें असून, दीक्षाविधी त्या शास्त्राचें वैशिष्ठ्य मानलें गेलें आहे.

**शैवागम व वीरशैव धर्म**

कांहीं शैवगमामध्यें निरनिराळ्या शैवपंथाची चर्चा केली गेली असून त्या सर्वांत वीरशैव पंथच श्रेष्ठ आहे, असें नमूद केलें आहे. वातुलागमांत वीरशैवांचे

सामान्य, विशेष व निराभारी, असें तीन भेद केलें आहेत. परंतु पारमेश्वरागमांत असे भेद न करतां दीक्षा घेतलेले सर्व वीरशैव समान दर्जाचे असून त्यांच्यामध्यें कोणत्याही प्रकारें भेदभाव करूंनये, असें स्पष्ट नमूद केलें आहे. वीरशैव धर्म शैवागमोक्त असून त्यांत शैवागमांना प्रमाण ग्रंथ म्हणून मानले आहे. त्याचा अर्थ शैवागमांतील सर्वच विधानें वीरशैव धर्माला मान्य आहेत असें नव्हें. तसेच सर्व शैवागमांतही एकवाक्यता नाहीं. परंतु शिवाला उपास्य दैवत मानून त्याची व त्याचें प्रतीक लिंगाची पूजाअर्चा व आराधना करणें, दीक्षाविधी, स्त्रियांना व सर्व वर्णाच्या लोकांना दीक्षेचा व इतर धार्मिक विधी आचरण्याचा अधिकार, 'नमःशिवाय' अथवा "ॐ नमःशिवाय" ह्या मंत्राचा जप, योगसाधना, विश्वनिर्माणाचीं ३६ तत्त्वें वगैरे शैवागमातील मुख्य तत्त्वज्ञान व मुख्य धार्मिक विधी थोडयावहुत फरकानें वीरशैव धर्मानें स्वीकारलीं आहेत. सूक्ष्मागम, पारमेश्वरागम, व चंद्रज्ञानागम, या शैवागमांमध्यें वीरशैव धर्माच्या मुख्य 'षट्स्थल सिद्धान्ता'चें सविस्तर वर्णन केले गेले आहे. वीरशैव धर्मांचे धार्मिक ग्रंथ 'सिद्धान्त शिखामणि', श्रीकरभाष्य, बसवपुराण, यांत वरील शैवागमांतील श्लोकांचे आधार दिले आहेत. श्री बसवेश्वरकाळीं व त्यांच्यानंतर होऊन गेलेल्या अनेक शिवशरणांनीं आपल्या वचनांत उल्लेखिलेल्या सिद्धान्तांना शैवागमांचेच आधार दिले आहेत. कांहीं वचनामध्यें त्यांनीं त्यांना 'श्रुति' असें म्हटलें आहे. रौरव शैवागमांतील कांहीं श्लोकांच्या आधारावर श्री चन्नबसवेश्वरांनीं आपला प्रसिद्ध 'करणहसुगे' ग्रंथ रचला आहे. तसेच प्रसिद्ध वीरशैवाचार्य 'निजगुण शिवयोगी' यांनीं आपल्या 'विवेक चिंतामणी' ग्रंथांत सर्व शैवागमांचे साररुपानें वर्णन केलें आहे. या सर्व हकीगतीवरुन शैवागम व वीरशैव धर्म यांच्यामध्यें असलेल्या निकट संबंधाची कल्पना येईल.

## लेखांक ६

# युगप्रवर्तक श्रीबसवेश्वरांचें संक्षिप्त जीवनचरित्र

( सन १९६५ मे महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख )

येत्या अक्षय्य तृतीयेच्या दिवशीं म्हणजे मंगळवार ता. ४–५–६५ रोजी 'बसवजयंति' आहे. त्या दिवशीं महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं वीरशैव समाज ही जयंति साजरी करील. परंतु १२ व्या शतकांत श्री बसवेश्वरांनीं केलेल्या खऱ्या कार्याची माहिती महाराष्ट्रीयांना व महाराष्ट्रांतील वीरशैवांनासुद्धां नसल्यामुळें सांप्रत ही जयंति वीरशैव धर्माचा एक धार्मिक विधी म्हणून आचरणांत आणला जातो. तथापि श्री बसवेश्वरांनीं घडवून आणलेल्या धार्मिक, सामाजिक, सांस्कृतिक व आर्थिक सुधारणांचा विचार केला तर त्यांच्या कार्यांच्या राष्ट्रीय व मानवतावादी स्वरूपाची कल्पना येते. म्हणून या लेखांत त्यांच्या कार्याच्या खऱ्या स्वरूपाचें दिग्दर्शन करण्याचा प्रयत्न केला आहे.

### बसवेश्वरपूर्वकालीन कर्नाटकाची परिस्थिति.

श्री बसवेश्वरांच्या कार्याचें खरें मूल्यमापन करण्यास त्यांच्यावेळीं कर्नाटकांत अस्तित्वांत असलेल्या परिस्थितीची जाणीव करून घेणें आवश्यक आहे. त्यावेळीं कर्नाटकांत जैन धर्म व हिंदुधर्मांतर्गत वीरमाहेश्वर, काळामुख, पाशुपत व वैष्णव वगैरे पंथ अस्तित्वांत होते. प्राचीन काळीं कर्नाटकांत जैन धर्म अत्यंत भरभराटींत

असला तरी यावेळीं त्याचे धर्मगुरु आपल्या धर्माच्या मूल, उदात्त व शुद्ध तत्त्वापासून च्युत झाले होते. त्या समाजावरही हिंदूधर्मांच्या अनिष्ट चालीरूढींचा पगडा बसलेला होता. तसेंच हिंदुधर्मांच्याही सर्व पंथांचें अधःपतन झालें होतें. मूळ ज्ञानमार्गी व भक्तिमार्गी शुद्ध सात्विक हिंदु धर्माचा लोप होऊन त्या ठिकाणीं यज्ञयाग, होमहवन, पशुवली, मंत्रतंत्र, वगैरे कर्मकांडाचें प्रावल्य माजलें होतें. चातुर्वर्ण्याची रचना मूलतःगुणकर्मावर केलेली असली तरी, यावेळीं त्याचें वरिष्ठ-कनिष्ठ वर्ग, उच्चनीच जाती, स्पृश्यास्पृश्यता वगैरे समाजघातक व अनिष्ट रूढीमध्यें पर्यवसान झाले होतें. त्यामुळें हिंदुसमाजातील ऐक्य नष्ट पावून तो लहान लहान जातीमध्यें दुभंगला गेला होता. आश्चर्याची गोष्ट म्हणजे या सर्व समाजघातक रुढींना धर्माचें शिक्कामोर्तब करण्यांत आले होते. धर्म संरक्षक म्हणवून घेणाऱ्या वर्गामध्येंच धर्माचा, आध्यात्मिक ज्ञानाचा व सात्विक गुणांचा लोप होऊन त्यांच्यांत अहंकार व दांभिक कर्माचार वाढला होता. शास्त्राध्ययन नुसत्या वादविवादाकरतां व त्याच्या निरर्थक बडबडीनें अज्ञ जनतेवर छाप पाडण्याकरतां केला जात होता.

ह्या वरिष्ठ वर्गाच्या मूठभर लोकांनीं स्वार्थीपणानें व आपलें धार्मिक वर्चस्व कायम टिकवण्याच्या दुष्ट हेतूनें कनिष्ठ वर्गाच्या वहुजन समाजाला शास्त्राध्ययनाचा व मोक्षाचा अधिकार नाहीं अशा काल्पनिक व लंगड्या सबबीवर बहुजन समाजाची धार्मिक मुस्कटदावी केली होती. ब्राह्मण हे भूदेव आहेत व त्यांची सेवा करणें हा कनिष्ठ वर्गाचा धर्म आहे, अशी मूढ भावना कनिष्ठ वर्गाच्या लोकांत त्यांनीं निर्माण केली होती. हिंदुधर्माच्या सार्वजनिक देवालयांतील पूजारी सुद्धां याच वर्गांतील लोक होते. त्यांनीं स्वार्थीपणानें व धनलोभानें वहुजन समाजांतील अज्ञ व गरीव लोकांना देवदर्शनही दुर्मिळ करून ठेवलें होतें. अस्पृश्य लोकांची स्थिती तर अत्यंत केविलवाणी होती. त्यांना देवालयांत व इतर सार्वजनिक ठिकाणीं जाण्यास तर पूर्ण बंदींच होती. एवढेंच नव्हे तर गांवातील रस्त्यावरून फिरण्यास सुद्धां त्यांच्यावर कडक व अपमानकारक निर्वंध घातले गेले होते. या अपमानकारक निर्बंधांचे थोडें तरी उल्लंघन झालें तर त्यांना गुराढोरांसारखें झोडपून काढलें जात होते. अशारीतीनें वहुजन समाजाचा धार्मिक व सामाजिक कोंडमारा केला गेल्यामुळें त्यांच्या धार्मिक प्रवृत्तीला अनिष्ट वळण लागून त्यांचा अधःपात झाला होता. मिळेल त्या दगडधोंड्यांना शेंदूर फासून व दिसेल त्या झाडाझुडपांना देव मानून त्यांना प्रदक्षिणा घालणें, भुतेंखेतें, जंतरमंतर, जादूटोणा या सारख्या मंत्रतंत्रावर विश्वास ठेवणें, वगैरे अनिष्ट व घातक चाली, धर्माच्या नांवाखर त्यांच्यामध्यें रूढ झाल्या होत्या. याप्रमाणें समाजाच्या धार्मिक व सामजिक क्षेत्रांत

बजबजपुरी माजून हिंदूधर्म मृत्युपंथास लागला होता. अशा परिस्थितींत १२ व्या शतकांत (इ. स. ११३२-११६८) कर्नाटकांत श्री बसवेश्वरांचा उदय झाला.

### बसवेश्वरांचें संक्षिप्त पौराणिक चरित्र.

वीरशैव श्रीबसवेश्वरांना नंदिकेश्वराचा अवतार मानतात. एकदां भगवान् शंकर आपली अर्धांगी पार्वती व इतर गणसमुदायासह कैलासमधील आपल्या सभामंडपांत बसले असतांना भूमंडलावरील आपला संचार संपवून नारदमुनि महादेवाच्या दर्शनार्थ तेथें आले. महादेवांनीं त्यांना भूमंडलाची वार्ता विचारली. तेव्हां भूमंडलावर शिवभक्तीचा लोप होत असून जिकडेतिकडे नास्तिक मताचाच सुळसुळाट झालेला आहे, करितां तेथें शिवभक्ति वाढविण्याची उपाय योजना करावी अशी विनंती नारदमुनींनीं केली. तेव्हां भगवान् शंकरांनीं आपले गणप्रमुख नंदिकेश्वर यांना भूलोकावर अवतार धारण करून शिवभक्ति प्रस्थापित करावी अशी आज्ञा केली. तसेंच आपल्या इतर गणसमुदायालाही भूलोकावर अवतरून नंदिकेश्वरांना त्यांच्या धर्मप्रचारकार्यांत सहाय्य करावें असें फर्मावलें. त्याप्रमाणें नंदिकेश्वरांनीं 'बसव' नांवानें अवतार धारण करून सर्वत्र शिवभक्तीचा सुकाळ केला, व अनेक अलौकिक दैवी चमत्कार घडवून आणून लोकांना शिवभक्तीचा महिमा पटवून दिला, व सर्वत्र शिवभक्ती प्रस्थापित केली, असें बसव पुराणांत श्री बसवेश्वरांच्या अवतार कार्यांचें काव्यमय, भक्तियुक्त व रसभरीत वर्णन केले आहे. त्याचप्रमाणे बसवचरित्रावर रचल्या गेलेल्या "बसवराज देवर रगळे" 'सिंगिराज बसव पुराण' "शिवतत्त्व चिंतामणि" वगैरे प्राचीन धर्मग्रंथांतही त्यांच्या अवतार कार्यासंबंधीं थोडयाबहुत फरकानें असेंच वर्णन केलें गेलें आहे. हें सर्व चरित्रात्मक वाङ्मय काव्यात्मक व पौराणिक असलें तरी त्यांत ठिकठिकाणीं ऐतिहासिक घटना आढळून येतात. त्यांच्यावर व खुद्द श्री बसवेश्वरांच्या व त्यांच्या समकालीन शिवशरणांच्या वचनांवर व शिलालेख वगैरे इतरकांहीं ऐतिहासिक पुराव्यावर आधारलेलें श्री बसवेश्वरांचें ऐतिहासिक चरित्र खालीं दिलें आहे.

### श्री बसवेश्वरांचा जन्म व बालपण.

विजापूर जिल्ह्यांतील बागेवाडी नामक गांवांत राहात असलेल्या एका धर्मपरायण व सच्छिल आराध्य ब्राह्मणाच्या कुलांत इ. स. ११३२ सालीं श्री बसवेश्वरांचा जन्म झाला. हे आराध्य ब्राह्मण शैवपंथीय असून लिंग व यज्ञोपवीत दोन्ही धारण करतात. श्री बसवेश्वरांच्या मातापित्यांचें नांव मादिराज व

मादांविका. मादिराज त्या गांवाचे ग्रामाधिकारी होते. ह्या जोडप्याला दीर्घकाळ पर्यंत मूलबाळ झालें नाही. यामुळें मादांविका संतान प्राप्तीकरतां व्रतस्थ होऊन त्या गांवांतील मुख्य दैवत नंदिकेश्वराची भक्तिभावानें नित्य पूजाअर्चा करीत होती. सुदैवानें कांहीं काळानंतर तिला पुत्ररत्न प्राप्त झालें. नंदिकेश्वराच्या कृपेनें आपणाला पुत्रलाभ झाल्याकारणानें मातापित्यांनीं त्याला बसव असे नांव ठेवलें. बागेवाडीपासून कांहीं अंतरावर असलेल्या कृष्णा व मलापहारी (मलप्रभा) या नद्यांच्या संगमावरील कूडल संगम नांवाच्या पवित्र क्षेत्रांत आश्रम स्थापून धर्माचरणांत आयुष्य कंठणारे संगमदेवमुनि नांवाचे तपस्वी व धर्मगुरु या कुटुंबाचे कुलगुरु होते. त्यांना 'जातवेदी मुनि' व 'ईशान्य गुरु अशींही नांवें होतीं. बसव जन्माच्यावेळीं ते बागेवाडीस आले होते. मातापित्याच्या अनुज्ञेनें त्यांनीं बसवास लिंगदीक्षा देऊन त्याला लिंग धारणा केली. बालकाचे शुभलक्षणयुक्त व तेजस्वी रूप पाहून ते आश्चर्यचकित झाले. त्याचवेळीं त्यांनीं त्याचें जातक वर्तवून त्याच्या उज्वल भविष्याची ग्वाही दिलीं. बसवेश्वराची धार्मिक प्रवृति व अचाट बुद्धिमत्ता त्यांच्या बालपणींच दिसून येऊं लागली. परंतु दुर्दैवानें त्यांच्या लहानपणीच त्यांचे मातापिता शिवैक्य झाले. त्यामुळे तो व त्याची वडील वहीण 'अक्क नागम्मा' पोरकीं झालीं. जातवेदिमुनीनीं बसवेश्वरांचें उज्वल भविष्य लक्षात घेऊन त्यांनीं त्या दोघांना आपल्या आश्रमांत आश्रय दिला व त्यांचें पालन पोषण केलें. साहजिकच त्यांचें अध्ययनही त्यांच्या देखरेखीखालींच झालें. अक्क नागम्मा वयांत आल्यावर त्यांनीं तिचा विवाह शिवदेव नांवाच्या आपल्या शिष्याशीं केला. थोड्याच दिवसांत त्यांच्या पोटीं चन्नवसवेश्वरांचा जन्म झाला. चन्नबसवेश्वर बसवेश्वरापेक्षांही बुद्धिमान होता. त्याचें अध्ययनही तेथेंच झालें व थोड्याच काळांत त्यानें सर्व धर्मशास्त्रांत पारंगतता मिळवली.

**बसवेश्वरांचा आश्रमवास.**

श्री बसवेश्वरांनीं सुमारें १५।१६ वर्षे जातवेदी मुनींच्या आश्रमांतील आध्यात्मिक व सात्विक वातावरणांत काढलीं. या काळांत त्यांनीं वेदागमोपनिषदें षड्दर्शनशास्त्र, इतिहास पुराणें वगैरे हिंदुधर्म शास्त्रांचा व तसेंच बौद्ध व जैन धर्मग्रंथांचाही गाढ अभ्यास करून त्यामध्यें प्राविण्य संपादन केलें. त्याचप्रमाणें संस्कृत, कन्नड, तामीळ, पाली वगैरे भाषांतील प्रमुख ग्रंथांचें पारायण करून त्या भाषांवरही त्यांनीं प्रभुत्व मिळविलें. दररोज नित्यनेमानें कृष्णा व मलप्रभा नद्यांच्या संगमावर त्रिकाळ स्नान करून तेथील आपलें आराध्य दैवत संगमेश्वराची भक्तिभावानें पूजाअर्चा व आराधना करणें व बाकीच्या वेळीं अध्यात्म साधना व

शास्त्राध्ययन करणें हा त्यांचा नित्याचा कार्यक्रम होता. बालपणापासूनच त्यांच्या मनाची प्रवृत्ति आध्यात्मिक मार्गाकडे होती. अशांत कूडलसंगमासारख्या तपोवनांतील अध्यात्म साधनेला अनुकूल अशी परिस्थिती लाभल्यामुळें तेथील आध्यात्मिक जीवनांत ते रममाण होऊन गेले. श्रीसंगमेश्वराची आराधना करतांना कधीं कधीं भक्तिवशतेनें ते देहभान ही विसरून जात व तासन् तास ध्यानस्थ होऊन बसत. कूडल संगम, संगमेश्वराचे प्रसिद्ध धर्मक्षेत्र असल्याकारणानें अनेक विद्वान व पंडित तेथें येऊन जातवेदमुनीशीं धर्मचर्चा करीत असत. श्रीबसवेश्वरही त्या चर्चेत भाग घेत असत व आपल्या पांडित्यानें व अध्यात्म ज्ञानानें त्यांना चकित करून सोडीत. त्यामुळें त्यांची कीर्ति चोहोकडे पसरली. तसेंच समाजाच्या सर्व जातींचे व वर्गांचे लोक त्या धर्मक्षेत्राला येत. त्यांच्याशी मिळून मिसळून वागून व खेडोपाडीं संचार करून त्यांनीं त्यावेळच्या निरनिराळ्या धर्म पंथांच्या प्रत्यक्ष आचरणाचें व समाज व्यवस्थेचें सूक्ष्म निरीक्षण केलें. तथाकथित वरिष्ठ वर्गाचें स्वार्थी व दांभिक धर्माचरण, समाजांतील विषमता, जातीजातीतील वैमनस्य, कनिष्ठ वर्गातील अज्ञान व भोळसरपणा, अस्पृश्यांची करुणामय व हलाखीची परिस्थिती, व या सर्वांची वरिष्ठ वर्गाकडून होत असलेली छळणूक व पिळवणूक वगैरे अनिष्ट व समाजघातक चालीरूढी पाहून त्यांना त्यावेळच्या समाजाच्या अधोगतीची पूर्ण कल्पना आली त्यामुळें त्याकाळीं अस्तित्वात असलेल्या एकाद्या धर्माचा प्रचार करून नुसती अनुयायांची संख्या वाढविल्यानें अथवा समाजांतील एखादा दुसरा दोष काढून टाकल्यानें ह्या अधोगतीला आळा बसणार नाहीं, तर सर्व धर्मांना समान असलेल्या समतेच्या व विश्वबंधुत्वाच्या उदात्त तत्त्वांवर धर्माची पुनर्घटना करून त्या धर्माच्या पायावर नवीन समाजरचना केल्यानेंच धर्माचे व समाजाचें पुनरुत्थान होईल, याची त्यांना बालंबाल खात्री झाली व त्याप्रमाणें आपलें पुढील सर्व आयुष्य या कार्यालाच वाहून घेण्याचें त्यांनीं ठरविलें.

### कल्याणला प्रयाण व विवाह.

यांप्रमाणें त्यांच्या आध्यात्मिक व व्यवहारीक ज्ञानांत भर पडून व त्यांच्या आचारा विचारांत क्रांतिकारक बदल होऊन त्यांच्या भावी कार्यक्रमाची रूपरेषा आंखली जात असतांना त्यांच्या विद्वत्तेची कीर्ति ऐकून त्यांचा मामा व बिज्जल राजाचा मंत्री बलदेव कूडलसंगमला आला व जातवेद मुनींना भेटून बसवेश्वरांनीं कल्याणास येऊन आपल्या कन्येशीं विवाह करावा व त्यांनीं तेथेंच आपल्याकडे राहावें अशी इच्छा प्रगट केली. कूडलसंगममधील आध्यात्मिक वातावरण, आराध्य दैवत संगमेश्वराची सेवा व जातवेदी मुनीसारख्या गुरूंचे कृपा छत्र,

अशा या अलभ्य लाभांना अंतरण्याची बसवेश्वराची मुळींच इच्छा नव्हती, म्हणून त्यांनीं बलदेवाच्या विनंतीस प्रथम नकार दिला. परंतु आपल्या ध्येयसाधनाच्या दृष्टीनें त्यांनीं कल्याणला जाणेंच योग्य होईल, असा जातवेदी-मुनींनीं उपदेश केल्यानंतर त्यांनीं त्याला संमती दिली. त्याप्रमाणें अक्क नागम्मा व चन्नबसवेश्वर यांच्या सहित ते कल्याणला गेले. तेथें त्यांचा विवाह समारंभ मोठ्या थाटानें साजरा केला गेला. '**कायकवे कैलास**' म्हणजे नीतीमार्गानें वागून '**स्वताच्या निढळाच्या घामाच्या प्राप्तीवर जीवन जगणें हाच धर्म अथवा मोक्षमार्ग**' हें बसवेश्वराचें मुख्य ब्रीद असल्याकारणानें सासऱ्यावर अवलंबून राहून परावलंबी जीवन जगणें त्यांना मुळींच पसत नव्हतें. म्हणून त्यांनीं बिज्जल राजाच्या दरबारांत कर्णिकची नोकरी धरली व स्वतंत्र बिऱ्हाड केले. थोड्याच दिवसांत बिज्जल राजालाही त्यांची महती कळून आली. त्यामुळें बलदेव मंत्रीच्या देहावसानानंतर त्यानें त्याच्या जागीं त्यांची '**कोशागार मंत्री**' म्हणून नेमणूक केली.

**वीरशैव धर्मांची पुनर्घटना.**

याप्रमाणें त्यांचा खासगी प्रपंच नीटनेटका चालून राजदरबारी त्यांचा मानमरातब वाढत असला तरी त्याकडे त्यांचें लक्ष नव्हतें. त्यांना आपल्या. नवसमाजरचनेच्या ध्येयाचा निदिध्यास लागला होता. कल्याणला स्थायिक झाल्याबरोबर त्यांनीं चन्नबसवेश्वराच्या सहाय्यानें आपल्या नवमानवतावादी धर्माची मुहूर्तमेढ रोवली. उच्चनीचतेच्या व विषमतेच्या पायावर उभारलेल्या चातुर्वर्ण्याचें खंडन करून व धर्माचरणांतील वेडगळ अनिष्ट धर्मरूढींना व कर्मकांडाला तिलांजली देऊन, समता, विश्वबंधुत्त्व, अहिंसा, सत्य, दया या सारख्या उदात्त तत्त्वांवर वीरशैव धर्माची पुनर्घटना केली व अध्यात्म साधनाकरतां त्याला सहजसुलभ भक्तिमार्गाची जोड दिली. सर्वांच्या अंतर्यामीं एकच परमात्मा वसत असल्याकारणानें त्यांच्यामध्यें उच्च–नीच, वरिष्ठ–कनिष्ठ स्पृश्य –अस्पृश्य, स्त्री–पुरूष असा भेदभाव करणें पाप आहे असा त्यांचा उपदेश होता. कनिष्ठ वर्गाच्या लोकांना व स्त्रियांना शास्त्राध्ययनाचा व धार्मिक विधी आचरण्याचा अधिकार नाहीं अशा दांभिक व मूर्खपणाच्या गैरसमजूती दूर करून, त्यांनीं आपल्या नवधर्माचें द्वार सर्वांना मोकळें ठेवलें व त्यांना मोक्षाचा मार्ग दाखवून दिला. समतेचें तत्व नुसत्या धार्मिक क्षेत्रापुरतें मर्यादित न ठेवतां जीवनाच्या सर्व क्षेत्रांमध्यें त्याचें निष्ठेनें व श्रद्धेनें परिपालन केलें पाहिजे असा त्यांचा दंडक होता. त्यामुळें या नवधर्माच्या अनुयायांमधील जातिभेद, अस्पृश्यता वगैरे अनिष्ट व समाज विघातक रूढींना मूठमाती मिळून, त्यांच्यामध्यें सरास

रोटीबेटीव्यवहार सुरू झाला. यामुळें सर्व समाजांत विचारक्रांति होऊन ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंत आणि रावापासून रंकापर्यंत सर्व जातीचे व दर्जाचे लोक या नवधर्माच्या झेंड्याखालीं गोळा होऊं लागले व त्यांच्यामधून अनेक 'शिवशरण' (संत) निर्माण झाले.

**शिवानुभव मंटपाची स्थापना.**

श्री बसवेश्वर नुसते अध्यात्मवादी धर्म प्रचारक नसून व्यवहार कुशल व असामान्य संघटक व समाजक्रांतिकारक वीर होते. 'बोले तैसा चाले' हें तर त्यांचें ब्रीद होतें. त्यामुळें नुसत्या धर्मजागृतीवर संतुष्ट न होतां त्या जागृतीला त्यांनीं मूर्त स्वरूप देण्याचें ठरवून धर्म, शास्त्र, नीति, सामाजिक सुधारणा समाजाची आर्थिक संघटना व इतर आनुषंगिक विषयांवर चर्चा करणारी व नव धर्माचा कार्यक्रम अमलांत आणणारी **"शिवानुभव मंटप"** नांवाची एक धर्मसंस्था स्थापन केली. ह्या शिवानुभव मंटपाचें धर्मपीठ (अध्यक्षस्थान) **"शून्य सिंहासन"** या नांवानें संबोधलें जात होतें. हें शून्य सिंहासन प्रसिद्ध वीरशैव संत, ज्ञानवैराग्य मूर्ति **"श्री प्रभुदेव"** ह्यांनीं मंडित केलें होतें. कल्याण शहरांतील आपल्या वास्तव्यांत त्यांनीं या शिवानुभव मंटपाचें नेतृत्व स्वीकारून श्री बसवेश्वरांना व इतर शिवशरणांना आध्यत्मिक बाबतींत मार्गदर्शन केलें. शिवानुभव मंटपाची स्थापना हा एक अभिनव उपक्रम असून सर्व शिवशरणांनी एकत्र येऊन धर्मचर्चा करण्याला व धर्म व समाज यांच्या पुनर्घटनेला त्यामुळें फारच मदत झाली. ह्या संस्थेत अधिकार, संपत्ति, सामाजिक दर्जा अथवा कोरडी विद्वत्ता ह्यांना महत्व नसून ज्यांनीं निष्काम बुद्धीनें व निरहंकारानें समाजाची, विशेषतः पददलितांची सेवा केली आहे व जे आपल्या आत्मानुभवानें व पवित्र धवल चारित्र्यानें समाजास ललामभूत झाले आहेत, अशानांच ह्या शिवानुभव मंटपांत प्रवेश मिळे. तेथें राजा–प्रजा, राव–रंक, श्रीमंत–गरीब, उच्च–नीच, स्पृश्य–अस्पृश्य, स्त्री–पुरुष वगैरे भेदभाव नसून सर्व शिवशरण समभावानें व परस्पर प्रेमानें वागत असत. ह्या संस्थेंत श्री प्रभुदेव, श्री बसवेश्वर, श्री चन्नबसवेश्वर, या सारख्या महाज्ञानी व आत्मानुभवी तत्त्ववेत्त्यांबरोबर मांडीस मांडी लावून धर्मचर्चा करणाऱ्या शिवशरणांत ढोर कक्कय्या, जातींने ढोर, मधुवय्या–ब्राह्मण, हरळय्या-चांभार, अंबिगर चौडय्या–नावाडी, मेदार धुळय्या–बुरूड, वक्कल मुद्दय्या–शेतकरी, बाची कायकद बसवाप्पा–सुतार, हडपद आप्पण्णा-न्हावी, किन्नरी ब्रह्मय्या-सोनार, ढक्कद बोमण्णा–रणशिंग वाजवणारा, तुरुगाही रामण्णा-गराखी, तळवार कामिदेव–सनदी, मनुमुनि–जैनगुरू, नूलीय चंदय्य–दोरखंड वळणारा,

हेंडद मारय्या–दारूगुत्तेदार, किरात संगय्या–पारधी, असे हीन समजल्या जाणाऱ्या जातीचे व धंद्याचे लोक होते. तसेंच त्यांच्यामध्यें महादेवीअक्का, अक्क नागम्मा, मुक्तायक्का, नंबियक्का, नीलंवा, गंगांबिका, सुगलव्वा, राणी महादेवी, राणी बोंतादेवी वगैरे स्त्रियाही होत्या. ह्यांच्यापैकी कांहीं शिवशरण व शिवशरणाक्कांनीं (संत व संतिणी) धर्म, नीति, आचार, विचार वगैरे विषयांवर 'वचनें' रचिली आहेत.

थोडयाच काळांत कल्याणांत प्रारंभ झालेल्या नवधर्माची व ह्या अनुभव मंटपाची कीर्ति सर्व भारतभर पसरली. त्यामुळें निरनिराळया प्रांतातून अनेक आत्मानुभवी संत कल्याणला येऊन अनुभव मंटपाच्या धर्मचर्चेत व नवधर्माच्या प्रचारांत भाग घेऊं लागले. त्यामध्यें बनवासीहून आलेले श्री प्रभुदेव, उडुतडीहून आलेल्या संत महादेवीअक्का, सोलापूराहून आलेले शिवयोगी सिद्धराम, काश्मीरहून आलेले राजे महादेव भूपाल (मोळगी मारय्या) राणी महादेवी, राणी बोंतादेवी, दक्षिण राज्यांतून आलेले सकलेश मादरस वगैरे प्रमुख होते.

नामांकित तत्त्वज्ञानी व आत्मानुभवी संत दि. गुरूवर्य रानडे यांनीं या शिवानुभव मंटपाचें फारच मार्मिक व उद्बोधक वर्णन केले आहे. तें खाली दिले आहे.

The institution of the **'Anubhava Mantap'** or the Assembly Hall of spiritual experience at Kalyan in the district of Gulbarga when king Bijjal was ruling in the 12th century, was a sanctuary, in which gathered aspirants and devotees for filling the heavens with the praise and glory of God's name. At the portals of this spiritual Assembly, every earnest seeker after Divinity brought, in all humility, his own spiritual experience and occupied the place in the Assembly to which his spiritual–experience entitled him. **One of the chief aims of that institution was to democratise religion and free it from the fetters of ritualism and visionary theoreticism. It wiped out all distinctions of caste, creed aud sex and held aloft the dictum that one's own appointed works done in the spirit of dedication ( Kayakave Kailas ) leads to Heaven.** Mutual love and pursuit after a common spiritual goal constituted the binding force among the members. Every member of this

spiritual brotherhood considered himself (out of humility) as being inferior to his brother. Even Basaveshvar, one of the brightest luminaries of the spiritual firmament of Veershai a saints, regaded himself as a 'servant of the servant' of the devotees of Shiva. It was at this assembly that highly philosophical discussions on the theoretical and practical aspects of Reality took place, and in this sense the **'Anubhava Mantap' resembled the court of king Janak of the Upanishadic times.'**

— **Dr. R. D. Ranade**

(Pathway to God in Kannad literature pp. 309, 310)

ह्याच्यावरून या शिवानुभव मंटपाचें महत्व कळून येईल. तसेंच ज्या ज्या विद्वानांनीं या शिवानुभव मंटपाची माहिती करून घेतली आहे त्या सर्वांनीं या अभिनव धर्मसंस्थे बद्दल कौतुकास्पद व प्रशंसनीय उद्गार काढले आहेत.

**नववीरशैव धर्माचा भक्तिमार्ग.**

श्रीबसवेश्वरांनीं आपल्या पुनर्घटित नव्या वीरशैव धर्माला बहुजन समाजाच्या हिताकरतां भक्ति मार्गाची जोड दिली हें वर सांगितलेच आहे. मोक्षसाधनाच्या सर्व मार्गांत भक्तिमार्गच सर्वांना विशेषत: गरीब व अज्ञजनांना पतितपामरांना, बायाबापड्यांना सुद्धां, सहजसुलभ असा मार्ग आहे व त्यामुळें आज सर्वत्र आध्यात्मिक क्षेत्रांत भक्तिमार्गाचेच अवलंबन केलें जातें. या भक्तिमार्गाचा इतिहास येथें उल्लेखनीय आहे. श्वेताश्वेतर उपनिषदेंत व भगवद्गीतेंत प्रथम भक्तीचा उल्लेख आला असला तरी सामान्य जनतेंत प्रथम संघटीत रीतीनें भक्तिमार्गाचा प्रचार करण्याचें श्रेय तामीळनाड मधील शैवसंतांना दिले पाहिजे. ख्रिस्तशकाच्या आरंभापासून दहाव्या शतकापर्यंत त्या प्रांतात होऊन गेलेल्या अनेक शिवभक्तांनीं या भक्तिमार्गाला मूर्त स्वरूप देऊन त्याचा बहुजन समाजांत त्यांच्या मातृभाषेतूनच प्रचार केला. त्यामुळें त्या प्रांतात सर्व जातींच्या व धंद्यांच्या लोकांतून अनेक शैवसंत निर्माण झाले. त्यांच्यामध्यें "त्रिसष्टपुरातन" नांवानें प्रसिद्ध असलेलें त्रेसष्ट (६३) शैवसंत उल्लेखनीय आहेत. त्यांच्या मधील श्रेष्ट संत 'तिरूज्ञान सबंदर' 'अप्पर' 'सुंदरर' व 'माणिक्यवाचकर' हे चार संत

चार 'समयाचार्य' म्हणून प्रसिद्ध आहेत. त्या सर्वांनीं शिवाची भक्तिभावानें आराधना करण्याकरतां असंख्य कवनें रचिलीं आहेत. त्यांच्या सर्व कवनांचें संकलन ग्रंथांमध्यें केलें गेलें असून त्या ग्रंथ समूहाला **'तिरूमुराई'** असें नांव आहे. त्यांच्यामध्यें **'देवारम्'** व **'तिरुवाचकम्'** हे ग्रंथ प्रमुख आहेत. हें वाङ्मय अत्यंत महत्वाचे असून ते **'तामिळवेद'** म्हणून प्रसिद्ध आहे. तें भक्तिरसानें ओतप्रोत भरलेलें असून भक्तिमार्गीय साहित्यांत त्याला अत्युच्च स्थान आहे. ज्या ज्या विद्वानांनीं ह्या साहित्याचा अभ्यास केला आहे त्या सर्वांनीं त्याच्याबद्दल अत्यंत प्रशंसनीय उद्गार काढले आहेत. तसेंच त्या शैवसंतांचा चरित्रग्रंथ **'पेरिया पुराणम्'** हाही तमीळ साहित्यांतील एक अमूल्य प्राचीन धर्मग्रंथ म्हणून मानला जातो. या शैवसंतांनीं आचरलेल्या व प्रतिपादलेल्या शास्त्राला **'शैवसिद्धान्त'** असें नांव आहे. त्यांत भक्तीलाच मुख्य स्थान दिलें गेलें आहे.

बाराव्या शतकांत कर्नाटकांत उदयास आलेल्या बसवादि शिवशरणांवर या तामीळनाड मधील पुरातन शैव संतांच्या भक्तिमार्गाचा विशेष परिणाम झालेला दिसतो. शिवशरणांनीं रचलेल्या आपल्या वचनांत अनेक ठिकाणीं या त्रेसष्ट पुरातनांचा भक्तिभावानें व आदरयुक्त रीतीनें उल्लेख केला आहे. आजही वीरशैव लोक आपल्या धर्माच्या शिवशरणांबरोबर या पुरातनांचीही पूजा अर्चा करतात. बसवपूर्वकालीन वीरशैव धर्मात भक्तीला स्थान असले तरी त्याला त्याकाळीं तितकें महत्व दिलें जात नव्हते. परंतु बसवेश्वरादि शिवशरणांनीं तामीळ शैवसंतांप्रमाणें आपल्या नव वीरशैव धर्मांत भक्तिमार्गाला मुख्य स्थान दिले. भक्तिमार्गाचें अवलंबन करून, समर्पण बुद्धीनें शिवाला शरण जाऊन, आपलें आध्यात्मिक जीवन जगणें, हेंच त्या सर्वांचें ध्येय असल्यामूळें त्यांना **शिवशरण'** हें नांव प्रचारांत आलें आहे. तसेंच त्या सर्वांमध्यें श्रीबसवेश्वर भक्तिमार्गाचे अध्वर्यु म्हणून मानले जातात. त्यामुळें त्यांना **भक्तीभांडारी बसवेश्वर** हें नांव प्राप्त झालें आहे. त्यांच्या अत्युत्कट भक्तीभावामुळेंच दि. गुरूवर्य रानडे यांनीं त्यांची, महाराष्ट्र संत श्रीतुकाराम महाराज, यांच्याशीं तुलना केली आहे. ह्या सर्व शिवशरणांनीं आपल्या प्रत्यक्ष आचरणांत भक्तिमार्गाचें अवलंबन करून सर्व कर्नाटकभर भक्तिमार्गाचा दांडोरा पिटविला. त्यामुळें कर्नाटकांत अपूर्व धर्म जागृति झाली व सर्वांना मोक्षप्राप्तीचा सुलभ मार्ग प्राप्त झाला. त्यांचेच दृश्यफल त्यांच्या नंतरच्या काळांत घडून आलेल्या वीरशैव धर्मांच्या भरभराटींत दिसून येतें.

**श्री बसवेश्वर व स्त्रियोन्नति**

श्री बसवेश्वरांनीं आपल्या नवधर्मात समतेच्या तत्वाचा पुरस्कार करून

स्त्री–पुरूष या भेदभावालाही फाटा दिला, व सर्व स्त्री वर्गांत अभूतपूर्व जागृति निर्माण केली. स्त्रियांना शास्त्राभ्यास करण्याचा, धार्मिक कार्यांत भाग घेण्याचा अथवा मोक्षाचा अधिकार नाहीं, असल्या पुराणमतवादी लोकांच्या वेडगळ आचारा-विचारांचे खंडन करुन त्यांना धर्माचरणाचा व मोक्षप्राप्तीचा मार्ग मोकळा करून दिला. धर्मांचरणांत व अध्यात्मसाधनेंत पतिपत्नी दोघांनींही भाग घ्यावा व त्या दोघांनीं मिळून केलेली भक्ति व आराधना शिवाला जास्ती प्रिय आहे असा बसवेश्वरांचा उपदेश होता. त्याप्रमाणें त्यांचें स्वतःचें वर्तन होतें. त्यांच्या दोघीही पत्नी नीलांबिका व गंगाबिका त्यांच्याबरोबर धार्मिक व इतर सर्व कार्यांत भाग घेत होत्या. त्यामुळें त्यांची शिवशरणाक्कांच्या मालिकेंत गणना होत होती. इतर शिवशरणांनींसुद्धां श्रीबसवेश्वरांचेंच अनुकरण केले. त्यामुळें पतीच्या धर्माचरणाबद्दल अथवा त्याच्या अध्यात्मसाधनेबद्दल कुरकुर करणाऱ्या पत्नीचें एकही उदाहरण या शिवशरणांच्या मेळाव्यांत आढळून येत नाहीं. याप्रमाणें पुरूषा बरोबर स्त्रियासुद्धां शिवलिंगपूजा, दासोह, धर्मचर्चा, धर्मप्रचार, वगैरे धार्मिक कार्यांत भाग घेऊं लागल्यामुळें त्यांच्यामध्यें अभूतपूर्व धर्म जागृति झाली व आध्यात्मिक चर्चेत व सामाजिक कार्यात पुरुषा बरोबर त्या हिरीरीनें भाग घेऊं लागल्या. बसवेश्वर काळीं व त्यानंतर सुमारें दोन तीनशें शिवशरण उदयास आले. त्यांच्यामध्यें सुमारें चाळीस पन्नास स्त्रिया होत्या. त्यापैकी कांहींनीं पुरूष शिवशरणाप्रमाणें वचनेंही रचिली आहेत. कांहीं बाबतीत पतिपत्नी दोघेही शिवशरण असून कांहीं वेळां पत्नीनीं नम्रपणानें आपल्या पतीच्या धर्माचरणांतील कमतरता दाखवून देऊन त्यांना आध्यात्मिक साधनेंत योग्य मार्गदर्शन केल्याचीं उदाहरणें आढळून येतात. काश्मीर मधील पांडवपूरचे राजे महादेव भूपाल (मोळगी मारय्या) हे राज्यत्याग करून आपली पत्नी राणी महादेवीसह कल्याणास येऊन तेथें मोळीविक्याचा धंदा पत्करून पत्नीसह अध्यात्म साधना करीत होते. त्यावेळीं आपण केलेल्या स्वार्थ त्यागाचा अहंकार आपल्या पतीच्या मनांत वसत असलेला पाहून, महादेवीनें ' राज्य त्याग करून व मोळीविक्याचा धंदा पत्करुन आपण मोठा स्वार्थत्याग केला असा अहंकार तुमच्या मनांत बाळगूं नका, हा अहंकारच तुमच्या अध्यात्म साधनेचा सत्यानाश करील, करितां प्रथम हा अहंकारच तुमच्या मनांतून काढून टाका ' असा आपल्या पतीला उपदेश करुन आध्यात्मिक मार्गांत त्यांना मार्गदर्शन केलें. त्याचप्रमाणें शिवशरण आयदक्की मारय्यानें एके दिवशीं 'कायक' करुन नित्यनियमापेक्षा जास्ती तांदूळ घरी आणलें असतांना त्याची पत्नी लक्कम्मानें 'अर्थसंचयाची आशा राजाला असते. तुमच्या सारख्या शिवशरणांना ती अध्यात्म साधनेंत मारक होईल. असा

उपदेश करुन जास्तीचे तांदूळ परत करावयास लावून त्याला धर्मांचरणयुक्त 'कायकवृत्ति' कशी आचरावी याचा पाठ शिकविला.

तसेंच परमज्ञानी व वैराग्यमूर्ति श्रीप्रभुदेव, मुक्तायक्काला तिच्या दुःखाच्या-वेळीं, तिच्या सान्त्वनार्थ अद्वैताचा उपदेश करीत असतांना तिनें त्यांना आपल्या मृत भावाच्या मौनी व्रताची आठवण करून देऊन "अद्वैत आचरण्याची गोष्ट आहे; बोलण्याची नव्हे. अद्वैती मौनी असतो, बोलूं शकत नाहीं. तेव्हां मला उपदेश करणारे तुम्ही कसले अद्वैती ? आणि तुम्ही मला काय अद्वैताचा उपदेश करणार ?" असा रोखठोक जबाव दिला. प्रख्यात शिवशरणाक्का महादेवी अक्कांचें आध्यात्मिक ज्ञान तर प्रसिद्धच आहे. आध्यात्मिक ज्ञानांतील त्यांचें श्रेष्ठत्व पाहून प्रभुदेव, बसवेश्वरासारखे आत्मसाक्षात्कारी संतसुद्धां माना डोलावीत. 'प्रभुदेव, बसवेश्वर वगैरे सर्व शिवशरणांच्या वचनांपेक्षां महादेवी अक्कांचीच वचनें अत्यंत उत्कृष्ट, उद्बोधक व भावपूर्ण आहेत,' असें चन्नबसवेश्वरांनी आपल्या एका वचनांत त्यांच्या ज्ञानाबद्दल प्रशंसोद्गार काढले आहेत. अक्कांचें सारें जीवनचरित्र अध्यात्म ज्ञानानें ओतप्रोत भरलेलें असून आजमितीस ते महिला-वर्गाला आदर्श जीवन होऊन राहिले आहे. वीरशैव स्त्रियांच्या संघटनेला 'अक्कन बळगु' म्हणून महादेवी अक्कांचेच नांव दिले गेले आहे. शिवशरणा-क्कांच्या आत्मज्ञानाची व त्यांच्या अध्यात्म साधनेची हीं उदाहरणें पाहिलीं म्हणजे त्यावेळीं स्त्रीवर्गांत झालेल्या अभूतपूर्व धर्मजागृतीचें व त्यांच्या आध्यात्मिक ज्ञानाचें नवल वाटतें.

**श्रीबसवेश्वरांचे सामाजिक सुधारणेचे कार्य.**

समता, विश्वबंधुत्व, उद्योगशीलता या सारख्या उदात्त तत्त्वांवर वीरशैव धर्माची पुनर्घटना करून ह्याच तत्त्वांवर नवसमाज निर्माण करण्याचा कार्यक्रम बसवादि शिवशरणांनीं अंमलांत आणण्यास प्रारंभ केला, ही हकीगत वर सांगितलीच आहे. असा समाज निर्माण करावयाचें असल्यास ह्या तत्त्वांचें आचरण नुसत्या आध्यात्मिक क्षेत्रापुरतें मर्यादित न करतां समाजजीवनाच्या सामाजिक, आर्थिक, सांस्कृतिक वगैरे सर्व क्षेत्रांत तीं तत्त्वें आचरलीं गेलीं पाहिजेत, असें त्यांचें ठाम मत होतें. परंतु समाजांतील जातिभेद, अस्पृश्यता, उच्चनीचता वगैरे समाज घातक रूढींना गाडून टाकून समतेच्या तत्त्वांवर समाजाची रचना करणें हें कांहीं येरागबाळयांचें काम नाहीं. सांप्रतच्या प्रगतीशील, पुरोगामी व संपूर्ण स्वातंत्र्या-

च्या शतकांत सुद्धां जें ध्येय साध्य होत नाहीं, तें ध्येय बाराव्या शतकासारख्या प्रतिगामी व कर्मठ आचारविचारांच्या काळांत अंमलांत आणणें किती कठिण कार्य होतें याची कल्पनाच केलेली बरी. बसवेश्वरांना याची कल्पना नव्हती असें नाहीं. परंतु ते वास्तववादी असूनही ध्येयवादी होते. परमेश्वराच्या कृपादृष्टीवर त्यांचा पूर्ण विश्वास होता. तसेंच ते धैर्याचे मेरू असून ध्येयपूर्तीकरतां प्राणार्पण करण्याचीही त्यांचो तयारी होती. म्हणून त्यांनीं न भितां, न कचरतां किंवा आपल्या तत्त्वांना मुरड न घालतां, असा आदर्श समाज स्थापण्याकरतां आवश्यक असे धार्मिक, सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक सुधारणेचे कार्यक्रम आंखून ते अमलांत आणले. या प्रमाणें त्यांनीं अल्पावधींत म्हणजे सुमारे १०।१५ वर्षांच्या काळांत घडवून आणलेली ही धार्मिक, नैतिक, सामाजिक व आर्थिक क्रांति पाहिली तर, या क्रांतीला जगाच्या इतिहासांत तोड नाहीं असें म्हणावें लागेल.

समाजाच्या निरनिराळ्या क्षेत्रांतील त्यांची ही क्रांति, धर्म व नीति यांच्या पायावर उभारलेली असून, तें त्यांनीं आरंभिलेल्या उदारमतवादी व पुरोगामी नवधर्माचेंच एक अंग होते. विचारापेक्षा या तत्त्वांच्या आचरणावरच त्यांचा विशेष कटाक्ष होता. व त्याप्रमाणें त्यांचें स्वतःचें आचरण होतें. ह्या तत्त्वांच्या काटेकोर आचरणामुळें शतकानुशतकें समाजांत रूढ झालेल्या जातिभेद व अस्पृश्यता सारख्या अनिष्ट चाली नष्ट पावून या नवधर्मीच्या अनुयायांमध्यें सर्रास रोटीबेटीव्यवहार सुरू झाला. धर्मप्रचाराच्या कार्याला प्रारंभ झाल्यापासून दासोह-रूपानें सर्व शिवशरणांचे सहभोजन सुरुंच होते. त्याचप्रमाणें अंतर्जातीय विवाहही होत होतें. या प्रमाणें हा धर्म दिवसेंदिवस फोफावत चालला. कांहीं दिवसानंतर **त्यांनीं ब्राह्मण शिवशरण मधुवय्या यांच्या मुलीचें, अंत्यज शिवशरण हरळय्या यांच्या मुलांशीं लग्न लावून समतेचा व सामाजिक सुधारणेचा उच्चांक गांठला.** ही घटना पाहिली म्हणजे ह्या वीसाव्या शतकांतसुद्धां जी गोष्ट आश्चर्याची व धैर्याची वाटते, ती त्यांनीं बुरसटलेंल्या पुराणमतवादी कर्मठ विचाराच्या बाराव्या शतकांत घडवून आणली, यावरून त्यांच्या पुरोगामी व क्रांतिकारक समाज सुधारणेच्या कार्याचें महत्व कळून येतें. या आंतरजातींय विवाहामुळें सनातनी व कर्मठ वर्णाश्रमधर्मी लोकांचें धाबे दणाणलें. त्यांच्यामध्यें एकच हलकल्लोळ माजला. त्याचेंच पर्यवसान राज्यक्रांतीमध्यें होऊन श्रीबसवेश्वर व इतर शिवशरणांना कल्याण शहर सोडून जावें लागलें.

**समाजाची आर्थिक रचना व ' कायकवे कैलास '**

श्रीबसवेश्वरांनीं व इतर शिवशरणांनीं ज्याप्रमाणें धार्मिक व सामाजिक

क्षेत्रांत समता व विश्वबंधुत्वाच्या तत्त्वांवर क्रांति घडवून आणली त्या प्रमाणे आर्थिक क्षेत्रांत सुद्धां धर्म, नीति, उद्योगशीलता व श्रमगौरव (Dignity of Labour) ह्या तत्त्वांवर उभारलेल्या समाजाच्या आर्थिक रचनेचा कार्यक्रम त्यांनीं अंमलात आणला. संन्यास धर्म व दैववाद यांच्यामुळें समाजांत आळस, निरुद्योगीपणा, परावलंबन व 'भिक्षां देही' प्रवृत्ति बोकाळून समाजाचा अधःपात झालेला होता. म्हणून या अनिष्ट प्रवृत्तींना पायबंद घातल्या शिवाय समाजाची उन्नति होणार नाहीं, ही गोष्ट जाणून सर्व लोकांनीं, धर्मसाधना व प्रचार करणाऱ्या शिवशरणांनीं व जंगमांनीं सुद्धां आपल्या उदर–निर्वाहा करतां समाजाच्या सहाय्यावर अथवा पित्रार्जित संपत्तीवर अवलंबून न राहतां कोणता तरी समाजपोषक धंदा पत्करून स्वकष्टार्जित धनानेंच आपला प्रपंच चालवावा व कोणीही भिक्षा मागूं नये असा त्यांनीं आपल्या अनुयायांना सक्त नियम घालून दिला होता. समाज सुधारणेला सर्व समाजपोषक धंद्यांची आवश्यकता असल्या कारणानें कोणताही धंदा हीन समजूं नये, व हीन समजले जाणारे कोणतेही धंदे करणाऱ्या लोकांनासुद्धां समाजांत समान व गौरवयुक्त स्थान मिळाले पाहिजे, असा त्यांचा दंडक होता. प्रत्येकानें आपला मनपसंत धंदा पत्करून तो सचोटीनें, प्रामाणिकपणानें व शिवार्पणबुद्धीनें चालवावा व त्यांत कोणत्याही रीतीनें गैरवाजवी नफा अथवा फायदा न मिळवतां आपल्या निर्वाहापुरतें धन संपादन करावें. अशा रीतीनें आपला धंदा चालविणें हाच खरा धर्म आहे असा त्यांचा उपदेश होता. हा कार्यक्रम अंमलांत आणण्याकरतां त्यांनीं घोषित केलेला **'कायकवे कैलास'** हा महामंत्र प्रसिद्धच आहे. कांहींजण या सूत्राचा अर्थ 'उद्योग करणें हाच स्वर्ग' अथवा उद्योग करण्यानेंच मोक्षप्राप्ति होते असा करतात. परंतु हे दोन्ही अर्थ समर्पक नाहींत. नुसता कोणता तरी व कसातरी धंदा करण्यानें कोणाला कधीं कैलास वा मोक्ष मिळत नाहीं. "कायक" हा शब्द शिवशरणांनीं एका विशिष्ट अर्थानें वापरला असून त्याच्यांत वर नमूद केलेल्या सर्व तत्त्वांचा समावेश होतो. अशा तऱ्हेनें 'कायक' (धंदा) करुन शुद्ध सात्विक जीवन जगणें हाच कैलास अथवा स्वर्ग आहे. या रीतीनें जीवन व्यतीत करण्यानेंच शेवटीं मोक्षप्राप्ति होईल असा "कायकवे कैलास" ह्या सूत्राचा अर्थ आहे. हिंदु शास्त्रांतील 'धर्म अर्थ काम व मोक्ष' या चार ही पुरूषार्थांचा या सूत्रांत सुंदर समन्वय केला गेला आहे. नुसत्या बाराव्या शतकांतील समाजाला नव्हें तर आजच्या घटकेलासुद्धां आपल्या राष्ट्राला व समाजाला ह्या महामंत्राच्या अंमल बजावणीची किती आवश्यकता आहे, हें निराळें सांगण्याची जरूरी नाहीं. **'कायकवे कैलास' हा सूत्रमय महामंत्र बसवेश्वरांनीं भारतीय संस्कृतीला दिलेली एक अमूल्य देणगी आहे, यांत संशय नाहीं.**❖

त्याचप्रमाणें याच तत्त्वाला अनुसरून त्यांनीं संसाराची अवहेलना किंवा तिरस्कार केला नाहीं. संसार असार असून कष्टमय व दुःखमय असल्याकारणानें यांतून होतांहोईल तों लौकर आपली सुटका करून घेऊन मरणानंतर लाभणाऱ्या स्वर्गसुखाकरतां धर्मकर्म करावें असा खोटा व दांभिक धर्मप्रचार करून काल्पनिक

..............................................................................................

❖" The work of reform in the field of social and religious thought has been constantly going on in India. Many think that these reforms began only after the arrival of the English and men like Raja Ram Mohan Roy and others began that movement. But that is not true. In Karnatak, as far back as eight centuries, Basaveshvar the great, had envisioned the utmost reforms which we have been thinking of in the twentieth century. He coined a new word for physical labour 'Kayak.' Physical labour was worship of God to him. He declared 'Kayakave Kailas' i.e. labour is heaven. The meaning of productive labour is really Heaven.

He also placed before the people the ideal that there was no difference between man and woman. Similarly he rejected the authority of any sacred text, including that of the Vedas, to weigh heavily on the mind. In short he taught those doctrines that are acceptable to the modern mind. "

— **Acharya Vinoba Bhave.**

त्याचा (वसवेश्वराचा) उपदेश असा आहे कीं प्रत्येकानें उद्योग करून आपलें पोट भरावें, कोणीही भिक्षा मागूं नये; त्यांचे धार्मिक गुरु जंगम यांनींही भिक्षा मागूं नये. **उद्योगाचें महत्व व श्रेष्ठत्व प्रतिपादणारा व भिक्षा बंद करणारा असा हिंदुस्थानांतील पहिला तत्ववेत्ता बसव होय.** त्यानेंच एकट्यानें उपदेशिलें कीं कायकानेंच (कर्मानें) कैलास (मोक्ष) मिळेल.

— **श्री. चिं. वि. वैद्य**
(मध्ययुगीन भारत भाग ३ पा. ६१३, ६१४)

स्वर्गसुखाचे आमिष दाखवून त्यांनीं लोकांना कधींही झुलवले नाहीं. उलट स्वर्ग, मृत्यु, पाताळ, (नरक)* येथेंच आहेत व ते आपल्या आचरणानें आम्हीच निर्माण करतो व येथें जे लोक आपला प्रपंच नीट नेटका करतील तेच मोक्ष प्राप्तीला योग्य ठरतील, असा त्यांचा उपदेश होता. यामुळें सर्व शिवशरण आपापला धंदा सांभाळून व सुखसमाधानानें आपला प्रपंच चालवूनच परमार्थ साधना व धर्मप्रचार करीत होते. आपल्या बायकामुलांचा आबाळ केलेलें किंवा आपल्या प्रपंचाची हेळसांड केलेलें एकही उदाहरण ह्या शिवशरणांत दिसून येत नाहीं. मोळीविक्याचा धंदा करणारे मोळगी मारय्याचें उदाहरण वर आलेंच आहे. त्याचप्रमाणें वर नमूद केलेल्या अनुभव मंटपातील शिवशरणांच्या नांवावरून ते करीत असलेल्या धंद्याचीही कल्पना येते. अनुभव मंटपाचे सभासद होऊन अध्यात्म साधना करीत असतांना सुद्धां त्यांनीं आपला धंदा सोडला नाहीं. यावरून "कायकवे कैलास" हें तत्त्व हे शिवशरण किती निष्ठेनें प्रत्यक्ष आचरणांत आणीत होते हें कळून येतें. 'साधी राहणी व उच्च विचारसरणी' हें तर त्यांचें ब्रीदच होतें कल्याण शहरांतील ज्या गुहांत कांहीं शिवशरण राहात असत त्या गुहा सध्यां अस्तित्वांत आहेत. या गुहा जर पाहिल्या तर त्यांच्या साध्या राहणीची कल्पना येते.

त्याचप्रमाणें कोणीही जास्ती अर्थसंचय करूं नये व जास्ती संपत्ती असल्यास ती देवाची देणगी असून आपण त्याचे विश्वस्त ( Trustee ) आहो असें मानुन धर्म प्रचाराकरतां व समाज कल्याणासाठी त्याचा विनियोग करावा, असा त्यांचा उपदेश होता. अशा विनियोग कार्याला ते "दासोह (दासः+अहम्)" म्हणून संबोधीत असत. मी विनियोग करीत असलेली संपत्ति शिवाची असून मी त्याचा दास (नोकर) म्हणून हें कार्य करीत आहे, असा ह्या 'दासोह' शद्बाचा अर्थ आहे. ह्या विसाव्या शतकांत महात्मा गांधींनीं ज्या तत्वांचा पुरस्कार केला तींच तत्वें

---

* १) " देवलोक, मर्त्यलोक हे निराळे नाहींत. सत्य बोलणेंच देवलोक, खोटें बोलणेंच मर्त्यलोक. सदाचार हाच स्वर्ग, दुराचार हाच नरक."

२) मर्त्यलोक परमेश्वराची प्रयोग शाळा आहे. येथें जे यशस्वी होतील ते तेथेंही (मोक्षप्राप्तींत) यशस्वी होतील. येथें जे अपेशी होतील ते तेथेंही अपेशी ठरतील.

— श्रीबसवेश्वर वचन

बाराव्या शतकांत श्रीवसवेश्वरांनीं व इतर शिवशरणांनीं अमलात आणून सर्वोदय समाजरचनेचा पाया घातला होता. याच्या वरून त्यावेळीं त्यांनी केलेल्या कार्याचें महत्व कळून येते. महात्मा गांधींनीं बसवेश्वराच्या चरित्राचा, त्यांनीं केलेल्या कार्याचा व त्यांच्या वचनांचा परिचय करून घेतला होता व बाराव्या शतकांत बसवेश्वरांनीं केलेलें कार्यच आज आपण करीत आहों, असा अभिप्राय त्यांनीं व्यक्त केला होता, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

**बसवादि शिवशरणांचें कन्नड वचन साहित्य.**

श्री वसवेश्वर व इतर शिवशरणांनीं केलेली दुसरी महत्वाची कामगिरी म्हणजे त्या सर्वांनीं रचलेलें वचन साहित्य. श्रीप्रभुदेव, श्रीबसवेश्वर, श्रीचन्नबसवेश्वर यांनीं संस्कृत भाषेचा गाढ अभ्यास केला होता व त्यावेळच्या रूढीप्रमाणें त्यांनीं आपला धर्मप्रचार व ग्रंथरचना संस्कृतभाषेंत केली असती तर त्यांचीही कीर्ति श्री शंकराचार्यांप्रमाणें सर्व हिंदुस्थानभर पसरली असती. परंतु तो मार्ग त्यांनीं स्वीकारला नाहीं. आपल्या उदात्त तत्त्वांचा व धर्माचा प्रचार विशेषत: समाजाच्या खालच्या वर्गांतील लोकांमध्यें करावयाचा असल्या कारणानें प्रचलित रूढी बाजूला सारून, आपली मायभाषा कन्नड मधूनच प्रचार करण्याचें त्यांनीं ठरविलें. वर नमूद केलेल्या शिवानुभव मंटपांत होणाऱ्या धर्मचर्चेच्या वेळीं व तसेच वेळोवेळीं चालणाऱ्या धर्मोपदेशाचे वेळीं शिवशरणांच्या मुखांतून जे उद्‌गार निघत, तींच त्यांचीं **'वचनें'** म्हणून प्रसिद्ध आहेत. तीं कांहीं उपदेशात्मक, कांहीं आत्म निवेदनात्मक व कांहीं संभाषणात्मक अशीं आहेत. ह्या सर्व वचनांच्या संकलनालाच **'वचनशास्त्र'** अथवा **'वचन साहित्य'** म्हणतात. हीं वचनें सामान्य व अशिक्षित लोकांना सुद्धां समजतील अशा सोप्या, साध्या, रसभरीत, ठसकेबाज व परिणामकारक भाषेंत रचिलीं गेलीं आहेत. वीरशैवधर्माचें तत्त्वज्ञान, धर्मसंस्कार, आचारविचार, नीतिनियम व शिवशरणांनीं वेळोवेळीं उपदेशिलेलीं उदात्त तत्त्वें सूत्ररूपानें या वचनांत ग्रंथित केलीं गेलीं आहेत. यामुळें हें वचनशास्त्र वीरशैवांचे **'कन्नड उपनिषद'** असें मानलें गेलें आहे. साहित्य दृष्टीनें सुद्धां हें वचनसाहित्य अत्यंत उत्कृष्ट, प्रभावशाली व स्फूर्तिदायक साहित्य म्हणून मानले जात असून कन्नड भाषेंत त्याला महत्वाचें स्थान आहे. श्री ज्ञानदेवादि महाराष्ट्र साधुसंतांनीं रचलेल्या साहित्यामुळें महाराष्ट्रांत जी जागृति झाली त्याचप्रमाणें या वचन साहित्यानें कर्नाटकांत अभूतपूर्व जागृति केली. प्राचीन व आधुनिक काळामध्यें साहित्य क्षेत्रांत नाणावलेल्या अनेक कन्नड ग्रंथकारांना व कवीना हें वचन साहित्य स्फूर्तिस्थान बनलें आहे. प्राचीन काळीं होऊन गेलेल्या कांहीं ग्रंथकारांनीं या वचन

वाङ्मयावर ग्रंथरचना केली आहे. सांप्रतही या वचन साहित्याचें संशोधन व संकलन केले जात असून इतर भाषांत ही त्याचे अनुवाद होत आहेत. यामुळें या अमूल्य वचन साहित्य भांडाराचा परप्रांतीय व परदेशीय लोकांना परिचय होऊन त्यांना त्याचें महत्व कळून येत आहे.

**श्रीवसवेश्वरांचा अहिंसावाद.**

भगवान बुद्ध व महात्मा गांधी यांच्या प्रमाणें श्रीवसवेश्वर संपूर्ण अहिंसावादी होते. शारीरिक हिंसेप्रमाणें मानसिक हिंसासुद्धां त्यांनीं त्याज्य मानली होती. त्यांचा अहिंसावाद मानवापुरता मर्यादित नसून प्राणी हिंसा सुद्धां करूं नये असा त्यांचा उपदेश होता. यज्ञयागादि धर्मकृत्यांत त्यावेळीं होत असलेल्या पशुवधाचा त्यांनीं कठोर शद्बांत निषेध केला होता. सर्व प्राणिमात्र शिवांशभूत असल्या कारणानें त्या सर्वांवर प्रेम करणें हाच खरा धर्म आहे असें ते मानीत होते. रागद्वेषादि षड्रिपूंचें दमन करून, प्रेम, दया, क्षमा, शांति या सारख्या सद्‌गुणांचें अवलंवन करून, सदाचारानें शिवभक्ति करणें हेंच मोक्षप्राप्तीचें मुख्य साधन आहे असा त्यांचा उपदेश होता. **"दयारहित धर्म कोणता आहे ? दया हाच धर्माचा मूलाधार आहे." "आपल्या घरांतील आग प्रथम आपलें घर जाळून नंतरच दुसऱ्यांचीं घरें जाळते, त्याप्रमाणें आपल्या मनातील राग प्रथम आपला आत्मनाश करून, नंतरच दुसऱ्याच्या नाशास कारणीभूत होतो, करितां कोणीही रागावूं नये." "आमची निंदा केल्यानें कोणाला संतोष होत असेल तर त्यांना संतुष्ट केल्याचें पुण्य आम्ही कां दवडावें ?" "मला शिव्याशाप देणारे माझे बंधू, माझी निंदा करणारे माझे मातापिता, परंतु माझी स्तुती करणारे मला सोन्याच्या सुळावर चढविणारे आहेत, असें मी मानतो." "चोरी करूं नको, कशाचीही हत्या करूं नको, खोटें बोलू नको, रागावूं नको, दुसऱ्यांची निंदा करूं नको, आत्मस्तुती करूं नको, याप्रमाणें वागल्यानेंच आत्मशुद्धि होईल, व यानेंच परमात्मा प्रसन्न होईल." "अहो म्हणणें हाच स्वर्ग, अरे म्हणणें हाच नरक."** अशी वसवेश्वरांचीं अनेक नीति वचनें सुप्रसिद्ध आहेत. यावरून त्यांच्या नीतिमत्तेची व अहिंसेच्या असिधाराव्रताची कल्पना येते. या प्रमाणें सदाचारी, व व्रतस्थ राहून व पुराणमतवादी कर्मठ लोकांचा छळ सहन करून ते आपल्या धर्मप्रचाराचे व नव समाज रचनेचे कार्य करीत होते. त्यांच्या क्रांतिकारक समाजसुधारणेमुळें कर्मठ लोकांनीं त्यांचा अतोनात छळ केला. त्यांच्यावर व त्यांच्या अनुयायांवर त्यांनीं सामाजिक वहिष्कार घातला व ठार मारण्याची धमकीही दिली. शेवटीं हरळय्या मधुवय्या ह्या शिवशरणांचा त्यांनी विज्जल राजांकडून अमानुषपणें वधही करविला.

त्यावेळीं बसवेश्वरांचे कांहीं अनुयायी चवताळून विज्जलावर सूड उगवण्याची भाषा बोलूं लागले. परंतु अशा कठिण प्रसंगीं सुद्धां बसवेश्वरांनीं अहिंसा तत्त्वावरील आपली श्रद्धा ढळूं दिली नाहीं. त्यांनीं त्या अनुयायांचीं समजूत काढण्याचा कसोशीनें प्रयत्न केला. परंतु बसवेश्वर विज्जल राजाचे मंत्री असल्या कारणानें ते त्यांचे मिंधे झाले आहेत, असा उलट आरोप त्यांनीं त्यांच्यावर केला. त्यामुळें बसवेश्वर हताश होऊन, मंत्रीपदाचा त्याग करून, आपल्या पूर्वाश्रमींच्या कूडल संगमाला निघून गेले व तेथेच ते कांहीं काळानंतर लिंगैक्य झाले.

**बसवेश्वरांच्या कार्यासंबंधी कांहीं गैरसमज.**

बाराव्या शतकांत श्री बसवेश्वरादि शिवशरणांनीं केलेल्या धार्मिक व सामाजिक कार्याबद्दल कांहीं महाराष्टीयांत फारच अज्ञान दिसून येते. बसवादि शिवशरण जैनधर्मविरोधी होते व त्यांनीं त्या धर्मांच्या विरूद्ध प्रचार करून आपला वीरशैव धर्म वाढविला, अशी कांहीं लोकांची समजूत आहे. परंतु ही समजूत अगदीं चुकीची आहे. बाराव्या शतका पूर्वीच कर्नाटकांतील जैन धर्माचें वर्चस्व कमी झालें होतें व त्याच्याठिकाणीं पाशुपत शैवपंथ (काळामुख) वाढला होता.† त्या पंथाचे मठ व देवालयें सर्व कर्नाटकभर पसरलीं होतीं व तो पंथ त्यावेळीं कर्नाटकाचा मुख्य धर्म म्हणून मानला जात होता. त्याला राजाश्रयही चांगला मिळाला होता. त्या धर्माचे आचार्य त्यावेळच्या प्रसिद्ध चालुक्य व कलचूर्य राजघराण्याचे वंशपरंपरागत राजगुरू होते. ह्या राजघराण्यांच्यां अनेक राजांनीं त्या धर्माच्या देवालयांना व मठांना मोठमोठ्या देणग्या दिलेल्या होत्या. यामुळें त्याकाळीं सर्व कर्नाटकभर या पंथाचेंच वर्चस्व वळावलें होतें ह्या **काळामुख-पाशुपत पंथही शैवपंथ असला तरी तो कट्टर पुराणमतवादी व वर्णाश्रमधर्मवादी** होता. यामुळें बसवादि शिवशरणांना मुख्यतः या पंथाच्या अनुयायांचाच विरोध झाला, जैनांचा नव्हे. बसव पुराणादि वीरशैव धर्मग्रंथामध्यें बसवेश्वरांना विरोध केलेल्यांचीं कांहीं नांवें नमूद केलीं आहेत. त्यांत जैन धर्मीयाचें एकही नांव

---

† "During the period of Someshwar II (1068–1076 A. D.) the Kalamukh aseeties had perhaps reached the height of their popularity in the land, eclipsing to some extent the jains on the one side and the waning Buddhist on the other."

— Mysore Gazetteer 1930 – Vol. II – Part II p. 779

नाहीं. तसेंच बसवादि शिवशरणांच्या वचनांचें एवढें मोठें वाङ्मय आज उपलब्ध आहे त्यांत कोठेंही त्यांनीं जैनधर्मावर टीका केलेलें, अथवा त्या धर्माबद्दल अनुचित उद्‌गार काढलेलें आढळून येत नाहीं.

**बसवादि शिवशरणांचा मुख्य विरोध कोणत्याही धर्माला नसून उच्चनीचतेच्या आधारावर उभारलेल्या वर्णाश्रम धर्मांला व हिंदुधर्मांतील यज्ञयागादि कर्मकांडाला होता.** याशिवाय लक्षांत ठेवण्यासारखी महत्वाचीं गोष्ट म्हणजे हिंदुधर्मातील जातिभेद, अस्पृश्यता वरिष्ठ-कनिष्ठ वर्ग, उच्चनीचभाव, स्त्री–पुरुष भेद, यासारख्या समाज घातक रूढींना मूठमाती देऊन, **समानता, विश्व बंधुत्व, दया, प्रेम उद्योगशीलता यासारख्या उदात्त तत्त्वांवर आधारलेला एक आध्यात्मिक सर्वोदय स्वरूपी समाज निर्माण करणेचा बसवादि शिवशरणांचा मुख्य उद्देश होता,** हें दि. गुरुवर्य रानडे यांनीं शिवानुभव मंटपाबद्दल काढलेल्या उद्‌गारावरून स्पष्ट आहे. या शिवशरणांच्या कार्याचा अभ्यास केलेल्या सर्व विद्वानांचे ही हेंच मत आहे. बसवादि शिवशरणांच्या वर्णाश्रम विरोधी प्रचारामुळें व विशेषत:मधुवय्या हरळय्या ह्या ब्राह्मण चांभार अंतर्जातीय विवाहामुळें कांहीं वर्णाश्रमवादी व कर्मठ पुराण–मतवादी लोक खवळून गेले व त्यांच्यामध्यें एकच हाहा:कार उडाला. 'आपला पवित्र धर्म बुडाला, समाजाचा सबगोलंकार झाला; आतां देशांत सगळीकडे दुराचार माजणार' असा त्यांनीं हलकल्लोळ माजवून व वर्णाश्रम धर्माचें रक्षण करणें राजाचें कर्तव्य आहे, व या धर्माचें उल्लंघन करणाऱ्या ह्या धर्मलंडांना (?) कडक शिक्षा दिलीच पाहिजे असा शास्त्रार्थ काढून व बिज्जल राजावर अयोग्य दडपण आणून त्यांनीं त्याच्याकडून हरळय्या मधुवय्या शिवशरणांचा अमानुषपणें वध करविला. **स्वत: बिज्जळ राजा जैन धर्मीय नसून शैवपंथीय होता.** † **त्याचे कुलगुरु काळामुख–पाशुपत पंथाचे आचार्य होते व त्यानें त्यांची पाद्यपूजा करून (कालंकाचि) त्यांच्या अनेक मठांना व देवालयांना मोठमोठचा देणग्या दिलेल्या होत्या.** ही गोष्ट आतां त्याकाळचे शिलालेख वगैरे अनेक संशयातीत ऐतिहासिक पुराव्यावरून शाबीत झाले आहे. तसेंच त्याच्या दरबारातही वर्णाश्रमधर्मी लोकांचेच जास्ती प्राबल्य होतें व त्याच्या राज्यांत त्या धर्मांचेच अधिकारी बहुसंख्य व उच्चपदस्थ होते ह्या गोष्टी ह्या बाबतीत लक्षात ठेवण्या सारख्या आहेत. तसेच

---

† जिज्ञासूनीं माझ्या 'होस बेळकु' कन्नड ग्रंथांतील सातवें प्रकरण 'बिज्जळराजनु जैननल्ल–शैव हिंदु' वाचावें.

— लेखक

बसवादि शिवशरणांचीं चळवळ जात्यातीत व धर्मातीत होती. त्यांच्या अनुयायामध्यें मधुवय्या सारखे ब्राह्मण व मनुमुनि सारखे जैनगुरू ही होते व त्यांच्या विरोधकामध्यें माचण्णासारखे पुराणमतवादी कर्मठ वीरशैवही होते. या सर्व गोष्टीवरून बसवकाळीं कल्याणांत उद्भवलेला झगडा वीरशैव विरुद्ध जैन अथवा वीरशैव विरुद्ध इतर असा नसून हिंदु धर्मांतील परंपरागत रूढीनें व अंधश्रद्धेनें जखडून गेलेले पुराणमतवादी कर्मठ लोक व उदात्त तत्वांवर नवीन धर्म व समाजरचना करूं पाहणारे धर्मोद्धारक व समाजसुधारक यांच्या मधील होता हें स्पष्ट आहे.

दुर्दैवानें कर्नाटकांत चौदाव्या शतकापासून वीरशैव, वैष्णव, जैन ह्या तीनही पंथांच्या कांहीं सांप्रदायिक प्रचारकांत जी एक असहिष्णुतेची लाट उसळली त्यावेळी कांहीं जैन ग्रंथकारांनीं बसवेश्वर व वीरशैव यांच्याबद्दल कांहीं अनुद्गार काढले व त्याचेंच पर्यवसान त्यांच्याबद्दल खोटयानाटया व स्वकपोलकल्पित कथा रचण्यांत झालें. ह्या सर्व दंतकथा सर्वस्वी खोटया, द्वेषपूरित व आधार रहित असून, परस्पर द्वेष बुद्धीनें रचलेल्या आहेत. त्यांत सत्याचा गंधही नाहीं व ऐतिहासिक दृष्टीनें त्यांना काडीमात्रही किंमत नाहीं. दुर्दैवानें कांहीं आधुनिक ग्रंथकारांनीं ह्या परिस्थितीचा सारासार विचार न करतां, ह्या प्राचीन सांप्रदायिक मतद्वेषी ग्रंथकारांचीच री ओढून श्री बसवेश्वराबद्दल बेजबाबदार व भरमसाट विधानें केली आहेत, ही दुःखाची गोष्ट आहे. सुदैवानें अलीकडे लोकांना श्री बसवेश्वरांच्या उदात्त चरित्राची व त्यांनीं केलेल्या अभूतपूर्व व असामान्य कार्याची माहिती होऊन त्यांच्या पवित्र चारित्र्याला चिकटलेले निराधार व मतद्वेषी कलंक धुवून निघत आहेत ही आनंदाची गोष्ट आहे.

या सर्व हकीगतीवरून बाराव्या शतकांत श्रीबसवेश्वरांनीं केलेलें कार्य सांप्रदायिक स्वरूपाचें नसून भगवान बुद्ध व महात्मा गांधीजी यांच्या कार्याप्रमाणेंच समाजहितपोषक, राष्ट्रसंवर्धक व मानवतावादी होतें असें दिसून येईल.

# श्रीबसवेश्वरास आदरांजली

## 'लाखांचे तुज आज प्रणाम !'

"श्री बसवेशा ! पवित्र पुरुषा !!
लाखांचे तुज आज प्रणाम !!
तव कार्याच्या झडती नौबती,
लाख जिभेवर तुझेंच नाम. ॥धृ॥

राज्य लक्ष्मी तुझिया दारीं,
सडा-संमार्जन जरी करी,
"योगराज" तूं थोर विचारी
गरिबीचें तुज आवडे धाम. ॥१॥

कष्टाविण या जगीं कुणाला
हक्कच नाहीं जगावयाला"
सांगितले तूं हेंच जगाला
"पोटापुरतेंच मिळवा दाम." ॥२॥

मानव निर्मित उच्च-नीचता
अस्पृश्यांची आणि हीनता
तुवां क्षाळिलि सांडुनि रक्ता
पतीत पावन जणुं तूं राम. ॥३॥

सत्य, अहिंसा, शांति, समता
मानवतेची यांत सांगता
या तत्वांची पूजा करिता
तरेल दुःखी दुनिया आम" ॥४॥

— श्रीनिवास यादव

लेखांक ७

# भक्तीमार्गाचे मूळ अध्वर्यु त्रेसष्ट पुरातन शैवसंत

( सन १९६५ जून महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख )

भक्ति नारदास म्हणते—

" उत्पन्ना द्राविडे साहम् वृद्धि कर्नाटके गता ।
क्वचित्क्वचिन्महाराष्ट्रे गुर्जरे जीर्णतां गता ।। "

१–४७ भागवत माहात्म्य

हिंदु धर्मशास्त्रांत मोक्ष साधनेकरतां भक्ति, ज्ञान, योग व कर्म असे जे चार मार्ग प्रतिपादित केले गेले आहेत त्यामध्यें भक्तिमार्गच अत्यंत श्रेष्ठ व सर्वांना सहज सुलभ असा मार्ग आहे. ज्ञान, योग, व कर्म ह्या मार्गांचें अवलंबन समाजांतील कांहीं विशिष्ट व्यक्तींच करूं शकतील, परंतु भक्तिमार्ग सर्वांनाच म्हणजे ज्ञानी–अज्ञानी, सुशिक्षित–अशिक्षित, स्त्री–पुरूष, ब्राह्मण–अंत्यज, राव–रंक, पतित–पामर, बायाबापड्या, आबालवृद्ध, अशा सर्व तऱ्हेच्या व दर्जाच्या लोकांना सुलभसाध्य असून कोणीही मनुष्य या मार्गांचें अवलंबन करून मुक्ति मिळवूं शकतो. एवढेंच नव्हें तर, 'भक्तीशिवाय मुक्ति' नाहीं असें संत वचन आहे. भक्तिमार्ग हा कोणी एकाद्या ऋषीनें अथवा आचार्यानें शोधून काढलेला नसून, भक्तीचें मूळ मानवाच्या नैसर्गिक स्वभावांतच असलेलें दिसून येते. आदि–मानवाची

बुद्धि प्रगल्भ होऊन त्याला जगन्नियंत्या देवाची कल्पना आल्या वेळेपासून त्यानें भक्तिभावानें त्या देवास आळविण्यास प्रांरभ केला. प्रथम प्रथम त्याच्या प्रत्यक्ष दृष्टीला दिसणारे सूर्य, चंद्र, भूमाता, यांनाच देव मानून त्यानें त्यांच्या उपासनेस सुरवात केली. परंतु कालानुसार त्याच्या आध्यात्मिक विचारांत प्रगति होऊन, सूर्य, चंद्र, इंद्र, पृथ्वी वगैरे मानले गेलेले देव निरनिराळ्या देवता असून त्या सर्वांचा व अखिल विश्वाचा निर्माता, त्राता व संहारकर्ता असा एकच देव, परमेश्वर अथवा परमात्मा निराळाच आहे, ही भावना दृढ मूल झाली व नंतर तो त्याची उपासना करूं लागला. मानवाच्या आध्यात्मिक प्रगतीचें हें चित्र आपणांस प्रथम सिंधु खोऱ्यांतील (मोहेंजोदारो व हराप्पा) द्राविड संस्कृतींत व वेदकालीन आर्य संस्कृतींत दिसून येतें. उपनिषदकालीं ज्ञानमार्गाला जास्ती महत्व दिलें गेलें असले तरी श्वेताश्वतर वगैरे उपनिषदांत भक्तिमार्गाचें प्रतिपादन केलेलें आढळून येतें. त्याचप्रमाणें हिंदु धर्म शास्त्राचा प्रमुख धर्मग्रंथ 'भगवद्गीता' यांत या चारही मोक्षमार्गांचा सुंदर समन्वय करून शेवटीं भक्तिमार्गाचें श्रेष्ठत्व प्रतिपादलें आहे. तसेंच वहुतेक सर्व पुराणांत भक्तिमार्गाचाच उपदेश केला गेला आहे.

### द्रविड देशांतील पुरातन शैव संत

अशा रीतीनें प्राचीन काळापासूनच आध्यात्मिक क्षेत्रांत भक्तिमार्गाचा पुरस्कार केला गेला असला तरी त्याकाळीं त्याचा प्रचार समाजाच्या सर्व थरामध्यें झाला होता असें म्हणतां येणार नाहीं. मध्ययुगीन काळीं कर्नाटकात बाराव्या शतकामध्यें उदयास आलेले श्री बसवेश्वर, श्री प्रभुदेव, श्री सिद्धरामेश्वर, श्री चन्नबसवेश्वर संत श्री महादेवी अक्का वगैरे शिवशरणांनीं ह्या भक्ति पंथाला व्यवस्थित स्वरूप देऊन, आपल्या उपदेशानें व मुख्यत: आपल्या पवित्र व भक्तियुक्त आचरणानें समाजांतील सर्व स्त्री–पुरूषांत व ब्राह्मणापासून अंत्यजा पर्यंत सर्व जातींच्या लोकांत भक्तीचा दांडोरा पिटून कर्नाटकांत भक्तिभावाचा सुकाळ केला. या भक्तिपंथाचा सोहळा आम्हास त्या काळच्या वीरशैव धर्माच्या इतिहासांत पाहण्यास मिळतो. तसेंच त्या नंतर म्हणजे तेराव्या शतकांत महाराष्ट्रांत होऊन गेलेल्या, श्री ज्ञानदेव, श्री नामदेव, श्री एकनाथ, तुकाराम महाराज वगैरे संतांनीं भक्तिप्रधान भागवत धर्माची मुहुर्तमेढ रोवून वीरशैव शिवशरणांप्रमाणेंच त्यांनींही आपल्या पंथाचें द्वार सर्व जातींच्या व वर्गाच्या लोकांना खुले करून समाजांतील सर्व थरामध्यें भक्तिमार्गाचा प्रचार केला. याचें श्रेय ह्या दोन पंथाच्या संतांना असले तरी सामान्य जनतेची व सर्व जातींच्या व धर्माच्या लोकांची भक्तीमार्गावरील श्रद्धा दृढमूल करून त्याला सार्वजनिक व व्यवस्थित स्वरूप देण्याचें श्रेय,

त्यांच्याही पूर्वी द्रविड देशांत (कन्याकुमारी पासून तुंगभद्रा नदीपर्यंतचा हिंदुस्थानचा भाग) होऊन गेलेल्या शैव व वैष्णव (नायनार व अळवार) संतांनाच आहे.

प्राचीन काळीं द्रविड देश अत्यंत भरभराटीत होता. त्याकाळीं तेथें शैवधर्मच प्रमुख धर्म असून त्या देशाच्या सर्व भागांत त्या धर्मांचें प्रावल्य दिसून येत होतें. परंतु ख्रिस्तपूर्व काळीं तेथें बौद्ध व जैन धर्मांचा प्रवेश झाला व त्यांनीं तेथें हिंदु धर्मावर वरचढ करून आपलें बस्तान बसविले. ख्रिस्तपूर्व दोन तीन शतकापासून ख्रिस्त शतकाच्या तीन चार शतकापर्यंत ह्या धर्मांनींच द्राविड देश व्यापला होता. तथापि ख्रिस्तशतकाच्या तिसऱ्या शतकापासून नवव्या दहाव्या शतकापर्यंत तेथें ह्या शैव वैष्णव (नायनार – अळवार) संताचा उदय झाला. त्यांनीं आपल्या भक्तिमार्गीय प्रचारानें तेथें पुन: हिंदु धर्मांचें पुनरूज्जीवन केलें. त्यामुळें तेथें बौद्ध व जैन धर्मांना उतरती कळा लागली. त्यांतल्या त्यांत शैवपंथीय संतांचा धर्मोपदेश व आचार विचार जास्ती पुरोगामी स्वरुपाचें असून त्यांचा धार्मिक प्रचार समाजातील अगदीं शेवटच्या थरापर्यंत पोहोचल्यामुळें समाजांतील सर्व जातींच्या व धंद्याच्या लोकांतून, शूद्र व अतिशूद्र वर्गातून सुद्धां, शैवसंत उदयास आले. ह्यांच्यामध्यें" त्रेसष्ट पुरातन शैवसंत " नांवानें गाजलेले त्रेसष्ट शैवसंत आहेत. त्यांच्यामध्यें १५ ब्राह्मण, १२ क्षत्रिय ५ वैश्य ह्या वर्गांचे असून बाकीचे ३१ शूद्र व अतिशूद्र म्हणून गणल्या जाणाऱ्या वर्गांतून निर्माण झालेले आहेत. तसेंच त्यांच्यामध्यें तीन स्त्रियाही आहेत. ह्याच्यावरून ह्या शैवसंतांचे समाजांतील सर्व थरांचें प्रातिनिधिक स्वरूप दृष्टोत्पत्तीस येतें.

### त्रेसष्ट पुरातन शैवसंतांचीं शुभनामें

ह्या त्रेसष्ट पुरातन शैवसंतांचीं शुभ नांवें खालीं दिली आहेत.

१ तिरूनूलर, २ तिरूनावुक्करसु (अप्पर अथवा वागीश), ३ तिरुज्ञानसंबंधर, ४ सुंदरमूर्ति, ५ कण्णप्प (व्याध), ६ नंदनार (नंद), ७ कारैंकल अम्मवर (पुनीतवती), ८ ईशैंज्ञानीयम्मै (ज्ञानवती), ९ तिरुनीलकंठ, १० इरुपगैं, ११ इळैयामर कुडिमार (मार), १२ मेयप्पोरुळ (सत्यार्थ), १३ वीरन मिंड, १४ अमरनीति, १५ एरिभक्त (दारुक), १६ एनादिनाथ, १७ कुंगलियक्कलिय (कलानाथ), १८ मानकंजार, १९ अरिवट्ट.य, २० अनाय (गोनाथ), २१ मूर्तिनायनार, २२ मुरुगर २३ रुद्रपशुपति, २४ तिरुकरिप्पत्तोंडु, २५ चंडेश्वर, २६ कुलच्चिरियर, २७ कुरुंब,

२८ अप्पोदियडिगळ, २९ कलिकाम, ३० दंडियडिगळम्, ३१ मूर्खं ३२ जोमासिमार, ३३ शाक्यनायनार, ३४ शिरुप्पलि, ३५ शिरुतोंड, ३६ चेरनाथ, ३७ गणनाथ, ३८ कुत्तळ, ३९ पुगळचोळ, ४० नरसिंगमुनय्यरय्य, ४१ अतिभक्त, ४२ कलकंभ, ४३ कलियनायनार, ४४ शक्तिनायनार ४५ एय्यडिगळ, ४६ कणंपुल्ल, ४७ केरिनायनार, ४८ नेडुमार, ४९ वायिलार, ५० मनुय्यडुवार, ५१ कळरसिग, ५२ इडगरिनायनार, ५३ चिरुत्तुणैं, ५४ पुगळतुणैं, ५५ कोटुपली, ५६ पुशलार, ५७ मंगय्यकरसि (महिळेश्वरी), ५८ नेशनायनार, ५९ कोचंगळ चोळ, ६० याप्पाण नायनार. ६१ शडय्य नायनार, ६२ तिरुनीलनक्क, ६३ नवनंदी (नेमिनंदी माहेश्वर).

टीप :– माणिक्कवाचकर हे प्रसिद्ध शैवसंत असले तरी त्यांचें नांव ह्या यादींत नाहीं.

### ह्या शैवसंतांचें कार्य.

हे शैवसंत अत्यंत श्रद्धावान, धार्मिक व सदाचरणी असून त्यांनीं आपलें सर्व आयुष्य अत्युत्कट भक्तिभावानें भगवान शंकराची आराधना करून त्याला आपल्या प्रेमपूरित व श्रद्धायुक्त कवनानें आळवण्यांत घालविलें. परमेश्वराची पूजा अर्चा व सेवा करण्यात त्यांनी वेळ प्रसंगी दाखविलेला अत्युत्कट भक्तिभाव, लोकोत्तर स्वार्थत्याग वाखाणण्याजोगे आहेत. नामांकित व्याधसंत कणप्पानें शिवलिंगाच्या पूजेला फूल मिळालें नाहीं म्हणून त्यानें आपला डोळाच काढून लिंगावर वाहिला कलियनायनार नांवाच्या संतानें शिवापुढील नंदादीपांत घालण्यास एकदां तेल अथवा तूप मिळालें नाहीं म्हणून आपलें रक्तच काढून त्यांत घातलें, अशीं हीं त्यांचीं अलौकिक श्रद्धेचीं व स्वार्थत्यागाचीं उदाहरणें पाहिलीं म्हणजे देवावरील त्यांच्या असामान्य भक्तिभावाचें आश्चर्यच वाटतें. तसेंच ते ज्याप्रमाणें निस्सीम शिवभक्त होते त्याचप्रमाणें ते दयामय व परोपकारी वृत्तीचे निःस्वार्थी समाजसेवक ही होते. समाज सेवा ही ईशसेवाच आहे अशी त्यांची भावना असल्यामुळें व सामान्य जनतेतूनच ते उदयास आलेले असल्यामुळें ते सदासर्वदा ईशसेवेंत व पददलितांची सेवा करण्यांत रत असत. त्याकारणानें ते सामान्य जनतेत अत्यंत लोकप्रिय झालेले होते. त्यांच्या कार्यक्षेत्राच्या सर्वस्थळीं त्यांच्या भक्तांनीं त्यांचीं मंदिरें उभारून त्यांत त्यांच्या मूर्ती स्थापन केल्या आहेत व दरसाल मेळे, यात्रा, वगैरे भरवून त्यांच्या नांवानें वार्षिकोत्सव करीत आहेत.

कांहीं प्रसिद्ध शिवमंदिरांत ह्या सर्व त्रेसष्ट पुरातन संतांच्या मूर्ती स्थापन केल्या आहेत. सामान्यपणें ह्या सर्व मूर्ती हात जोडून उभे असलेल्या देवता स्वरूपांत आहेत. तसेंच पल्लव, पांड्य, चोळ वगैरे प्राचीन राजेरजवाड्यांनीं ह्या शिवमंदिरांना मोठमोठ्या देणग्या देऊन ह्या सर्व पुरातन संतांच्या पूजाअर्चेची व्यवस्था केली आहे.

## चार समयाचार्य व शैवसिद्धान्ताचे मोक्षमार्ग

ह्या पुरातन शैव संतांनीं प्रतिपादलेल्या तत्वज्ञानाला 'शैवसिद्धान्त' असें नांव आहे. या शैव सिद्धांतांत सालोक्य, सामिप्य, सारूप्य, व सायुज्य असे मोक्षाचे चार प्रकार वर्णिले आहेत. ह्या मोक्ष प्राप्तीकरतां अनुसराव्या लागणाऱ्या धर्माचरणाला अनुक्रमें दासमार्ग, सत्पुत्रमार्ग, सखामार्ग, व सन्मार्ग अशी नांवें आहेत. देवालयाची झाडलोट करणें, देवाच्या पूजेकरतां फुलें वेचणें, वगैरे सेवारूपानें देवाची आराधना करण्याच्या मार्गाला "चर्या अथवा दासमार्ग" नांवानें संबोधतात ह्या मार्गाचें अवलंबन करणाऱ्यांना शिवलोकांत म्हणजे कैलासांत राहण्याचा मान मिळतो. सत्पुत्रानें आपल्या मातापित्याची प्रेमानें सेवा केल्याप्रमाणें मुमुक्षूनें आपण पार्वती परमेश्वराचा पुत्र आहो असें समजून त्यांची अत्यादरानें व प्रेमभावानें सेवा करण्याच्या मार्गाला "क्रिया अथवा सत्पुत्रमार्ग" असें म्हणतात. ह्या मार्गानें देवाची सेवा केल्यास भक्ताला 'सामिप्य' म्हणजे देवाच्या सानिध्यांत राहण्याचें भाग्य लाभतें. देवाचें ध्यान करणें व त्याची मानसिक पूजा करणें ह्यामार्गाला "योग अथवा सखामार्ग" असें नांव आहे. तो मार्ग अनुसरणाऱ्या मुमुक्षूला "सारुप्य" म्हणजे देवाच्या स्वरूपाची प्राप्ति होते. आध्यात्मिक ज्ञानमार्गाला 'सन्मार्ग' असें नांव असून त्या मार्गाचे अवलंबन करणाऱ्याला 'सायुज्य' पदवी प्राप्त होते म्हणजे भक्त देवाशीं संपूर्णपणें समरस होऊन जातो. ह्या पुरातन शैवसंतांत १) तिरुनावुक्करसु अथवा वागीश अथवा अप्पर, २) तिरुज्ञान संबंधर, ३) सुंदरमूर्ति, ४) माणिक्कवाचकर असे चार प्रमुख संत होऊन गेले. त्यांना ह्या पुरातन शैवसंतांचे 'चार समयाचार्य' असें म्हणतात. हे चार आचार्य अनुक्रमें वर वर्णन केलेल्या चार मोक्षमार्गांचे अध्वर्यु म्हणून मानले जातात. या चार समयाचार्या शिवाय तामिळ शैवधर्माचे मूळ अध्वर्यु 'तिरुमूलर' 'व्याध कणप्पा' 'नंदनार' कारैकल अम्मर वगैरे संतही प्रख्यात आहेत.

## पुरातन संतांचें धार्मिक वाङमय

आपल्या आराध्य देवतेला आळविण्याकरतां ह्या संतांनीं रचलेलीं कवनें व

त्यांची चरित्रें बारा प्राचीन प्रख्यात तामिळ ग्रंथांत ग्रंथित केलेलीं आहेत. ह्या सर्व ग्रंथांच्या संकलनाला 'तिरुमुरै' असें म्हणतात. वर नमूद केलेल्या पहिल्या तीन आचार्यांची कवनें पहिल्या सात ग्रंथांत समाविष्ट झालीं आहेत. ह्यांना 'देवारम्' असें नांव आहे. माणिक्कवाचकर यांच्या कवनांच्या ग्रंथाला 'तिरुवाचकम्' असें नामाभिधान आहे. मूळ शैवसंत तिरूमूलर यांच्या कवनसंकलनाला 'तिरुमंदिरम्' असें संबोधतात. या सर्व शैवसंतांचीं चरित्रें 'पेरियापुराणम्' नामक ग्रंथांत ग्रंथित केलीं आहेत. हा ग्रंथ अनपाय चोळ नांवाच्या राजाचा मंत्री 'सेक्किरार' यानें संत सुंदर व नंबी – आंवार – नंबी यांनीं यापूर्वी लिहिलेल्या ग्रंथांच्या आधारानें लिहिले आहे. बाकीच्या दोन ग्रंथांत इतर शैव संतांचीं कवनें नमूद केलीं आहेत.

भगवान शंकराला आळवण्याकरतां या संतांनीं रचलेलें कवन वाङ्मय धार्मिक दृष्टीनें इतके उत्कृष्ठ व श्रेष्ठ दर्जाचें आहे कीं तामिळ लोंक त्याला वेदा इतकेंच पूज्य मानतात. त्यामुळें त्याला तेथें पंचम वेद असे नामाभिधान प्राप्त झाले आहे. कर्नाटकाच्या शिवशरणांच्या वचन साहित्याशीं अथवा महाराष्ट्र संतांच्या 'अभंग वाङमयाशी याची तुलना करतां येईल. पाश्चात्य विद्वान डॉ. पोप, सर चार्लस इलियट, बर्नेट वगैरे विद्वानांनीं ह्या कवन साहित्याची फारच प्रशंसा केली आहे. अत्युत्कट भक्तिरसानें व देवावरील आत्यंतिक प्रेमानें ओतप्रोत भरलेलें असलें उत्कृष्ट भक्तिमार्गीय वाङमय आपण जगांतील इतर कोणत्याही धार्मिक वाङमयांत पाहिलेलें नाहीं असें प्रशंसोद्गार त्यांनीं काढले आहेत. द्रविड देशांतील प्राचीन राजेरजवाडयांनीं ह्या कवनांना राग - ताल - लयबद्ध स्वरूप देववून तीं निरनिराळ्या शिवमंदिरांत नित्यनेमानें गाण्याकरतां गायकांना वर्षासनें नेमून दिलीं आहेत. प्राचीन व अर्वाचीन तामीळ कवींनीं व ग्रंथकारांनीं हृया कवन साहित्यावर मुबलक ग्रंथरचना केली आहे तसेंच हृया साहित्याचे इंग्रजो व इतर भाषांत अनुवाद झाले आहेत.

## पुरातन शैवसंत व वीरशैव शिवशरण.

बाराव्या शतकांत उदयास आलेल्या श्री बसवेश्वरादि शिवशरणांना हे पुरातन शैवसंत गुरूस्थानीं होते असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यांनी आपल्या जीवनांत त्यांचाच आदर्श आपल्या दृष्टिपुढे ठेवला होता. आपल्या वचनांत ठिक– ठिकाणीं त्यांनीं त्यांचा 'आद्यरू, प्रमथरू, पुरातनरू' अशा आदरयुक्त नांवानें व

पूज्य बुद्धीनें उल्लेख केला आहे. श्री बसवेश्वरांच्या काळानंतर होऊन गेलेल्या अनेक वीरशैव संतांनीं व कवींनीं त्यांच्या चरित्रावर ग्रंथरचना केली आहे. त्यांत आद्य वीरशैव कवी हरिहर यांचे 'रघटा प्रबंध' व प्रख्यात संत व कवि निजगुण शिवयोगी यांचे "त्रेसष्ट पुरातनर त्रिविधि" हे ग्रंथ प्रमुख आहेत. अलीकडील कांहीं वीरशैव कन्नड ग्रंथकारांनींही 'पेरिया पुराणम्'चे कन्नड मध्यें अनुवाद केले आहेत. मराठी भाषेंत ह्या तामिळ शैव वाङमयाचे अनुवाद झालेले आढळून येत नाहीं. वीरशैव धर्मीय लोक ह्या तामिळ शव संतांना अत्यंत पूज्य मानतात व आपल्या धर्माच्या शिवशरण संतावरोबर त्यांचीही पूजा अर्चा करुन त्यांचे उत्सव मोठ्या समारंभानें साजरे करतात.



लेखांक ८

# कै. दे. भ. श्री. नानासाहेब बामणगांवकर यांच्या पुण्यस्मृतीस आदरांजलि

(सन १९६५ जुलै महिन्याच्या बामणगांवकर विशेषांकांतील संपादकीय लेख)

दि. ८ जुलै रोजीं कै. ना. रा. उपाख्य नानासाहेब बामणगांवकर यांची चौथी पुण्यतिथी आहे. सुमारें अर्धा शतकाचें आपलें अखंड व खडतर सार्वजनिक जीवन संपवून चार वर्षामागें ह्याच दिवशीं आम्हां सर्वांना दुःख सागरांत लोटून ते शिवैक्य झाले. नानासाहेबाच्या देशकार्याविषयीं व त्यांच्या समाजसेवेविषयीं निदान महाराष्ट्रीय वीरशैवांना तरी निराळे सांगण्याची जरूरीं नाहीं. घरची गरीबी असली तरी कर्तेसवरते झाल्यावर भरपूर धनदौलत मिळवून मागाहून देशकार्याला वाहून घेणारे अनेक देशभक्त आपणाला माहीत आहेत. परंतु संपत्ति संपादनाची शक्ति अंगीं असतांनाही त्याकडे दुर्लक्ष करून गरीबीचें खडतर व्रत स्वीकारून देशकार्याला व समाजसेवेला आपलें सारें आयुष्य अर्पण करणारे महाभाग क्वचितच आढळून येतात. नानासाहेब अशा तुरळक महाभागांपैकीं एकटे होते हें आम्हां सर्वांना अभिमानास्पद आहे. अशा महानुभावाच्या पुण्यतिथी दिवशीं त्यांना आदरांजली वाहणें आपणां सर्वांचें कर्तव्य आहे. यास्तव आमच्या मासिकाची विशेषांकरूपी आदरांजली आम्ही त्यांच्या पुण्यस्मरणाला अत्यंत प्रेमानें व आपुलकीनें अर्पण करीत आहों.

## कै. बामणगांवकरांचें संक्षिप्त चरित्र.

नानासाहेबांच्या मित्रांनीं व चहात्यांनीं रेखाटलेलें त्यांचें आदर्श जीवनचरित्र याच अंकांत इतरत्र दिलें आहे. त्याच्यावरून त्यांनीं केलेल्या निःस्वार्थी देशसेवेची व अमोलिक समाज सेवेची कल्पना येते. कोणत्याही संकटाला धैर्यानें तोंड देऊन प्राप्त परिस्थितींत समाधान मानून घेण्याची त्यांची मनःप्रवृत्ति त्यांच्या चरित्रांत ठळकपणें दिसून येतें. बालपणापासूनच सार्वजनिक कार्याकडे त्यांचा ओढा असल्यामुळें व लाल-बाळ-पाल या देशभक्तांचें आदर्श जीवन त्यांच्या दृष्टीपुढें असल्यामुळें पूर्ववयांतच म्हणजे आपल्या वयाच्या १९ व्या वर्षींच त्यांनीं देशसेवेचें अभिधाराव्रत अंगिकारून सार्वजनिक जीवनांत उडी घेतली. नानासाहेबांचा पिंड मुख्यतः लेखकाचा असल्यामुळें व त्यावेळच्या केसरी पत्राचा आदर्श त्यांचे डोळे दिपवीत असल्यामुळें त्यांची ही उडी प्रथम वृत्तपत्र क्षेत्रांत पडणें साहजिकच होतें. त्यांनी 'तरूण हिंद' नांवाचें पत्र सुरू करून त्या मार्फत देशसेवेच्या व लोक जागृतीच्या कार्याला प्रारंभ केला. परंतु त्या वेळची देशसेवा म्हणजे बंदिवास ठरलेलाच. पण भारत मातेच्या पायांतील बेडया तोडण्याकरतां स्वतःच्या पायांत बेडया अडकवून घेण्यास त्यांची तयारी होती. म्हणूनच त्याकरतां, बंदिवास भोगावा लागला तरी त्यांनीं देशसेवेचे व वृत्तपत्र व्यवसायाचें आपलें सतीचें वाण न सोडतां त्यांनीं हा व्यवसाय या ना त्या रूपांत आमरण चालविला. साहित्याच्या इतर क्षेत्रांतही त्यांनी कीर्ति कमविली. परंतु आज आम्हाला त्यांचें जें पुण्यस्मरण होतें तें त्यांच्या निःस्वार्थी देशसेवेमुळें व अत्यंत कळकळीच्या समाज सेवेमुळें. त्यांनीं आपल्या हयातींत आपल्या वीरशैव समाजाची सेवा करून त्याला जें मार्गदर्शन केलें तें प्रत्येक वीरशैवांच्या हृदयांत चिरकाल टिकून राहील यांत संशय नाहीं.

## तत्कालीन वीरशैव समाज

त्यांच्याकाळीं महाराष्ट्रीय वीरशैव समाजाची परिस्थिती अत्यंत शोचनीय होती. ती परिस्थिती आज फारशी सुधारली आहे असे नाहीं. परंतु त्याकाळच्या मानानें आजची परिस्थिती किती तरीं बरी. त्याकाळीं वीरशैव समाजपुरुषाला जडलेला रोग म्हणजे तथाकथित आचार्यपक्ष व विरक्तपक्ष ह्यांचें मतभेद व भांडणें. हा मतभेद एवढ्या विकोपाला गेला होता कीं एकमेकांनीं एकमेकांची निंदा–नालस्ती करणें, शिवीगाळी व तंटेबखेडे करणें व कोर्टांत एकमेकांवर खटले भरणें हा कांहीं जणांचा नित्याचा उद्योगच झाला होता. तसेंच

उभ्या आयुष्यांत कोणत्याही धार्मिक अथवा समाज कार्याला एक दमडीही न देणाऱ्या कांहीं श्रीमंत सज्जनांनीं (?) ह्या विधायक (?) समाज कार्याकरतां ईर्षेला पडून पाण्यासारखा पैसा अनाठायी व व्यर्थ खर्च केला. ह्या कांहीं पक्षांध लोकांनीं स्वत.ची प्रतिष्ठा वाढविण्यासाठीं आपणा सर्वांना पूज्य असलेले पूज्यपाद जगद्गुरु पंचाचार्य व महात्मावसवेश्वर यांची विनाकारण दुष्प्रवृत्तीपूर्ण निंदानालस्ती करून त्यांच्या धवल चारित्र्यावर गलिच्छ शितोडे उडविण्यासही कमी केलें नाहीं. नशीव त्यावेळच्या वीरशैव समाजाचें कीं तो अशाही विकट परिस्थितींत टिकून राहिला. याशिवाय वीरशैव समाजांतील उपजातीचें खूळही शिगेला पोहोचलें होतें. उच्चनीच भावनेमुळें त्यांच्यांत परस्परावद्दल द्वेष, मत्सर व तिटकारा वाढलेला होता. एकाकाळीं एक जिनसी असलेला ह्या समाज दुभंगून त्याचे तुकडे तुकडे झाले होते. या सर्व कारणामुळें ह्या समाज त्यावेळीं इतर लोकांच्या निंदेस व तुच्छतेस पात्र झाला होता. समाजाची ही शोचनीय स्थिती पाहून नानासाहेबास अत्यंत दुःख झालें. त्यांनीं ह्या सर्व दुःखद परिस्थितीवर परिणाम कारक तोडगा शोधून काढण्याकरतां सखोल विचार केला व सर्व शास्त्रें धुंडाळली. शेवटीं त्यांना ह्या तोडगा आपल्या धर्माचा मूलभूत सिद्धान्त लिंगदीक्षा अथवा शिवसंस्कार यांत सापडला. ह्या वावतींत त्यांचे विचार त्यांनीं आपल्या 'स्मृतिग्रंथाचा वीरशैवांना आधार' नांवाच्या लेखांत उद्धृत केले आहेत. त्या लेखातील महत्वाचा भाग आम्ही या अंकांत इतरत्र "वीरशैव समाज संघटनेचा मूलभूत व एकमेव सिद्धान्त लिंगदीक्षा अथवा शिवसंस्कार" या शीर्षकाखाली दिला आहे. नानासाहेबांनीं त्या लेखांत मांडलेले विचार शास्त्रोक्त, तर्कशुद्ध व मननीय असून आजच्या परिस्थितींतही ते आम्हाला अनुकरणीय व मार्गदर्शक आहेत.

वस्तुतः नानासाहेबांनीं ह्या लेखांत मांडलेला सिद्धान्त नवीन आहे असें नाहीं. "लिंगदीक्षा घेतलेला प्रत्येक मनुष्य वीरशैवच आहे. लिंगदीक्षा घेण्या-पूर्वी त्याची जात, गोत, वर्ण वगैरे कांहीं असलें तरी लिंगदीक्षा झाल्यावर त्यानें तें सर्व विसरलें पाहिजे. तसेंच लिंगदीक्षा झालेल्या वीरशैवामध्यें कोणत्याही रीतीनें भेदभाव न करतां आपण सर्व एकाच मातेची लेकरें आहोंत असें समजून परस्पर बंधुभावानें वागले पाहिजे" असा सिद्धान्त आहे.

आपले प्रमाण धर्मग्रंथ शैवागम, सिद्धान्त शिखामणि व श्रीवसवेश्वरादि शिवशरणांचें वचनशास्त्र ह्यांत ह्या सिद्धान्त स्पष्टपणें मांडला गेला आहे हें त्या

ग्रंथांतून उद्धृत केलेल्या खालील श्लोकावरून दिसून येईल.

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्रा ये च अन्यजातयः ।
लिंगधारण मात्रेण शिव एव न संशयः ।।

पारमेश्वरागम पटल १ श्लोक ५८.

अर्थः ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र अथवा इतर कोणत्याही जातीच्या लोकांनी लिंगदीक्षा घेऊन लिंगधारण केल्यानंतर ते सर्व शिवच (वीरशैव) होत, यांत कांहीं संशय नाहीं.

शिव संस्कार युक्तेषु जातिभेदो न विद्यते ।
काष्ठेषु वन्हि दग्धेषु यथा रूपं न विद्यते ।।
तस्मात् सर्व प्रयत्नेन शिवसंस्कार संयतः ।
जातिभेद न कुर्वीत शिवभक्ते कदाचन ।।

— सिद्धान्त शिखामणि (पूर्वाश्रम निरसन स्थल)

अर्थः ज्याप्रमाणें अग्निमध्यें जळालेल्या लाकडाला कांहींच रूप राहात नाहीं, त्या प्रमाणें शिवसंस्कार (लिंगदीक्षा) झालेल्या लोकांमध्यें जातिभेदाला स्थान नाहीं. त्याकरतां शिवसंस्कारानें युक्त अशा शिवभक्तामध्यें कोणत्याही रीतीने जातिभेद मानूं नये.

न स्त्रीभेदो न पुंभेदो जातिवर्ण क्रमादिकम् ।
सर्वातीतं इदं विद्धि वीरशैव मतं मम ।।

— पारमेश्वरागम पटल ५ श्लोक ४१.

अर्थः (महादेव म्हणतात) माझ्या वीरशैव मतांत स्त्रीपुरुष भेद अथवा जाति, वर्ण वगैरे भेद नाहींत. हें वीरशैव मत त्या सर्वांच्या पलीकडचे आहे, हें जाणून घ्या.

न तत्र जाति भेदोस्ति सर्वे रुद्रस्वरूपिनः ।

— सूक्ष्मागम पटल ३. श्लोक २७

अर्थः येथें (वीरशैव धर्मांत) जातिभेद नाहीं. सर्वच शिवस्वरूपी आहेत.

श्री बसवेश्वरादि शिवशरणांनीं आपलें सर्व आयुष्य वीरशैवांतील जातिभेद नष्ट करुन त्यांच्यामध्यें रोटीबेटी व्यवहार अमलांत आणण्यांत घालविले हें सर्वश्रुत आहे. पूर्वाश्रमीचा ब्राह्मण परंतु लिंगदीक्षा घेऊन लिंगायत झालेला मधुवय्या याच्या मुलीचें, पूर्वाश्रमीचा चांभार परंतु लिंगदीक्षा घेऊन लिंगायत झालेल्या

हरळय्याच्या मुलाशीं लग्न लावून, त्यांनीं समाज सुधारणेचा उच्चांक गांठला होता ही हकीकत सर्वांना माहीत आहेच. त्यांच्या वेळीं सुद्धां आजच्या सारखे अर्धवट सुधारक व कर्मठ सनातनी होतेच. त्यांना उद्देशून श्री बसवेश्वरांनी आपलें मत स्पष्टपणें माडणारें एक महत्वाचे वचन लिहिलें आहे, तें खालील प्रमाणें आहे.

> "उंबुवदु उडुवदु शिवाचार, कोंबुवदु कोडुवदु कुलाचार एव अनाचारीय मात केळलागदु. विप्रमोदलु अंत्यज कडेयागी शिवभक्तरू वंदे यंदु कोट्टुकोंबुदु सदाचार".

अर्थः सह भोजन व एकत्र व्यवहार हा शिवाचार आहे परंतु विवाह संबंध कुलाचार (जातीचा आचार) आहे, असें घ्हणणाऱ्या लोकांचें म्हणणें मानूं नका. ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंतचे सर्व शिवभक्त (लिंगदीक्षा झालेले) एकच समजून त्यांच्याशीं विवाह संबंध करणें हाच खरा सदाचार"

## वीरशैव समाज संघटना

वरील सर्व विवेचनावरून वीरशैव धर्मांत जातिभेदाला अथवा उच्चनीच भावनेला मुळींच स्थान नाही हें स्पष्ट आहे. वीरशैव समाजाची घटनाच मुळीं जन्मजातीवर नसून लिंगदीक्षा संस्कारावर व समानता, ऐक्य, परस्पर बंधुभाव ह्या उदात्त तत्त्वांवर उभारलेली आहे. म्हणून कोणीही वीरशैव, तथाकथित आचार्यपंथीय असो अथवा विरक्तपंथीय असो, त्या सर्वांनांच वरील धर्मग्रंथ प्रमाणभूत असल्यामुळें त्यांत नमूद केलेला लिंगदीक्षेचा मूलभूत सिद्धान्त सर्वांना बंधनकारक आहे. म्हणूनच कै. बामणगांवकरांनीं ह्या सिद्धान्ताला आचार्यमान्य व बसवमान्य म्हटले आहे. परंतु दुर्दैवानें हिंदु समाजांतील जातिसंस्थेचा पगडा आमच्याही समाजावर उद्योग धंद्यावरून पडत गेला व त्यामुळें कालांतरानें वीरशैव समाजांतही शीलवंत, दीक्षावंत, पंचम, चतुर्थ, कोष्टी, तेली, कुंभार परीट, गवळी वगैरे पोटजाती निर्माण झाल्या व परिणामतः त्यांच्या मध्यें उच्चनीचतेच्या भावना निर्माण झाल्या.

याप्रमाणें आमच्या धर्मशास्त्रांत जातिभेदाला व उच्चनीच भावनेला मुळींच स्थान नसले तरी 'शास्त्रात् रूढिर्बलीयसी' या न्यायानें आम्ही आज ह्या अनिष्ट व समाजघातक जातिभेदाला चिकटून राहिलो आहो. परंतु यामुळे आमचा वीरशैव समाज छिन्नभिन्न झालेला आहे. समाजामध्यें ऐक्य व संघटना

नाहीं. आधींच महाराष्ट्रांत वीरशैव समाज अल्पसंख्याक आहे. तशांत प्रत्येक पोटजातीचे लोक आपली जमात म्हणजे एक स्वतंत्र समाजच समजतात. त्यांच्यामध्यें रोटीबेटी व्यवहार होत नाहीं. त्यामुळें समाजाचा बहुभाग अज्ञानांधःकारांत खिचपत पडला आहे. समाजाच्या अशा शोचनीय व अव्यवस्थित परिस्थितीमुळें महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनांत वीरशैव समाजाला स्थानच उरलें नाहीं. ह्या आधुनिक युगामध्यें परस्पर ऐक्यांत व संघटनेंत सामर्थ्य आहे म्हणून आपल्या समाजातील पोटजातीभेदाला व उच्चनीच भावनेला मूठमाती देऊन, समानता, ऐक्य व परस्पर बंधुभाव ह्या उच्च व विशाल तत्त्वांवर साऱ्या समाजाची संघटना करून, तो एकजिनसी समाज केल्याशिवाय त्याची उन्नति होणार नाहीं. सुदैवानें समाजाच्या सुशिक्षित व पुरोगामी विचाराच्या लोकांत पोटजातीचीं बधनें शिथिल पावत आहेत. परंतु समाजाच्या कांहीं भागांत, विशेषतः ग्रामीण भागांतील अज्ञजनतेंत, ह्या अनिष्ट रूढी दवा धरून बसल्या आहेत. अशा ठिकाणीं योग्य प्रचार करून तेथेंही त्यांना मूठमाती देणें समाजहिताच्या दृष्टीनें आवश्यक आहे. अशा समाज संघटने करतां प्रयत्न करणें प्रत्येक वीरशैवाचें कर्तव्य आहे. ह्या उदात्त समाजकार्याची जबावदारी मुख्यतः आमच्या समाजाचे धर्मगुरू व समाज कार्यकर्ते ह्यांच्यावर आहे. त्यांनीं निःपक्षपात बुद्धीनें, कळकळीनें व सहानुभूतीच्या दृष्टीनें सतत प्रयत्न केल्यास हें ध्येय साध्य होण्यास विलंव लागणार नाहीं. त्याप्रमाणें ते आपले कर्तव्य बजावतील व सर्व वीरशैव त्यांना ह्या समाज संघटनेच्या कार्यात सहाय्य, सहकार करून तेही आपल्या कर्तव्याला जागतील अशी आम्ही आशा करतो.

### राष्ट्रसेवा व समाजसेवा.

कै. बामणगांवकरांचें जीवन चरित्र दुसऱ्या एका महत्वाच्या बावतींत आम्हाला अनुकरणीय व मार्गदर्शक आहे. राष्ट्रसेवा व समाज सेवा ही परस्पर विरोधी आहेत अशी आपल्यापैकी काहीं कार्यकर्त्यांची समजूत आहे. परंतु ही समजूत अगदीं चुकीची आहे. कै. बामणगावकरांनीं ह्या दोनही क्षेत्रांत अंतःकरण पूर्वक, मनोभावानें व एकनिष्ठेनें कार्य केलें आहे व तें सुद्धां अत्यंत निःस्वार्थ बुद्धीनें. त्यामुळें या दोनही क्षेत्रांत ते सारखेच लोकप्रिय झाले होते. त्यांच्या ह्या प्रत्यक्ष आचरणावरूनच आपणाला दिसून येईल कीं वस्तुतः ह्या दोनही क्षेत्रांत परस्पर विरोध नाहीं. मात्र राष्ट्रसेवेचें क्षेत्र व समाजसेवेचें क्षेत्र यांच्यामध्यें गल्लत केल्यामुळेंच कांहीं कार्यकर्त्यांच्या मनांत गोंधळ माजतो. आपल्या धर्मांचा प्रचार करणें, आपल्या समाजांतील अनिष्ट रूढी नष्ट करणें, आपल्या समाज बांधवांत

करण्यांत आपलें सर्व आयुष्य वेंचलें, हें त्याच्या वचनं काव्यावरून स्पष्टपणें कळून येतें. परंतु ही विरक्तदीक्षा कोणी दिली, त्याचे गुरू कोण हें ही कळत नाहीं. सारांश, सुप्रसिद्ध कन्नड कवि बेंद्रे (अंबिकातनय) यांनीं त्याच्याबद्दल काढलेल्या उद्गारांत म्हटल्याप्रमाणें 'सर्वज्ञाची जात मानवजात, त्याचा पंथ देवपंथ, व त्याचा काळ सर्वकाळ' असें मानणेंच योग्य होईल.

'सर्वज्ञ' गौरवपर नांव.

त्याच प्रमाणें सर्वज्ञ हें त्याचें मूळ नांव नव्हे. पाळण्यात ठेवलेलें त्याचें नांव काय होते कळत नाहीं. परंतु त्याची कीर्ति लोकांत पसरूं लागली त्यावेळीं तो 'सर्वज्ञ' या नांवानेंच प्रसिद्ध झाला. सर्वज्ञ म्हणजे सर्व जाणणारा असा त्याचा अर्थ नसून, आपण प्रत्येकाकडून ज्ञानाचे कण मिळवून ज्ञान संपादन केलें म्हणून आपणाला सर्वज्ञ हें नांव प्राप्त झालें आहे असा त्यांनीं आपल्या वचनांत त्याचा खुलासा केला आहे. परंतु ही त्याची विनयशीलता आहे. त्याच्या एकंदर काव्य संग्रहात एवढें तात्त्विक व व्यावहारिक ज्ञान भरलेलें आहे कीं त्याला लोकांनीं सर्वज्ञ म्हणजे सर्व जाणणारा असें दिलेलें गौरवयुक्त नांव अगदीं अन्वर्थक आहे, असें दिसून येतें. तसेंच त्यानें आपल्या वचनांत एवढ्या विविध विषयांची चर्चा केली आहे कीं त्या बाबत कन्नड भाषेंत एक सुभाषितच रूढ झालेले आहे. 'जगांत शेळी न शिवलेलें झाड नाहीं व सर्वज्ञानें न चर्चिलेला विषय नाहीं,' असा त्याचा अर्थ आहे. आध्यात्मिक व धार्मिक क्षेत्रांतील विविध विषयांचें विवेचन, तत्त्वज्ञान, योग, षट्स्थल ज्ञान, नवविधा भक्ति, ब्रह्म, माया, सृष्टिक्रम, वगैरे गहन व गूढ विषयांचें सामान्य जनतेला समजेल अशा सोप्या व सरळ भाषेंत केलेलें विवरण, सत्य, अहिंसा दया, क्षमा, कुलधर्म, शेजारधर्म, दानपद्धति, राजनीति, वगैरे नैतिक मूल्यांची चर्चा, राष्ट्रोन्नतीचे व समाजोद्धाराचे कार्यक्रम, शिक्षणाचें महत्व, जाति-अस्पृश्यता सारख्या अनिष्ट रूढींचे खंडन, शेती, चरखा वगैरे ग्रामीण उद्योग धंद्याविषयीची चर्चा वगैरे गहन व महत्वाच्या विषयांच्या विवेचनापासून तों तहत ग्रामीण जीवनाशीं निगडित असलेलें वैद्यकीय ज्ञान, आहार विज्ञान, खाण्यापिण्याचे व झोपण्याचे नियम, ग्रामीण भागांतील विविध वर्गाच्या लोकांच्या जीवनांतील गुणदोष व वर्णन, दुष्ट व ढोंगी लोकांचे खंडन, पतिपत्नी, पितापुत्र, सगेसोयरे, गुरुशिष्य, वगैरे लोकांच्या परस्पर संबंधाविषयीचे नियम, स्त्रियांच्या विविध विषयांचे विवेचन पाहिलें तर वरील सुभाषित यथार्थ आहे, असे म्हणावयास हरकत नाहीं.

सर्वज्ञाचा स्वभाव व व्यक्तिवैशिष्ट्य.

सर्वज्ञ जात्या करारी, निस्पृही, स्पष्टवक्ता, बाणेदार व स्वातंत्र्यप्रेमी होता. लहानपणींच त्यानें आईबापास दिलेल्या खडतुंड उत्तरावरून त्याच्या करारी व निस्पृह स्वभावाची कल्पना येते. आध्यात्मिक क्षेत्रांत त्याला जीवन मुक्तीचे व निष्कामकर्मयोग्याचें अत्युच्च स्थान प्राप्त झालें होतें. व समाजोद्धारांतच त्यानें आपलें सर्व आयुष्य कंठलें. असें असलें तरी त्यानें आपल्या वचनांत कोठें ही प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष आपल्या स्थानाचे अथवा कार्याचे गोडवे गाइले नाहींत. उलटपक्षीं हीनकुळाची आपली जन्मकथा मात्र आपल्या वचनांत स्पष्टपणें मांडण्यास त्यानें मागें पुढें पाहिलें नाहीं. याच्याप्रमाणें आपल्या आयुष्यांतील अनिष्ट घटना स्पष्टपणें जनतेपुढें मांडणारा कवि अथवा लेखक विरळाच. त्याचप्रमाणें तो स्वातंत्र्यप्रेमीही होता. जगांत स्वातंत्र्यापेक्षां दुसरी कोणतीही श्रेष्ठ वस्तू नाहीं असें त्यानें आपल्या वचनांत म्हटलें आहे. अर्थात् त्याच्या काळीं कर्नाटकांत विजयनगर सम्राटाचेच राज्य होतें. त्यावेळीं सुबत्ता नांदत होती. यामुळे त्यावेळीं राजकीय स्वातंत्र्याचा प्रश्नच नव्हता. परंतु धार्मिक, सामाजिक व वैयक्तिक स्वातंत्र्यावर घाला घालणाऱ्या अनेक अनिष्ट रूढींचें त्यानें कठोर रीतीनें खंडन केलें आहे. त्याचें स्वत.चें वर्तनही बाणेदार व स्वातंत्र्यप्रेमी होते. तो कधींही कोणाच्या आश्रयास राहिला नाहीं अथवा कोणाचा मिंधा बनला नाहीं. एवढेंच नव्हे तर विरक्तस्वामींच्या नियमा प्रमाणें तो कोठेंही जास्ती वेळ राहात नसे. त्याची राहणीही अत्यंत साधी होती. एक लंगोटी व पांघरण्यास अंगावर एक कांबळ्याचे लक्तर व हातांत एक भिक्षापात्र या शिवाय त्याच्या जवळ दुसरे कांहींच नव्हतें. आपल्या कळपाची चुकामूक झाल्यामुळें हत्ती एकटाच रानावनांत फिरावा त्याप्रमाणें मी सर्वसंगपरित्यागी होऊन एकटाच गांवोगावीं व देशोदेशीं भटकत आहे. परंतु त्यामुळें मला गांवोगांवीं, गल्लोगल्लीं हजारों मित्र व आप्त प्राप्त झाले आहेत, असें त्यानें आपल्या प्रवासाचें वर्णन केले आहे. यावरून तो ब्रह्मचारी व स्वातंत्र्य प्रेमी संन्यासी असला तरी माणूसद्वेष्टा नव्हता, हें स्पष्ट आहे. एवढेंच नव्हे तर तो सामान्य जनतेच्या जीवनाशीं एवढा समरस झाला होता कीं तो जेथें जाई तेथील लोक मोठ्या आनंदाने व उत्साहानें त्याचें स्वागत करीत व तो तेथें असेपर्यंत त्याचा मानमरातब व व्यवस्था करीत. परंतु लोक आपणावर एवढे प्रेम करतात म्हणून त्यांचे दोष झांकण्याचा अथवा त्याकडे कानाडोळा करण्याचा त्यानें कधीही प्रयत्न केला नाहीं. उलट तो समाजातील अथवा समाजांतील निरनिराळ्या वर्गांच्या व धंद्याच्या लोकांचे गुणदोष स्पष्टपणें व निर्भीडपणें दाखवून त्यांना सुधारण्याचा प्रयत्न करी. परंतु असें करण्यांत त्याच्या मनांत त्यांच्याबद्दल द्वेषाची अथवा तिरस्काराची भावना नसून आईबापांनीं

आपल्या मुलांची कानउघडणी करावी त्यांप्रमाणें प्रेममय व वात्सल्यपूर्ण शद्वांत तो त्यांना उपदेश करी. ज्याप्रमाणें तो दुराचारांचे व ढोंगी जनांचे खंडन करीत असे त्याचप्रमाणे समाजातील सद्‌गुणी व सदाचारी लोकांची पाठहीं थोपटीत असे. या वावतीत श्रीमंत–गरीब उच्च–नीच, ब्राह्मण–हरिजन, स्पृश्य–अस्पृश्य असा कोणताच भेदभाव तो करीत नसे. त्यामुळें त्याच्या वद्दल लोकांचा गैरसमज न होतां उलट त्याच्यावद्दल त्यांचा आदरभाव वाढे.

**सर्वज्ञाची वचनें अथवा काव्य.**

सर्वज्ञ श्रेष्ठ दर्जाचा व लोकप्रिय कवि असला तरी त्यानें कोणताही काव्यग्रंथ लिहिलेला नाहीं. देशसंचार करतेवेळीं आपणास आलेल्या अनुभवावरून त्यानें स्फुट कवनें रचलेलीं आहेत. हीं कवनें त्यानें 'त्रिपदि' वृत्तांत रचलीं आहेत. हें वृत अत्यंत लहान व काव्यरचना करण्यास साधें व सोपें आहे. साधारणतः मराठी भाषेतील अभंग वृत्ताशीं त्याची तुलना करतां येईल. तसेंच सर्वज्ञानें वापरलेली भाषा अत्यंत साधी व घरगुती असल्यामुळें अशिक्षित खेडुतांनासुद्धां ती समजण्यासारखीं आहे. वाराव्या शतका पासूनच श्री वसवेश्वरादि शिवशरणांनीं आपलीं वचनें सोप्या कन्नड भाषेंत रचण्याचा पायंडा घातला होता. परंतु सर्वज्ञ त्यांच्याही पुढें जाऊन त्यानें आपली वचनें अत्यंत सोप्या व घरगुती परंतु चटकदार व ठसकेबाज भाषेंत रचली आहेत. तसेंच गहन, गूढ व वर्णनात्मक विषयसुद्धा अत्यंत समर्पक व मोजक्या शद्वांत सांगण्याची कला त्याला उत्तमरीतीनें साधली होती. त्यामुळें त्याचीं वचनें 'मूर्ती लहान पण कीर्ती थोर' ह्या म्हणीप्रमाणें छोटी असली तरी त्यांत किती तरी खोल व गंभीर अर्थ भरलेला आहे. तसेंच त्यानें आपल्या वचनांत दिलेल्या उपमा, उदाहरणें वगैरे सामान्य जनतेच्या घरगुती जीवनांतीलच असल्यामुळें तीं खेडूतांना फारच लोकप्रिय झाली आहेत. सामान्यतः त्याच्या वचनांची तुकाराम महाराजांच्या अभंगाशी तुलना करतां येईल. त्यांच्या अभंगाप्रमाणें सर्वज्ञाचीं अनेक वचनें सुद्धां कन्नड साहित्यांत व खेडुतांच्या भाषेंत सुभाषितें होऊन राहिलीं आहेत. तसेच तुकाराम महाराजांच्या प्रत्येक अभंगांत जसें 'तुका म्हणे' हें पद येतें त्याचप्रमाणें सर्वज्ञाच्या सर्व पदांत शेवटीं 'सर्वज्ञ' हें पालुपद येतें अलिकडे त्याच्या वहुतेक सर्व वचनांचा संग्रह केला गेला असून त्यांची संख्या सुमारें तीन हजार आहे, व त्यांची विविध विषयांवर विभागणी केली गेली आहे. परंतु हीं वचनें सर्वज्ञानें एखादें ठिकाणीं वसून लिहिलेली नाहींत, अथवा एखादा विषय घेऊन त्या विषयावरचीं पदें रचलीं असें नाहीं. देशसंचार करीत असतांना त्याला ज्या ज्या ठिकाणी जे जे अनुभव आले अथवा विचार

सुचलें तें सहजस्फुर्तीनें त्यांनें वचनांत ग्रंथित केले आहेत. त्यामुळें त्याच्या वचनांत विविधता असली तरी कांहीं कांहीं ठिकाणीं द्विरूक्तीचा दोष दिसून येतो. ह्या विविधतेमुळें त्याच्या काव्यांत श्रृंगार, अद्भुत, भक्ति, करुणा, वीर वगैर वहुतेक सर्व रसांचा परिपोष झाला असला तरी हास्यरस त्याच्या काव्याचा गाभा आहे. स्वतः हसून दुसऱ्यांना हसविणारी भाषाच सर्वात श्रेष्ठ असें त्यानेंच हास्यरसाचें श्रेष्ठत्त्व वर्णिलें आहे. त्याच्या काव्यामध्यें कांहीं कांहीं ठिकाणीं विडंबन व तीव्र खंडन असले तरी ह्या हास्यरसामुळें तीं लोकांना बोचक झालीं नाहींत. त्याची ही हास्यरसधारा सर्वांवर सुखदायक तुषार उडवीत त्याच्या काव्यांतून अखंड वाहात आहे. यामुळें कन्नड साहित्यांत 'सर्वज्ञ' "हास्यकवि" म्हणून प्रसिद्ध आहे. परंतु सामान्यतः आपण ज्यांना हास्यकवि म्हणून समजतो अशा कवींच्या व सर्वज्ञाच्यामध्यें जमीन अस्मानाचें अंतर आहे. हास्यकाव्य रचणें हें त्याचें ध्येय नव्हतें. लोकांना उपदेश करण्याचा व त्यांना ज्ञानाचा लाभ करून देण्याचा त्याचा मुख्य उद्देश होता. ह्या उपदेश खेडुतांना मनोरंजक व हृदयस्पर्शी होण्याच्या दृष्टीनें जेवढा हास्यरसाचा उपयोग करतां आला तेवढा त्यानें केला आहे. तसेच सामान्यतः हास्यकवि गंभीर व गहन विषयांसंबंधी काव्य लिहूं शकत नाहीं ही साहित्यकारांची सामान्य समजूतही त्यानें खोटी ठरविली आहे.

## काव्यांतील विविध विषयांचे विवेचन.

सर्वज्ञाच्या काव्यांत ग्रंथित केलेल्या विविध विषयावरील त्याच्या विचारांचें व मतांचें येथें दिग्दर्शन करणें अशक्य आहे. तसेंच त्यापैकी कितीतरी विषय सामान्य जनतेच्या जीवनाशीं निगडित आहेत. करितां त्याचें विवेचन येथें अनावश्यक आहे. परंतु त्याच्या अलौकिक व्यक्तिमत्त्वाचें व प्रासादिक काव्याचें मूल्यमापन करण्यास त्याच्या काव्यांतील प्रमुख व महत्त्वाच्या विषयांवरील त्याच्या अमोलिक विचारांचें विवेचन व दिग्दर्शन करणें आवश्यक आहे. करिता, खाली त्यांचें संक्षिप्त विवेचन केले आहे.

### जीवनमुक्त योगी

सर्वज्ञ साक्षात्कारी संत असून त्यांचे आध्यामिक विचार ज्ञान परिपूर्ण व स्वतःच्या अनुभवावर आधारलेले आहेत. तो स्वत. लिंगायत पंथी असला तरी शिवशरणाप्रमाणें त्याचे आध्यात्मिक विचार इतर धर्मीय साक्षात्कारी संतांच्या

विचारांशीं जुळणारेच आहेत. त्यानें मुख्यत: मानवधर्मांच्या तत्त्वांवरच लोकांना उपदेश केला आहे. परमात्म्याचें स्वरूप, द्वैताद्वैत विचार, योगसाधना, शिवयोग, नवविधा भक्ति, षट्स्थल ज्ञान. जीवन्मुक्ति वगैरे आध्यात्मिक विषयांचे त्याचे विवेचन पाहिलें तर तो सिद्धावस्थेला पोंचलेला एक सिद्धपुरूषच होता असें दिसतें 'नवद्वारें बंद करून शिवध्यानीं मग्न झाला तर तुम्हाला नवखंडाचें–साऱ्या जगाचें–ज्ञान प्राप्त होईल' अशा अर्थाच्या पद्यावरून व त्याचे षट्चक्र, कुंडलिनी वगैरे योगसाधनेविषयी केलेल्या विवेचनावरून त्यानें आपल्या स्वत:च्याच अनुभवाचे विचार त्यांत ग्रंथित केले आहेत, हें स्पष्ट दिसून येते. तसेंच मरणानंतर मिळणारा मोक्ष अथवा स्वर्गसुख घेऊन काय करतां? याच जगीं याच जन्मीं जीवन्मुक्तीचें अक्षय सुख प्राप्त करून घ्या,' असा त्यानें केलेला उपदेश पाहिला तर तो स्वत: जीवन्मुक्तीच्या अवस्थेला पोचला होता असे दिसतें. त्याच्या आध्यात्मिक विवेचनावरून पाहतां आपल्या पूर्ववयांत त्यानें शास्त्राभ्यास करून अनेक धर्मगुरूशीं व विद्वानाशीं चर्चा केली असलीं पाहिजे. परंतु त्याची माहिती त्याच्या काव्यांत मिळत नाहीं. त्याच्या आध्यात्मिक ज्ञानाचे मनन केले तर तो सिद्धावस्थेला पोचलेला सिद्धयोगी असून गीतेंत वर्णिलेल्या कर्मयोग्याप्रमाणें तो जगाच्या उद्धाराकरतां देशसंचार करणारा जीवन्मुक्त कर्मयोगी होता, असें दिसून येतें. तसेंच त्याच्या एकंदर विचारसरणीवरून श्री बसवेश्वरादि शिवशरणांच्या पवित्र जीवन चरित्रांचा व त्यांच्या वचनांचा त्याच्या मनावर विशेष परिणाम झाला असला पाहिजे, असें दिसतें. 'बसवेश्वरांचें नुसतें नांव घेतलें तरी सर्व पापें पळून जातात.' असें त्यांच्याबद्दल अत्यंत पूज्य व गौरवयुक्त उद्गार त्यानें काढले आहेत. तसेंच वीरशैव धर्माच्या षट्स्थल सिद्धान्तावर ही त्याचा पूर्ण विश्वास होता. 'षट्स्थल सिद्धान्ताचें मर्म स्पष्टपणें समजून घेऊन निष्ठेनें त्या प्रमाणे वागल्यास याच जन्मांत तुम्हाला मुक्ति मिळेल' असे त्यानें एका वचनांत म्हटलें आहे. एकंदरीत त्याचें जीवन एका आदर्श शिवयोग्याचें जीवन होतें यांत तिळमात्र संशय नाहीं.

### राष्ट्राचा आधारस्तंभ असलेल्या शेतकऱ्यांचा वाली.

भारताच्या इतर कोणत्याही प्राचीन कवींच्या अथवा संतांच्या साहित्यांत न चर्चिलेला राष्ट्रपोषक शेती व ग्रामीण उद्योग हा विषय सर्वज्ञानें यथार्थ स्वरूपांत हाताळलेला पाहून त्याच्या राष्ट्रीय विचारांचें कौतुक करावें तितके थोडेंच आहे. सर्वज्ञ सामान्य कवि नसून दार्शनिक कवि व संत होता. भारत शेती प्रधान देश आहे. त्याकरतां त्याची विशिष्ट परिस्थिती लक्षात घेऊन त्याच्या प्रगतीच्या कार्यक्रमांत शेती व चरखा यांना मुख्य स्थान दिले पाहिजे, हें ह्या वीसाव्या शतकांत महात्मा गांधींनीं आम्हांला दाखवून दिलें. परतु सर्वसंग

परित्यागी संन्यासी सर्वज्ञानें १६ व्या शतकांतच राष्ट्रधारणे करतां नेमका हाच उपदेश लोकांना केला होता हें जाणून लोकांना आश्चर्यच वाटेल. या बाबतीतील त्याचें कन्नड पद व मराठी अनुवाद खाली दिले आहेत.

"कोटि विद्येगळल्लि मेटि विद्येये मेलु।
मेटियिंदराटि नडेवुदल्लदे। देशदाटवे केडकु सर्वज्ञ॥"

मराठी अनुवाद:– 'कोटयावधि विद्येमध्यें शेती विद्याच सर्वश्रेष्ठ आहे. शेतीनेंच चरखा चालतो. हे (दोन्ही उद्योग) नसतील तर देशकार्याला खीळ बसेल.'

याच्यावरून त्यावेळीसुद्धां त्यानें राष्ट्रोन्नतीच्या कार्यांत ह्या दोन उद्योगांचें महत्व जाणलें होतें हें स्पष्ट आहे. त्याचें हे महत्त्वाचें पद्य कन्नड भाषेंत सुभाषित होऊन राहिले आहे. एवढेंच नव्हे तर कर्नाटकच्या अनेक शेतकी व औद्योगिक प्रदर्शनांत तें प्रमुख ठिकाणीं ठळक अक्षरात कोरलें जातें. तसेंच त्यानें या विषयाचें महत्व अगदीं मोजक्या शब्दात व साध्या भाषेंत कसें परिणाम कारक रीतीनें दाखविलें आहे तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्याची बहुतेक वचनें अशींच आहेत. शेती संबंधीची त्याची आस्था नुसती तात्विक नसून त्याला शेतीधंद्याचे संपूर्ण ज्ञान होतें, असें त्याच्या वचनांवरून आढळून येतें तसेंच शेतकऱ्यांच्या सर्वांगीण जीवनाचें सूक्ष्म निरीक्षण करून व त्याचे गुणदोष त्यांना दाखवून त्यांना सुधारण्याचा प्रयत्नही त्यानें केला आहे.'बैलाशिवाय शेती करणारा शेतकरी हा सैन्य नसलेल्या राजासारखा अथवा शीर नसलेल्या धडा सारखा आहे,' असें त्यानें म्हटलें आहे. तसेंच "घरांत एक बैलजोडी, भरपूर दूधदुभतें, पांच पुत्र व आज्ञाधारक पत्नी असलेल्या शेतकऱ्यासारखा सुखी प्राणी जगांत दुसरा कोणीच नाहीं," असें आदर्श व सुखी शेतकऱ्यांचें बहारदार वर्णन त्यानें केलें आहे. याच्या उलट परिस्थिती असल्यास शेतकऱ्यांच्या घराण्याची कशी धूळधाण उडते याचेंही वर्णन त्यानें कांहीं वचनांत केले आहे. तसेंच त्यानें उद्योगी व सदाचारी शेतकऱ्यांवर स्तुतिसुमनें उधळलीं आहेत, तर त्याच वेळीं आळशी व दुष्ट प्रवृत्तीच्या शेतकऱ्यांवर कोरडेही ओढले आहेत.

एकंदरींत पाहतां तो शेतकऱ्यांचा वाली होता हें निःसंशय. 'तुम्हाला सुखानें राज्य करावयाचें असेल तर प्रथम शेतकऱ्यांना सुखी करा.' असें त्यानें राज्यकर्त्यांनाही बजावले आहे. श्री नामदेव, संत तुकाराम महाराज वगैरे संत

ग्रामीण जीवनच जगले. परंतु त्यांनीं ग्रामीण जनतेचे प्रापंचिक व व्यवहारिक प्रश्न हाताळलेले दिसत नाहींत. ह्याचरावरून सर्वज्ञाचें हें महत्वाचें वैशिष्ठ्य पाहून कोणालाही त्याचें कौतुक वाटेल.

**विद्येचे महत्व.**

ग्रामीण जनतेचा दुसरा महत्वाचा प्रश्न म्हणजे शिक्षण. हिंदु समाजांतील तथाकथित उच्चवर्गांच्या आपमतलबी धोरणामुळें बहुजन समाज प्राचीन काळापासूनच विद्येला वंचित होऊन राहिला. त्यामुळें हिंदु समाजाला व अखिल भारतालाही ह्या स्वार्थी व चुकीच्या धोरणाची कटु फळें पुढे भोगावीं लागली. सामान्य जनतेच्या प्रगतीला शिक्षणाची आवश्यकता कितीं आहे हें सर्वज्ञानें जाणलें होते. म्हणून तो सर्वांना प्रथम विद्यासंपादन करण्याचा उपदेश करीत होता. विद्यावंतांना समाजांत कसें मानाचें स्थान मिळतें याचें बहारदार वर्णन त्यानें आपल्या कवनांत केले आहे. असें असले तरी ग्रामीण जनतेंत शिक्षणाबद्दल असलेल्या अनावस्थेची त्याला पूर्ण जाणीव होती. म्हणून हा उपदेश त्याने थोड्याशा कडक शद्वांतच केला आहे.

"आपल्या मुलांना शिक्षण न देणारा बाप, शिष्याला ज्ञान न देणारा गुरु व आजारीपणांत आपल्या मुलांची सुश्रुषा न करणारी आई, हे त्या मुलांचे जन्माचे वैरी होत." असें त्यानें आपल्या नेहमीच्या पद्धतीनें रचलेल्या एका संक्षिप्त परंतु परिणामकारक वचनांत म्हटलें आहे.

**समानता.**

सर्वांतर्यामीं एकच परमात्मा वसत असल्यामुळें मानवामध्यें उच्चनीच वरिष्ठ कनिष्ठ असा भेद करणे पाप आहे, असे सर्वज्ञाचें स्पष्ट मत होतें. त्यामुळें त्यानें जातिभेदाचें व अस्पृश्यतेचें कठोर रीतीनें खंडन केलें आहे. तसेंच जन्माला महत्त्व न देतां गुणाला महत्त्व द्यावें असा त्याचा उपदेश होता. हीन कुळांत जन्मलेल्या अनेक ऋषींनीं आणि संतांनीं आपल्या हीनकुळीन जन्माबद्दल खेद न मानतां आपल्या प्रयत्नानें मोक्षाची प्राप्ती करून घेतली, हें त्यांचें उदाहरण दाखवून हीन मानल्या जाणाऱ्या हरिजनांना व इतर लोकांना सन्मार्गानें वागून आध्यात्मिक जीवन जगण्यास तो प्रवृत्त करीं. तसेंच उच्चनीच भेदभाव विसरून

कनिष्ठ वर्गीय लोकांशीं सौजन्यानें व समानतेनें वागण्या विषयीं उच्च वर्गीय लोकांनाही तो उपदेश करी.

## अहिंसा.

समाजांत सर्वांनीं सदाचारानें वागावें व सत्य, अहिंसा, दया, क्षमा वगैरे सद्गुणांची कास सोडू नये, वगैरे सामान्य नीतिनियमांचें त्यानें वर्णन केलें आहे. परंतु त्यांत विशेष असें कांहीं नाहीं. तथापि त्यांतील अहिंसा तत्त्वाचें त्याचें विवेचन येथें उल्लेखनीय आहे. तो स्वतः अहिंसावादी असून लोकांनाही तो त्या तत्त्वाचा उपदेश करीत होता. परंतु अहिंसा तत्त्वाच्या व्यावहारिक मर्यादेचा विचार न करतां त्याचा अतिरेक असलेल्या आचारविचारांचें अवलंबन करणाऱ्या लोकांचें त्यानें खंडन केले आहे. महत्वाची गोष्ट म्हणजे असें खंडन करतांना त्यानें सृष्टि क्रमाचा एक मौलिक विचार उद्धृत केला आहे. इतर प्राण्याप्रमाणें वृक्ष वगैरे वनस्पतींना ही प्राण असतो असें सामान्यतः आपण मानीत नाहीं. परंतु अलीकडील वैज्ञानिक संशोधनामुळें आपल्या प्रमाणेंच त्यांना सुद्धा जीव आहे, ही गोष्ट आतां कुठें समजून येत आहे परंतु सर्वज्ञाला त्याची जाणीव त्याचवेळीं होती. म्हणूनच मांसाहारी लोकाप्रमाणें शाकाहारी सुद्धां जीव हिंसा करणारेच आहेत, असें त्याचें मत होतें. तसेंच जगांतील सर्व वस्तूंत जीवाचें अस्तित्त्व असल्यामुळें जीव नसलेले पदार्थ खाऊन आपण जगतो, असें म्हणण्यांत अर्थ नाहीं, असें त्यानें स्पष्टपणें सांगितले आहे. 'जीवो जीवस्य कारणम्' हा सृष्टि नियम असून त्याचें उल्लंघन कोणी करूं शकत नाहीं. परंतु त्यामुळें आपण जीवहिंसा करीत आहो म्हणून कोणी खंत होण्याचें कारण नाहीं. कारण एक जीव जसा दुसऱ्या जीवाला खातो तसेंच कालक्रमानें आपणही मरून तिसऱ्या जीवाला जन्म देतो. याप्रमाणें जनन, पोषण व मरण हें जगाचे रहाट गाडगें अखंड चालू आहे. ही सर्व ईश्वरी लीला असून आपण सर्व त्याचें निमित्तमात्र कारण आहोत. करितां त्याबद्दल कोणी खंत वाळगण्याचें कारण नाहीं, असें तो सर्वांना सांगे. सर्वज्ञ स्वतः योगी असून सक्त शाकाहारी होता व लोकांनाही त्यानें शाकाहाराचाच उपदेश केला आहे. परंतु त्यानें कोठेंही मांसाहाराचें खंडन केले नाहीं, तसें मंडनही केलें नाहीं. अहिंसेबद्दल त्याचे उपरोक्त विचारच बहुशः त्याला कारणीभूत असतील. ह्याच्यावरून कोणतीही तत्त्वें कितीही महत्वाची असली तरी आचरणांत आणतांना व्यवहारिक दृष्टीनें त्याचा विचार केला पाहिजे, असें त्याचें मत होतें असें दिसून येतें.

## सर्वज्ञाचा व्यावहारिक मार्ग.

हीच त्याची व्यवहारिक विचारसरणी त्याच्या सर्व वचनांतून दिसून येते.

तो स्वतः ब्रह्मचारी व कडक व्रतधारी संन्यासी असला तरी लोकांना प्रपंच सोडून संन्यासी बनण्याचा त्यानें कधींहीं उपदेश केला नाहीं. प्रपंचांत राहूनच परमार्थ साधावा असा त्याचा उपदेश होता. आदर्श गृहस्थाश्रमी बनून आपल्या मुलाबाळांची योग्य जोपासना करावी, अतिथी अभ्यागताचें आदरातिथ्य करावें, सर्वांशीं प्रेमानें वागावें, शक्य तेवढी दुसऱ्यांना मदत करावी, असाच तो सर्वांना उपदेश करी. त्याचप्रमाणें प्रपंच सुरळीत चालण्यास धनाची आवश्यकता आहे. करितां कोणता तरी समाज पोषक धंदा करून स्वतःच्या श्रमानें व प्रामाणिकपणानें धनार्जन करून प्रपंच चालवावा व आपल्या प्राप्तीतून कांहीं अंश तरी सत्पात्रीं दान करावें, असेंही त्यानें सांगितलें आहे. याच्यावरून समाजोद्धाराविषयीं त्याची विचार सरणी किती व्यवहारिक होती हे दिसून येतें.

### आहार व आरोग्य विचार.

आहार व आरोग्य या विषयांचीं त्याचीं वचनें पाहिली असतां निरनिराळ्या आहारांचे गुणधर्म व आरोग्याचे नियम याची त्याला चांगली माहिती होती असें दिसतें. या बाबतींत सुद्धां त्यानें व्यवहारिक माफक नियमांचाच उपदेश केला आहे. आहार व आरोग्य यांचा निकट संबंध असून सर्वांनीं मिताहारी असावें परंतु त्याच्या करतां उपवास करण्याची जरूरी नाहीं. भूक लागली असली तर उपवासी राहूं नये. **'दिवसांतून एकदां जेवणारा योगी, दोनदां जेवणारा भोगी, व त्यापेक्षां जास्त वेळ जेवणारा रोगी,'** जेवल्यावर शतपावलें करावीं, निजतांना डाव्या कुशीवर निजावें, मद्यपान करूं नये, परंतु नीरापान रोगनाशक असल्यानें तें घेण्यास हरकत नाहीं, असे आहार व आरोग्याचे अनेक [illegible]म त्यानें आपल्या वचनांत नमूद केले आहेत. याच्यावरून सामान्य जनतेचा दैनंदिन जीवनक्रम सुद्धां सुधारण्यास तो कसा प्रयत्न करीत होता, हें दिसून येतें.

### तत्कालीन समाजाचें चित्र.

त्याच्या काव्यांतील दुसऱ्या एका बाबीचा येथें उल्लेख करणें आवश्यक आहे. त्याचे सारें काव्य ग्रामीण जीवना विषयींच असल्यामुळें व ते त्यानें आपल्या प्रत्यक्ष अनुभवानेंच लिहिले असल्यामुळें तें काव्य वाचून तत्कालीन ग्रामीण समाजाचें सविस्तर व हुबेहूब चित्र आपल्या डोळ्यापुढे उभे राहते. अशी साधार माहिती दुसऱ्या प्राचीन काव्यांत क्वचित्च मिळते. अर्वाचीन पद्धतीनें

देशाचा इतिहास लिहिण्यास अशा साधार माहितीची किती आवश्यकता आहे, हें निराळे सांगण्याची जरूरी नाहीं.

## उपसंहार.

सर्वज्ञाच्या काव्यांतील कांहीं प्रमुख विषयांचे वर विवेचन केले आहे. यावरून सर्वज्ञ हा खरोखरीच कसा सर्व-ज्ञ होता याची कल्पना येते. अशा अष्टपैलू कवीचें दुसऱ्या कवींशीं तुलना करणें अशक्य आहे. सामान्यतः कवींचे जे वर्ग पाडले जातात त्या कोणत्याच वर्गात तो बसत नाहीं. त्यानें आपला स्वतःचाच एक वर्ग (A class by himself) निर्माण केला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. कर्नाटकांत त्याच्या तोडीचे दुसरे कोणी कवी निर्माण झाले नाहींत, महाराष्ट्रांतही कोणी होऊन गेलेले दिसत नाहीं. निःस्वार्थ बुद्धीनें व निर्दाक्षिण्यानें राष्ट्राची व समाजाची सेवा करणारे सर्वज्ञासारखे कर्मयोगी संत कवि वेळोवेळीं देशांत निर्माण झाले तर लवकरच देशाचा भाग्योदय होईल यांत संशय नाहीं.

सोळाव्या शतकांत होऊन गेलेल्या या सिद्धयोगी, साक्षात्कारी, कर्मयोगी व व्यवहारवादी तत्त्वज्ञानी संताचा सामाजिक, शैक्षणिक, आर्थिक, कृषिक, औद्योगिक व राष्ट्रीय क्षेत्रांना उपयुक्त असलेला, 'सर्वज्ञ–संदेश' प्रामाणिकपणा, सचोटी, भावैक्यता, नीति, शील व सततोद्योग या उच्च अधिष्ठानावरून आचरला गेला तर देशाचें व मानव समाजाचें कल्याण झाल्याशिवाय राहणार नाहीं.



# सर्वज्ञ-संदेश

( सर्वज्ञाच्या कांहीं महत्वाच्या कवनांचा मराठी भावानुवाद )

सर्वज्ञ वर-पुत्र, नंदीवाहनाचा।
कर्नाटकी ज्याचा। डंका गाजें ॥१॥

न घर ना दार, न पुत्र न कलत्र।
परी गांवोगांवीं मित्र। जोडीयेले ॥२॥

भिक्षान्नाचें अन्न, लक्तरेंचि वसन।
अंतरीं शिवध्यान। मग्न सदा ॥३॥

जगाच्या कल्याणा, फिरे योगी राणा।
तोषवीत जना। हितोपदेशें ॥४॥

ऐशा महाभागाचा, ऐकावा संदेश।
अमृतचि खास,। सर्वालागि ॥५॥

सर्वांतर्यामी, वसे देव एक।
मानोनी अनेक। भांडूं नका ॥६॥

स्वातंत्र्याहून, नाहीं श्रेष्ठ अन्य।
करा त्याचें रक्षण। प्राणार्पणें ॥७॥

कोटि उद्योगांत, शेती–चरखा श्रेष्ठ ।
तयावीण नष्ट । देश होई ॥८॥

शेती बैलावीण, राजा दलावीण ।
धड शिरावीण । समानचि ॥९॥

शेतकरी सुखी । तरी सुख शांति ।
देशा न भीतो । कोणाचेही ॥१०॥

विद्याहीन नर । अजागळ जाण ।
तया नाहीं मान । लोकांमाजी ॥११॥

विद्या न देई पुत्रा । तो बाप नव्हे, वैरी ।
सत्य ही वैखरी । जाण बापा ॥१२॥

अंत्यज ब्राह्मण । सर्व शिवसंतान ।
कुलगोत्र जनन । मानूं नका ॥१३॥

हीनकुळीचे संत, करूनि सायास ।
जिंकिले कैलास । स्वपौरूषें ॥४१॥

सत्पात्रीं तें दान, स्वर्गाची शिदोरी ।
संतोष अंतरी । सदा राहे ॥१५॥

गुप्त दान उत्तम, बाह्यदान मध्यम ।
न देई तो अधम । वचन देवोनि ॥१६॥



लेखांक १०

# कर्नाटक लिबरल (लिंगायत) एज्युकेशन सोसायटी

(सन १९६५ आक्टोबर महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख)

वीरशैव समाजाच्या इतिहासांत सन १९०५ व १९०६ या दोन सालचा इतिहास सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा आहे. समाजाचे त्यावेळचे नेते लिं. श्री. कुमारस्वामी हानगल, कै. श्री शिरसंगीकर सरदेसाई, कै. श्री गिलगिंची, कै. श्री अर्तोळ साहेब व कै. श्री अप्पासाहेब वारद वगैरे मंडळीनीं वीरशैव समाजाच्या उद्धारार्थ 'अखिल भारत वीरशैव महा सभेची' स्थापना केली व समाजामध्यें शिक्षणाचा प्रसार करण्याच्या दृष्टीनें धारवाड येथें 'लिंगायत शिक्षण फंड' स्थापून त्याच्याकरतां लाखो रुपयांची वर्गणी जमा केली. हे नेते नुसते बोलघेवडे पुढारी नव्हते तर ते"आधी केलें मग सांगितलें" या उक्तीप्रमाणें वागणारे व आपण अंगिकारलेल्या समाजकार्याला तन-मन धनानें वाहून घेतलेले स्वार्थ त्यागी व थोर पुढारी होते. लिं. श्री शिरसंगींकर सरदेसाई या महाभागानीं तर सन १९०६ साली सुमारें साठ हजार रुपये वार्षिक उत्पन्नाची आपली सर्व जहागीरच शिक्षण कार्याला अर्पण करून नुसत्या वीरशैव समाजाला नव्हे तर साऱ्या भारताला औदार्याचा व स्वार्थत्यागाचा धडा घालून दिला. वरील नेत्यांचे अविश्रान्त श्रम व स्वार्थत्याग यांच्यामुळें वीरशैव समाजांत अभूतपूर्व जागृति निर्माण झाली. मागासलेल्या वीरशैव समाजाला आपल्या उद्धारार्थ शिक्षणाशिवाय तरणोपाय नाहीं हें जाणून, त्या नेत्यांनीं आपल्या समाजांतील गरीब पण होतकरू

विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणाकरतां मदत देण्याच्या कार्यक्रमावर भर दिला. त्यामुळें समाजांतील अनेक गरीब विद्यार्थी उच्च शिक्षण संपादन करून पदवीधर झाले. समाजोद्धारार्थ आपल्या नेत्यांनीं दाखविलेली कळकळ, स्वार्थत्याग, अविश्रान्त श्रम यांचा सुपरिणाम या तरूण व होतकरू पदवीधरांवर झाल्याशिवाय राहिला नाहीं. त्यांपैकीं कांहीं जणांनीं आपल्या नेत्याप्रमाणेंच आपलें सर्व आयुष्य समाजोद्धाराच्या कार्याला वाहून घेण्याचा निश्चय केला. ह्या निश्चयाप्रमाणें आपल्या भावी आयुष्य क्रमाची रूपरेषा आंखून आपल्या सार्वजनिक कार्याकरतां शिक्षणक्षेत्र निवडले व त्याला मूर्तस्वरूप देण्याच्या दृष्टीनें त्यांनीं सन १९१६ सालीं बेळगांवांत 'कर्नाटक लिंगायत एज्युकेशन सोसायटी' स्थापन केली.

संस्थेचे मूल संस्थापक – सात पदवीधर (सप्तर्षि)

या प्रमाणें उच्च ध्येयानें प्रेरित झालेले पदवीधर सात असून त्यांचीं नांवें (१) कै. प्रो. बसवनाळ (२) कै. प्रो. साखरे (३) कै. पंडिताप्पा चिक्कोडी (४) श्री कट्टीमनी (५) श्री. व्ही. व्ही. पाटील. (६) श्री. हुंचिनाळ (७) श्री. ममदापूर अशी आहेत. हे सर्व पदवीधर गरीब असून समाजाच्या सहाय्यानेंच त्यांनीं उच्च शिक्षण संपादन केलें होतें. त्यावेळीं कर्नाटकांत नांवाला सुद्धां एकही कॉलेज नव्हते. त्यामुळें कर्नाटकांतील सर्व विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणाकरतां पुण्यालाच जावे लागत असें. ह्या पदवीधरांचें शिक्षणही पुण्याच्या कॉलेजांतच झालें होतें. त्यावेळीं लिंगायत समाजाच्या पदवीधरांना सरकारी नोकरीत वरिष्ठ जागा मिळत होत्या. त्यावेळीं शेतकी कॉलेजची बी. ए जी. पदवी संपादन केलेले पदवीधर, डेप्युटी कलेक्टरच्या जागीं नेमले गेले होते, यावरून त्यावेळी लिंगायत पदवीधरांना सरकारी नोकऱ्या किती विलोभनीय व फायदेशीर होत्या याची कल्पना येईल. वरील पदवीधरांनीं सरकारी नोकरी धरण्याचें कबूल केले असते तर त्यांना अशा वरिष्ठ जागा सहज मिळाल्या असत्या व त्यांना आपलें सर्व आयुष्य मानमरातबांत व ऐषआरामांत घालवितां आलें असतें. परंतु आपल्या स्वार्थत्यागी नेत्यांच्या सार्वजनिक जीवनाचा त्यांच्या मनावर परिणाम झालेला असल्यामुळें व पुण्याच्या डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे संस्थापक चिपळूणकर, आगरकर, लो. टिळक, गोखले वगैरे महाराष्ट्रीय नेत्यांनीं शिक्षणाकरिता केलेल्या स्वार्थत्यागाचे आदर्शनीय उदाहरण त्यांच्या दृष्टीपुढें असल्यामुळें, घरची गरीबी असतांनाही तिकडे दुर्लक्ष करून, व विलोभनीय सरकारी नोकऱ्या मिळत असतांना-सुद्धां, त्यांच्यावर लाथ मारून त्यांनीं आपलें आयुष्य शिक्षण कार्याला वाहण्याचा निश्चय केला व त्याप्रमाणें त्यांनीं सन १९१६ सालीं ही संस्था स्थापून बेळगांवांत

एक हायस्कूल सुरूं केलें. त्यांनीं ह्या हायस्कूलास आपल्या समाजाकरितां अविश्रांत श्रम केलेले नेते कै. गिलगिंची व कै. अर्ताळ यांचे नांव देऊन त्यांनीं त्यांचाही गौरव केला.

### संस्थेची प्रगती

सांप्रत काळीं जनतेंत जागृति झाली असल्याकारणानें व उदार धनिक लोक शिक्षण कार्यास सढळ हातानें मदत करीत असल्याकारणानें, तसेंच सरकारसुद्धां अशा कार्यास सर्वतोपरी उत्तेजन देत असल्यामुळें हायस्कूल–कॉलेजसारख्या शिक्षण संस्था स्थापणें आतां सुलभ झालें आहे. परंतु त्यावेळीं यापैकीं कोणत्याही सवलती उपलब्ध नव्हत्या. त्यामुळें त्यावेळीं एक हायस्कूल सुद्धां सुरूं करणें मोठ्या मुष्कीलीचें काम होतें. त्यांच्या कार्याच्या प्रारंभीं त्यांना मिळालेल्या देणग्या फारच कमी. सरकारी ग्रँट नाहीं. विद्यार्थ्यांकडून मिळणारी फी ही यथातथाच. अशा परिस्थितींत मिळणाऱ्या तुटपुंज्या रक्कमेवरच त्यांना गुजराण करावी लागे. त्यामुळें प्रत्येकानें स्वतंत्र बिऱ्हाड करणें त्यांना अशक्यच होतें. म्हणून भाड्याच्या एका लहानशा घरांत हे सर्व एकत्र राहात व तेथेंच एकत्र जेवण करीत. अशा रीतीनें कितीतरी दिवस त्यांना काढावे लागले. या वरून त्यांनीं केलेल्या स्वार्थ त्यागाची व ध्येयसाधनेकरतां केलेल्या कष्टाची कल्पना येईल. याप्रमाणें कांही काळ गेल्यांनंतर त्यांना थोड्या थोड्या देणग्या मिळूं लागल्या, सरकारी ग्रँटही मिळू लागली व दिवसेंदिवस विद्यार्थ्यांची संख्याही वाढत गेली. त्यामुळें सोसायटीची आर्थिक परिस्थिती थोडी बहुत सुधारली. हें हायस्कूल नांवारूपाला येऊन त्याला स्थैर्य प्राप्त झाल्यानंतर त्यांनी सन १९२२ सालीं धारवाडला 'राजा लखम गौडा सरदेसाई हायस्कूल' सुरू केले. तसेंच एक प्रिंटिंग प्रेस काढल्यास सोसायटीच्या छपाईचें कामही होईल व त्या पासून सोसायटीस थोडा बहुत लाभ ही होईल म्हणून त्यांनीं सन १९२५ सालीं धारवाडला 'तोंडदार्य प्रेस' नांवाचें प्रिंटिंग प्रेस सुरू केलें. याप्रमाणें दिवसेंदिवस संस्थेची भरभराट होत जाऊन त्याला अधिक स्थैर्यही प्राप्त झाले.

### लिंगराज कॉलेजची स्थापना.

त्यावेळीं साऱ्या कर्नाटकांत धारवाड येथील सरकारी 'कर्नाटक कॉलेज' शिवाय;दुसरे कॉलेज नव्हते. कर्नाटकांत कॉलेज शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या दिवसेंदिवस वाढत चालली होती म्हणून त्यांनीं बेळगांवला कॉलेज काढण्याचा

विचार केला. सन १९२७ साला पासूनच कॉलेज काढण्याचे विचार त्यांच्या मनांत घोळत असले तरी व त्याकरतां त्यांचे प्रयत्न चालू असले तरी सन १९३३ पर्यंत त्यांच्या प्रयत्नांना मूर्तस्वरूप आलें नाहीं. परंतु सुदैवानें कांहीं उदार धनिकांच्या साह्यानें व मुख्यतः त्यावेळचे मुंबई सरकारचे शिक्षणमंत्री कै. कवळी यांच्या सक्रीय सहानुभूतीनें त्यांच्या प्रयत्नांना फळ लाभले व सन १९३३ साली. बेळगाव येथें मोठ्या समारंभानें कॉलेज स्थापण्यांत आले. कै. शिरसंगीकर सरदेसाई यांनीं समाजाची केलेली सेवा व त्यांचा स्वार्थत्याग लक्षांत घेऊन समाजावर त्यानी केलेल्या उपकाराचें ऋण स्मरणांत रहावें या दृष्टीनें सोसायटीच्या या पहिल्या कॉलेजला 'लिंगराज कॉलेज' असे नामाभिधान करण्यांत आलें. प्रिन्सिपालाच्या जागीं परदेशांत उच्च शिक्षण घेऊन पी. एच् डी. पदवी मिळवलेले व सोसायटीचे आजीव सभासद डॉ. नंदीमठ यांची नेमणूक करण्यात आली. या कॉलेजमुळें कर्नाटकांत उच्च शिक्षण घेंऊ इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांची फारच सोय झाली. परगांवाहून शिक्षणाकरतां बेळगांवास येणाऱ्या विद्यार्थ्यांच्या सोयीकरतां सुमारे ३०० विद्यार्थ्यांची सोय होईल एवढे मोठे विद्यार्थी वसतीगृह (बोर्डींग) बांधण्यांत आले. कॉलेज काढण्याच्या ह्या महत्वाच्या घटनेमुळें साहाजिकच सोसायटीची कीर्ति वाढली. त्याला मोठमोठ्या देणग्याही मिळू लागल्या. सन १९३३ पासून सन १९४६ पर्यंतच्या तेरा वर्षाच्या काळात सौंदत्ती (जि. बेळगांव) सोलापूर व बार्शी या तीन ठिकाणीं सोसायटीनें स्थानिक लोकांच्या सहाय्यानें हायस्कूलांची स्थापना केली.

### सन १९४६ नंतरची संस्थेची प्रगती.

सन १९४६ सालीं मुंबई प्रांतांत कॉंग्रेस राज्य स्थापन झाल्यानंतर सोसायटीच्या कार्याला जास्ती चालना मिळाली. त्यामुळें सोसायटीनें सन १९४७ सालीं पुढचें महत्वाचें पाऊल टाकलें. कर्नाटकाचे सुप्रसिद्ध दानशूर कै. श्री. भूमरड्डी, यांनीं, दिलेल्या देणगीच्या उदार सहाय्यानें सोसायटीनें त्यासालीं हुबळी येथें 'बी. व्ही. भूमरड्डी इंजिनियरिंग कॉलेज' व हुबळी येथील सुप्रसिद्ध मूरुसाविर मठाचे त्यावेळचे जगद्गुरु लिं. श्री. म. नि. गंगाधर स्वामीजी यांच्या सहाय्यानें 'जगद्गुरु गंगाधर कॉमर्स (वाणिज्य) कॉलेज' नांवाची दोन कॉलेजे स्थापली. तेव्हांपासून सन १९६३ सालीं सोसायटीनें आणखी एक महत्वाचे पाऊल टाकून बेळगांव येथें 'जवाहरलाल नेहरू मेडिकल कॉलेज' नांवाचे वैद्यकीय कॉलेज स्थापून आजपर्यंतच्या आपल्या कीर्तिमंदिरावर कळस चढविला. ह्या कॉलेजकरतां सोसायटीनें बेळगाव शहराजवळ शंभर एकर जागा खरेदी केली असून तेथे कॉले-

ज्च्या भव्य इमारती उभारल्या जात आहेत. ह्याच वर्षी सोसायटीनें हावेरी (जि. धारवाड) व बेंगळूर येथेंही आणखी दोन कॉलेजे सुरु केली आहेत. याप्रमाणे सन १९१६ सालीं सात स्वार्थत्यागी पदवीधरांनीं लहान प्रमाणावर आरंभलेलें हें शिक्षण कार्य वटवृक्षाप्रमाणें दिवसेंदिवस वृध्दिंगत होऊन त्याच्या शाखा सर्व कर्नाटकभर व महाराष्ट्राच्या कांहीं भागांतही पसरल्या आहेत.

सोसायटीनें स्थापिलेल्या शिक्षणसंस्था.

प्रारंभापासून आजपर्यंत ह्या सोसायटीनें स्थापलेल्या शिक्षणसंस्थांची यादी खाली दिलेली आहे.

| | संस्थेचे नांव | स्थापन काळ |
|---|---|---|
| १ | गिलगिंचि अर्ताळ हायस्कूल (बेळगांव) | १९१६ |
| २ | राजा लखमगौडा सरदेसाई हायस्कूल (धारवाड) | १९२२ |
| ३ | तोंटदार्य प्रेस. धारवाड | १९२५ |
| ४ | लिंगराज कॉलेज बेळगांव. | १९३३ |
| ५ | श्री काडसिध्देश्वर हायस्कूल सौदत्ती (जि. बेळगांव) | १९३५ |
| ६ | आण्णाप्पा काद्मदी हायस्कूल, सोलापूर | १९३७ |
| ७ | कन्नड प्राथमिक शिक्षग ट्रेंनिग कॉलेज, बेळगांव | १९३९ |
| ८ | सिल्वर ज्युबिली हायस्कूल, वार्शी | १९४१ |
| ९ | कन्नड प्राथमिक शाळा बेळगाव | १९४६ |
| १० | बी. व्ही. भूमरड्डी इंजिनियरिंग कॉलेज, हुबळी | १९४७ |
| ११ | ज. गु. गंगाधर कॉमर्स कॉलेज, हुबळी | १९४७ |
| १२ | जे. जी. कन्नड प्राथमिक शिक्षक ट्रेंनिग कॉलेज, हुबळी | १९४७ |
| १३ | श्री काडसिद्देश्वर आर्टस कॉलेज, हुबळी | १९५२ |
| १४ | मंगरुळ हायस्कूल, अक्कलकोट ( जि. सोलापूर ) | १९५६ |
| १५ | पी. सी. जाबिन सायन्स कॉलेज, हुबळी | १९५७ |
| १६ | ज. गु. तोंटदार्य कॉलेज, गदग, ( जि. धारवाड ) | १९५८ |
| १७ | राजा लखमगौडा सायन्स इन्स्टिटयूट, बेळगाव | १९५८ |
| १८ | न्यू हायस्कूल, अथणी ( जि. बेळगांव ) | १९५८ |
| १९ | किंडरगार्डन स्कूल बेळगांव | १९६० |

| | | |
|---|---|---|
| २० | आर्टस आणि सायन्स कॉलेज, निपाणी | १९६१ |
| २१ | जवाहरलाल नेहरू मेडिकल कॉलेज, बेळगांव | ११६३ |
| २२ | आर्टस अँड सायन्स कॉलेज हावेरी ( जि. धारवाड ) | १९६३ |
| २३ | ,, ,, ,, बेंगळूर | १९६३ |
| २४ | न्यू सेकंडरी स्कूल गलतगा ( जि. बेळगांव ) | १९६५ |

या सर्व संस्थाकरतां सोसायटीने स्वतंत्र इमारती बांधल्या आहेत. विद्यार्थ्यांच्या सोयी करतां कांहीं कॉलेजांना जोडून विद्यार्थी वसतीगृहेंही स्थापन केली आहेत. शिक्षण संस्थांच्या सर्व इमारतीसह सोसायटीच्या साऱ्या मालमत्तेची किंमत सांप्रत एक कोटी रुपये होईल. या सर्व संस्था चालविण्याकरतां सोसायटी दरसाल सुमारें ४० लाख रुपये खर्च करते. या सर्व संस्थातून आतां सुमारें १५००० विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. त्यांना शिक्षण देण्याकरतां नेमलेलें प्रोफेसर, लेक्चरर, शिक्षक वगैरेची संख्या सुमारे ७०० आहे. ह्या संस्थातील हुषार विद्यार्थ्यांना उत्तेजनार्थ स्कॉलरशिप्स देण्याकरतां सोसायटी दरसाल सुमारे रु. ८०००/–खर्च करते. यावरुन सांप्रत सोसायटी करीत असलेल्या शिक्षण-कार्याच्या भव्यतेची व विशालतेची कल्पना येईल. तसेंच या सोसायटीच्या कार्याचें दुसरे वैशिष्टच म्हणजे लहान बालकाकरतां किंडर गार्डन शाळेपासून कॉलेजची पदवी मिळाल्यानंतर स्नातकोत्तर पदव्यांचेही शिक्षण देणाऱ्या सर्व तऱ्हेच्या व दर्जाच्या संस्था सोसायटीने स्थापन केल्या आहेत. तसेंच सोसायटीनें इंजिनियरिंग कॉलेज, मेडिकल कॉलेजसारख्या अवाढव्य खर्चाच्या शिक्षण संस्थाही स्थापन करून कर्नाटकच्या विद्यार्थ्यांना तांत्रिक व वैद्यकीय शिक्षणही संपादन करण्याची सोय करून दिली आहे.

**सोसायटीचे सांप्रतचें सार्वजनिक स्वरूप.**

ही सोसायटी मूलतः लिंगायत पदवीधरांनीं काढलेली असून त्याला आज-पर्यंत विशेषतः लिंगायत समाजाचेच सहाय्य झाले असले तरी त्याच्या सर्व शिक्षण संस्थांत जाति, धर्म, वर्ण, प्रांत वगैरे भेदभाव न करतां सर्व विद्यार्थ्यांना त्यांत प्रवेश दिला जातो. तसेंच त्या शिक्षण संस्थाकरतां शिक्षक वर्ग नेमून घेतांनाही कोणताही भेदभाव न करतां त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांची नेमणूक केली जाते. त्यामुळें या शिक्षक वर्गांत भारतांतील सर्व धर्माचे व सर्व प्रांतांचे लोक आढळून

घेतात. सन १९४८ सालीं ह्या सोसायटीचे नांवही बदलून त्याला 'कर्नाटक लिबरल एज्युकेशन सोसायटी' असें नामाभिधान करण्यांत आले आहे.

### सोसायटीला मिळालेल्या देणग्या.

ह्या सोसायटीस आजपर्यंत सुमारे ४० लक्ष रुपये देणगी रूपानें मिळाले असून त्यांत सर्वांत मोठा वांटा कर्नाटकचे सुप्रसिद्ध दानशूर श्री. बी. व्ही. भूमरड्डी यांचा आहे. नगद व इतर सामानसुमानाच्या रूपानें त्यांनीं संस्थेस सुमारे नऊ लाख रुपयांच्या देणग्या दिल्या आहेत. कर्नाटकांत आजपर्यंत होऊन गेलेल्या दानशूरांमध्ये कै. सिरसंगीकर देसाई यांच्या खालोखाल श्री भूमरड्डी हेच प्रमुख दानशूर आहेत असे म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं. सोसायटीला मिळालेल्या इतर देणग्यांचे वैशिष्टच हें आहे कीं ह्यापैंकी बहुतेक सर्व देणग्या मध्यमवर्गीय व काबाडकष्ट करून जीवन व्यतीत करणाऱ्या गरीब लोकांनींच दिलेल्या आहेंत. श्री. भूमरड्डी शिवाय अर्धा पाऊण लाख वर्गणी देणाऱ्यांचीं संख्या हाताच्या बोटांवर मोजण्याएवढी सुद्धां नाहीं. परंतु लहान लहान देणग्या देणाऱ्यांची संख्या मात्र फारच मोठी आहे. सोसायटीला मिळालेल्या ४० लाख रुपयें देणग्यापैकीं सुमाते २०/२५ लाख रुपये अशा लहाल सहान देणगीदारांनींच दिले आहेत. यावरून कर्नाटकाच्या सामान्य जनतेला ह्या संस्थेची उपयुक्तता मनोमन पटली असून त्याच्याबद्दल त्यांच्या मनांत किती आदरभाव व आपलेपणा वसत आहें याची कल्पना येते.

### कर्नाटकांतील इतर वीरशैव शिक्षण संस्था,

अशी ही नांवारूपाला आलेली भव्य अवाढव्य शिक्षणसंस्था आज नुसत्या वीरशैव समाजाला नव्हे तर साऱ्या कर्नाटकाला कीर्ती संपादन करुन देणारी एक आदर्श व ललामभूत शिक्षणसंस्था होऊन राहिली आहे. या संस्थेचे अनुकरण करून विजापूर, बागलकोट, गुलबर्गा, संकेश्वर येथेंही स्वतंत्र शिक्षणसंस्था स्थापन होऊन त्या संस्थानींही शाळा कॉलेज स्थापन केली आहेत. निजामशाही काळांत कर्नाटक–हैद्राबाद भाग शिक्षणाच्या बाबतींत मागसलेला होता. परंतु म्हैसूर राज्यांत त्या भागाचे विलिनीकरण झाल्यानंतर तेथेंही शिक्षणाची प्रगती झपाट्यानें होत आहे. त्या भागांतील श्री रामपुरे वगैरे उत्साही कार्यकर्त्यांनी हैद्राबाद–कर्नाटक शिक्षण संस्था स्थापून गुलबर्गा येथे आर्टस व सायन्स कॉलेज कामर्स कॉलेज, इंजिनियरिंग कॉलेज, मेडिकल कॉलेज, व बिदर येथे एक कॉलेज अशा उच्च शिक्षण संस्था स्थापून मुंबई कर्नाटकाप्रमाणें त्यांनी तेथेंही शिक्षण क्षेत्रांत धडाडीची आघाडी मारली आहे. तसेच जुन्या म्हैसूर

प्रांतांतही चित्रदुर्ग मठ, सिध्दगंगा मठ, सुत्तूरमठ येथील मठाधिपतींनीं शिक्षण क्षेत्रांत प्रशंसनीय कार्य केलें आहे. सिद्धगंगा मठाधीश श्री. म. नि. श्री शिवकुमारस्वामी यांनी मठाला कांहीं उत्पन्न नसतांना देणग्या मिळवून हायस्कूल, कालेज, संस्कृत पाठशाळा वगैरे शिक्षणसंस्था चालवीत आहेत. त्यांचें उल्लेखनीय कार्य ह्मणजे त्यांनीं चालविलेले मोफत विद्यार्थी वसतिगृह. या वसतिगृहांत सुमारे ३५०० विद्यार्थ्यांना मोफत अन्नदान व विद्यादान केलें जातें. हा सर्व खर्च स्वामीजी नगद व मुख्यत: धान्य रूपानें देणग्या मिळवून चालवितात. सुत्तूर मठाधिशांनीं तर आपल्या मठाचें सारे उत्पन्न शिक्षण कार्याला बहाल केले आहे. त्यांनीं स्थापलेल्या मोफत विद्यार्थी वसतिगृहांत सुमारें तीन हजार विद्यार्थी राहात असून त्यांचा सर्व खर्च मठाच्या उत्पन्नांतून व मिळालेल्या देणग्यांतून चालविला जातो. चित्रदुर्ग मठाच्या जगद्‌गुरूंनीही बेंगळूर वगैरे ठिकाणीं मोफत विद्यार्थी वसतिगृहें स्थापून गरीब विद्यार्थ्यांची सोय केली आहे. त्यांनीं अलीकडे दावणगेरे येथें स्थापन झालेल्या मेडिकल कॉलेजला दहा लाख रुपयांची देणगी देऊन आपल्या समाजाच्या सर्व मठाधिपतींना एक आदर्श उदाहरण घालून दिले आहे.

### महाराष्ट्रीय वीरशैव समाजाचें कर्तव्य.

कर्नाटकच्या सर्व भागांतील वीरशैव समाजानें अशा रीतीनें शिक्षण क्षेत्रांत मारलेली आघाडी पाहिली म्हणजे त्या मानानें महाराष्ट्रीय वीरशैव समाजांत विशेष कांहीं कार्य झाले नाहीं असें दुःखानें म्हणावे लागते. महाराष्ट्रीय वीरशैव समाजांत धनिक लोक नाहींत असें नाहीं. परंतु समाजाच्या शिक्षण कार्याकडे त्यांचें लक्ष नाहीं याला अपवाद आहेत. परंतु ते फारच थोडे. कर्नाटकांतील वीरशैव समाजाच्या कार्यकर्त्यांनीं व मठाधीपतींनीं शाळाकॉलेजे स्थापल्याप्रमाणें महाराष्ट्रीय वीरशैव समाजानें शाळाकॉलेजे स्थापण्याची जरुरी नाहीं. परंतु आपल्या समाजाच्या माध्यमिक व उच्चशिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना सहाय्य करणे फारच जरुरीचे आहे. त्या दृष्टीनें महाराष्ट्रांतील ज्या शिक्षण केंद्रांत वीरशैव विद्यार्थी शिक्षण घेत आहेत त्या सर्व ठिकाणीं त्यांच्या सोयीकरतां विद्यार्थी वसतिगृहे स्थापून त्यांत गरीब विद्यार्थ्यांचीही मोफत व्यवस्था होणे आवश्यक आहे. तसेंच गरीब पण होतकरु विद्यार्थ्यांना मदत करण्याकरता सर्व महाराष्ट्राकरतां शिक्षण फंड उभारणें जरुर आहे. सांप्रत महाराष्ट्रांत अशा रीतीचें कार्य चालले नाहीं असें नाहीं. परंतु समाजाच्या गरजेच्या मानानें ते फारच अपुरें आहे. करितां, समाजांतील धनिक लोक, मठाधिपती, व कार्यकर्ते या सर्वांनी ह्या महत्वाच्या व पवित्र समाज कार्यांत जास्ती लक्ष घालून व सढळ हातानें मदत करून आपल्या समाजाचा उद्धार करण्याचें श्रेय घेतील अशी आशा आहे.

लेखांक ११

# श्री मन्मथ स्वामींचें जीवन चरित्र व कार्य

(सन १९६५ नोव्हेंबर महिन्याच्या मन्मथ विशेषांकाचा संपादकीय लेख)

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
धर्म संस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥

— भ. गीता

ह्या भगवदोक्तीप्रमाणें प्राचीन काळापासून आजपर्यंत जेव्हां जेव्हां वीरशैव धर्माला ग्लानी येऊन त्याचा ऱ्हास होण्यांची वेळ ठेपली होती त्या त्या वेळीं त्या धर्मांत महान महान् तपस्वी व प्रभावशाली संत निर्माण झाले व त्यांनीं आपल्या तपोबलानें व प्रभावी धर्माचरणानें मृत्युपंथास लागलेल्या वीरशैव धर्माला प्रभावित करून त्यांत जीवकळा भरली व समाजांत नवजागृति निर्माण करून वीरशैव धर्माचा उद्धार केला. अशा महान तपस्वी संतांच्या उज्वल परंपरेत संतांचें माहेरघर म्हणून नांवाजलेल्या मराठवाड्यांत सोळाव्या शतकांत श्री. मन्मथ-स्वामी महाराजांचा अवतार झाला. त्यांनीं आपल्या तपोबलानें व प्रभावी धर्मप्रचारानें, त्यावेळीं तेथें निर्माल्यवत् झालेल्या वीरशैव समाजांत नवचैतन्य निर्माण करून वीरशैव धर्माचें पुनरुत्थान केलें. अशा या परमपूज्य विभूतीचें शुद्ध,

पवित्र व आदर्श जीवनचरित्र व त्यांची आध्यात्मिक बोधपर शिकवण वीरशैव धर्मीयांना मार्गदर्शक होईल या दृष्टीनें ह्या विशेषांकांत त्यांच्या विषयीं उपलब्ध असलेली शक्य तेवढी माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे. ह्या महान विभूतीच्या जीवनाचें भक्तीपूर्वक व संशोधनात्मक दृष्टीनें अभ्यास केलेले लातूरचे अनुभवि व कसलेले लेखक श्री. वैं. मा. शेटे वकील यांनीं त्यांच्या जीवनावर लिहिलेला सविस्तर व महत्त्वाचा लेख ह्याच अंकात इतरत्र प्रसिद्ध केला आहे त्याच्यावरून ह्या महानुभावाच्या जीवनाची व त्यांनी केलेल्या अलौकिक कार्याची कल्पना येईल तसेच त्यांच्या धर्मोपदेशाची व त्यांनीं निर्माण केलेल्या अभंग साहित्याची वाचकांना थोडोशी कल्पना यावी यादृष्टीनें त्यांचे व त्यांच्या कांहीं शिष्यांचे निवडक अभंग याच अंकात इतरत्र उध्दृत केले आहेत. त्यांच्यावरून त्यांच्या तत्त्वज्ञानाची व प्रभावशाली धर्मप्रचाराची तोंडओळख वाचकांना होईल.

**कपिलधार पुण्यक्षेत्र.**

सोळाव्या शतकांत त्यांनीं मराठवाडयांतील वीरशैव समाजांत निर्माण केलेल्या धर्मजागृतीची ज्योत आजही तेथें तेवत असून आपल्या प्रकाशानें तेथील समाजास प्रकाशमान करीत आहे. महाराष्ट्रांतील वारकरी पंथाच्या अनुयायांत श्री ज्ञानदेव, श्री नामदेव, श्री तुकाराम महाराज वगैरे संतांना जें स्थान आहे तें स्थान श्री मन्मथ स्वामींना तेथील वीरशैव समाजांत आहे. श्री मन्मथ स्वामीविषयी त्यांच्या मनांत अत्युत्कट पूज्यभाव वसत असून ते त्यांचें मोठचा श्रद्धेनें व भक्तीभावानें नामस्मरणपूर्वक भजनपूजन करतात. त्यांच्या अभंगाचा प्रचार तेथील वीरशैव समाजाच्या घरोघरीं झालेला आहे. त्यांचे अभंग गाऊन भजन करणारे भजनी मेळे ठिकठिकाणीं निर्माण झाले आहेत. श्री मन्मथस्वामींची तपोभूमी व समाधिस्थळ असलेले पुण्यक्षेत्र कपिलधार येथे दरसाल कार्तिक पौर्णिमेस मोठी जत्रा भरते. त्यावेळीं मराठवाडयांतील सर्व भागांतून व सोलापूर, वार्शी वगैरे शहरांतून त्यांचे भक्त तेथे मोठ्या संख्येने जमून पूज्य स्वामींच्या समाधीचें दर्शन घेऊन त्यांची भक्तीपूर्वक आराधना व भजनपूजन करतात. परंतु मराठवाडा व त्याच्या आसपासचा कांहीं भाग सोडल्यास, महाराष्ट्राच्या इतर भागांतील वीरशैव व विशेषत: कर्नाटकांतील वीरशैव समाजास या श्रेष्ठतम संताविषयीं कांहीच माहिती नाही, ही खेदाची गोष्ट आहे. तसेंच श्रीशैल, सोलापूर, वसवकल्याण उळवी वगैरे वीरशैव धर्मक्षेत्रापेक्षा कपिलधारक्षेत्राचें महत्त्व कोणत्याही रीतीनें कमी नाहीं. असे असतांना वाहेरील वीरशैवांना या क्षेत्राचें नांवसुद्धां माहीत नसावें ही नामुष्कीची व खेदाची गोष्ट आहे.

### कपिलधार क्षेत्राच्या अभिवृद्धीचे कार्य.

श्री क्षेत्र कपिलधार येथें सुमारे ३५० वर्षापासूनच श्री मन्मथस्वामीच्या भक्तांची यात्रा भरत असते. त्या क्षेत्राला येणाऱ्या यात्रेकरूंना आवश्यक असलेल्या सुखसोयी निर्माण करण्यासाठीं सन १९५१ साली स्वार्थत्यागी, उत्साही, समाज-प्रेमी व कळकळीच्या प्रमुख भक्तांची एक लोकनियुक्त कमिटी नेमली गेली आहे. त्या कमिटीच्या सभासदांनीं परिश्रमपूर्वक व स्वतःच्या पदराला खार लावून घेऊन सुद्धां त्या क्षेत्रांतील कांहीं अडीअडचणी दूर करून यात्रेकरूकरतां कांहीं सुखसोयी निर्माण केल्या आहेत असें त्या कमिटीच्या रिपोर्टावरून कळून येते. तसेंच त्या सुख–सोयी निर्माण करण्याकरतां कांहीं उदार धनिकांनीं सढळ हातांनीं द्रव्यसहाय्यही केलें आहे असें आढळून येते. कमिटीच्या सभासदांनीं व इतरांनीं आजपर्यंत केलेले हें कार्य प्रशंसनीय असून अभिनंदनास पात्र आहे यांत संशय नाहीं. परतु एकंदरीत आजपर्यंत तेथें झालेल्या कार्याची, इतर धर्मक्षेत्रांत निर्माण केल्या गेलेल्या सुखसोयी व इतर सुधारणा याशीं तुलना केल्यास व कर्नाटक-महाराष्ट्र राज्यांतील प्रमुख धर्म-क्षेत्रांत या धर्मक्षेत्राची गणना होण्याच्या दृष्टीनें विचार केल्यास येथील सांप्रतचें कार्य अपुरे आहे असें वाटते. करिता, यापुढें कपिलधार देवस्थान पंच कमिटीनें हें ध्येय आपल्या दृष्टीपुढे ठेवून, क्षेत्राच्या अभिवृद्धीची एक सविस्तर व्यावहारिक योजना तयार करून त्या योजनेनुसार कार्य करणें योग्य होईल, असें आम्हास वाटते.

### दुसऱ्या धर्मक्षेत्रांची पाहणी करणें आवश्यक.

कपिलधारक्षेत्राला एक प्रमुख धर्मक्षेत्र बनविण्याचें ध्येय हें लोकांना अव्यव-हारिक वाटेल. परंतु आम्हाला भारतांतील ज्या कांहीं क्षेत्रांची माहिती आहे त्याच्यावरून आम्ही खात्रीनें सांगू शकतो की एकनिष्ठेनें व दृढनिश्चयानें सर्वांनी मिळून प्रयत्न केल्यास हें ध्येय गांठणें अशक्य नाहीं. अर्थात् त्याला काही काला-वधी लागेल. परंतु त्या दिशेनें प्रयत्न करीत गेल्यास थोड्याच काळांत त्या प्रयत्नाचें दृश्यफल दिसून येईल. त्याकरतां कमिटीच्या कांहीं सभासदांनीं अभिवृद्धि पावलेल्या कांहीं धर्मक्षेत्रांना भेटी देऊन तेथील अभिवृद्धीचें कार्य व तेथील स्थानिक कमिट्यांची कार्यपद्धती यांचे निरीक्षण केल्यास त्यापासून त्यांना आवश्यक ती माहिती मिळेल व क्षेत्राच्या अभिवृद्धीचें कार्य कसें चालवावें ह्याचें ज्ञानही प्राप्त होईल. ह्या बाबतीत पंढरपूर क्षेत्रांतील कार्य कपिलधार कमिटीला मार्ग–दर्शक होणार नाही.

पंढरपूर क्षेत्र हें पंढरपूरसारख्या मोठचा शहरांत व नदीच्या कांठावर वसलेले आहे. तेथील एकंदर परिस्थितीही निराळी आहे. परंतु कपिलधार क्षेत्र जनवस्ती नसलेल्या एका निसर्गरम्य पहाडावर वसलेलें आहे. या दृष्टीने आंध्र-प्रांतातील तिरुपति व श्रीशैल क्षेत्रें, कर्नाटकांतील सौंदत्ती – यल्लम्मा क्षेत्र, कपिलधार क्षेत्राच्या अभिवृद्धीच्या कार्याला मार्गदर्शक होतील असें आम्हास वाटतें. कपिलधार क्षेत्राप्रमाणेंच ही तीनही क्षेत्रे शहरवस्तीपासून दूर पहाडावर वसलेलीं आहेत. तिरुपति व श्रीशैल ही धर्मक्षेत्रे प्राचीन, ऐतिहासिक व प्रख्यात क्षेत्रे असल्यामुळें व त्या क्षेत्रांना भेट देणाऱ्या यात्रेकरूंची संख्या फार मोठी असल्यामुळें त्यांच्या समृद्ध आर्थिक परिस्थितीची व तेथील अभिवृद्धीकार्याची कपिलधार क्षेत्रा-तील कार्याशीं तुलना करतां येणार नाही. परंतु तेथील देवस्थान कमिटचांची कार्यपद्धति कपिलधार कमिटीला खचित मार्गदर्शक व अनुकरणीय होईल. सौंदत्ती-यल्लमाक्षेत्राच्या अभिवृद्धि–कार्याला अलीकडेच प्रारंभ झाला आहे. परंतु त्या क्षेत्राच्या अभिवृद्धीकरतां तेथील कमिटीनें आंखलेली योजना व ती योजना अमलांत आणण्याकरतां आवश्यक असलेला द्रव्यनिधी जमविण्याची योजना व त्या योजनेंप्रमाणें आजपर्यंत झालेलें कार्य कपिलधार कमिटीला खात्रीनें मार्गदर्शक होतील. करितां कपिलधार कमिटीच्या कांहीं सभासदांनीं ह्या धर्मक्षेत्रांस भेट देऊन तेथील अभिवृद्धी कार्याचें निरीक्षण करावें, असें आम्ही त्यांना नम्रतापूर्वक सुचवू इच्छितो.

**क्षेत्राचें महत्व वाढविण्याबद्दल कांहीं सूचना.**

ह्या पुण्यक्षेत्राचें माहात्म्य व महत्त्व वाढविण्याच्या दृष्टीनें तेथील यात्रेच्या-वेळीं कांहीं धार्मिक व सांस्कृतिक कार्यक्रम अंमलांत आणणें जरूर आहे असें आम्हास वाटते. सारा मराठवाडा व इतर कांहीं भागातील वीरशैव तेथें मोठ्या संख्येनें जमलेले असतात. ही यात्रा पांच दिवस चालते. तेव्हा अशावेळीं तेथें वीरशैव धर्म परिषद, वीरशैव महिला परिषद वगैरे वीरशैव समाजाच्या धार्मिक, शैक्षणिक व सामाजिक प्रश्नांचा सांगोपांग विचार विनिमय करणाऱ्या परिषदा भरविण्याचा उपक्रम आरंभल्यास त्यापासून साऱ्या समाजास फारच फायदा होईल. तसेंच या परिषदांना वीरशैव समाजाचे पुढारी, विद्वान, पंडित, शास्त्री, कीर्तनकार वगैरे लोकांना आमंत्रण देऊन, त्यांची तेथें व्याख्यानें व प्रवचनें करवून, त्यांच्या ज्ञानाचा लाभ यात्रेकरूंना करून दिल्यास आपल्या धर्माच्या प्रचाराचें कितीतरी मोठें कार्य होईल. तसेंच यात्रेच्या या पांच दिवसांत प्रदर्शनें भरविणें, कुस्त्याचे फड, गुरांचा बाजार भरविणें, तसेंच यात्रेकरूंच्या मनोरंजनार्थ सांस्कृतिक कार्यक्रम

आंखणें वगैरे कार्यक्रम आंखून अंमलांत आणल्यास त्यापासून यात्रेकरूंचे मनोरंजन होऊन त्यांना आपल्या जीवनांत व धंद्यांत आवश्यक असलेल्या ज्ञानाची प्राप्ती होईल. असल्या कार्यक्रमांत खेडूत लोक विशेष आस्था वाळगतात. करितां असले कार्यक्रम त्या क्षेत्रात यात्रेच्यावेळी अंमलात आणले गेले तर क्षेत्राची प्रसिद्धि होऊन यात्रेकरूंची संख्या वाढेल व क्षेत्राच्या उत्पन्नात ही भर पडेल.

**प्रचार व कार्य.**

तसेच वाहेरील लोकांना ह्या पुण्यक्षेत्राचें महत्त्व पटवून देण्याच्या दृष्टीनें योग्य प्रचारकार्य होणें जरूर आहे. ह्या धर्मक्षेत्रावद्दल अथवा यात्रेवद्दल नुसती पत्रकें प्रसिद्ध करून कांहीं कार्यभाग होणार नाहीं. सांप्रतच्या काळांत वर्तमात पत्रें, व नियतकालिकें प्रचाराची मुख्य साधनें आहेत. करितां यात्रेच्यावेळीं महा-राष्ट्रांतील मुख्य मुख्य वर्तमानपत्राच्या स्थानिक वातमीदारांना खास आमंत्रण देऊन व आवश्यक माहिती पुरवून ह्या क्षेत्रासंबंधीचे लेख व रिपोर्ट मुख्य मुख्य वर्तमानपत्रांत व नियतकालिकात प्रसिद्ध होतील अशी व्यवस्था करणें जरूर आहे. तसेंच वीरशैव समाजाचा वहुभाग कर्नाटकांत आहे. करितां कर्नाटकांतील नियत कालिकात श्री मन्मथ स्वामींच्या कार्यासंबंधी व कपिलधार क्षेत्रासंबंधी लेख प्रसिद्ध करण्याची आवश्यकता आहे. अशा रीतीनें प्रचारकार्य चालल्यास बाहेरील वीरशैव ह्या क्षेत्रास भेट देतील व त्यामुळें त्याची प्रसिद्धी वाढून दिवसें दिवस त्याला जास्ती महत्त्व येत जाईल.

**प्रवासी केंद्र.**

कपिलधारक्षेत्र सृष्टिसौंदर्यानें नटलेल्या निसर्गरम्य पहाडांत वसलेलें असल्या कारणानें व तेथील हवामानही उत्तम असल्या कारणानें तें प्रवासी केंद्र होण्यास उत्तम स्थळ आहे. या दृष्टीनें कमिटीनें प्रयत्न करून सरकारच्या प्रवासी केंद्र योजनेत ह्या क्षेत्राचा समावेश करून घेतल्यास त्यापासून ह्या क्षेत्राच्या भरभराटींत जास्तीच भर पडेल.

**साहित्य प्रचार.**

तसेंच श्री मन्मथस्वामीरचित ‘ परम रहस्य ’ व इतर ग्रंथ आणि त्यांचे व

त्यांच्या शिष्यांचे अभंग वगैरे साहित्याचे आधुनिक रीतीनें संपादन व प्रकाशन होणें जरूर आहे. ह्या दृष्टीनें आतापर्यंत काही प्रयत्न झाले आहेत परंतु सांप्रत-च्या गरजेंच्या दृष्टीनें ते फारच अपुरे आहेत. दिवसेंदिवस जनतेच्या मनांतील अंधश्रद्धा व 'बाबावाक्यं प्रमाणं' सारखी विचारसरणी नष्ट होऊन त्या ठिकाणी चिकित्सक बुद्धि व नव विचारसरणी ह्यांची वाढ होत आहे. अशा परिस्थितीत श्री ज्ञानेश्वर, श्री एकनाथ, श्री तुकाराम यांच्या साहित्याचे ज्या पद्धतीनें संपादन व प्रकाशन होत आहे त्याप्रमाणे उपरोक्त साहित्याचेंही संशोधन, संपादन होणें आवश्यक आहे. परंतु हें कार्य संघटित रीतीनें व एखाद्या संस्थेमार्फत झाल्यास सुसाध्य होईल असें आम्हास वाटते. करितां श्री मन्मथ स्वामींच्या सर्व साहित्य भक्तांनीं ह्या दिशेनें प्रयत्न केल्यास बरें होईल असे आम्ही त्यांना नम्रतेनें सुचवू इच्छितो.

क्षमस्व. 'परोपदेशे पांडित्य' नव्हे.

वरील मजकूर वाचून काहींजणांना आमचें हें लिखाण म्हणजे 'परोपदेशे पांडित्य' आहे, असें वाटण्याचा संभव आहे. श्रीमन्मथ स्वामींच्या साहित्य प्रकाशनाचा अथवा कपिलधार क्षेत्राच्या अभिवृद्धीकार्याचा प्रत्यक्ष अनुभव नसतांना आम्ही वरील मजकूर लिहिला आहे. याची जाणीव आम्हाला आहे. परंतु हा मजकूर दुसऱ्यांना उपदेश करण्याच्या दृष्टीनें लिहिलेला नसून श्रीमन्मथ स्वामींच्या साहित्याला साहित्यक्षेत्रात योग्य स्थान मिळून त्याचा चोहोकडे प्रचार व्हावा व सामान्य जनतेला सुद्धां श्री स्वामींच्या तत्त्वज्ञानाचा व उपदेशाचा लाभ मिळावा, तसेंच त्यांची तपोभूमी व समाधीस्थळ असलेल्या पवित्र कपिलधार पुण्यक्षेत्राची उत्तरोत्तर भरभराट होऊन भारताच्या प्रमुख धर्मक्षेत्रांत त्याची गणना व्हावी या उद्देशानें व आंतरिक तळमळीनें आम्ही हें संपादकीय लिहिलें आहे. सहृदय वाचक श्रीमन्मथ भक्त मंडळी ह्या दृष्टीनेंच या लिखाणाकडें पाहतील अशी आशा आहे.



लेखांक १२

# केळदी (बिदनूर) वीरशैव राजघराणे

## ( भाग १ )

( सन १९६५ सप्टेंबर महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख )

बाराव्या शतकांत श्रीबसवेश्वरादि शिवशरणांनीं घडवून आणलेल्या समाजाच्या सर्वांगीण क्रांतीमुळें नव वीरशैव समाजांत नव चैतन्याचा प्रादुर्भाव झाला. त्यामुळें समाजाच्या आध्यात्मिक क्षेत्रांत ज्याप्रमाणें हरिहर, राघवाक, निजगुण शिवयोगी, षडक्षर देव, सर्वज्ञ वगैरे संतकवि निर्माण होऊन त्यांनीं वीरशैव समाजाची धार्मिक व सांस्कृतिक प्रगती साधली, त्याचप्रमाणें राजकीय क्षेत्रांतही त्या समाजानें आघाडी मारली. त्यांतून काकती, कुर्ग, केळदी, कित्तूर, बिळगी, स्वादी वगैरे इतिहासप्रसिद्ध वीरशैव राजघराणी उदयास आलीं. त्यांनीं आपापल्या काळीं आपल्या पराक्रमानें व प्रजाहितदक्ष राज्य कारभारानें कर्नाटकाच्या भाग्योदयास हातभार लावला. त्यामध्यें केळदी राजघराणे प्रमुख असून त्या राजघराण्यानें कर्नाटकांत सुमारें अडीचशें वर्षें राज्य करून कर्नाटकाचा मलेनाड भाग उदयास आणला. त्या राजघराण्याचा इतिहास मननीय व बोधप्रद असल्यामुळें तो संक्षिप्तरूपानें ह्या लेखांत दिला आहे.

### मलेनाडची प्राचीन काळची समृद्धि.

कर्नाटकाचा पश्चिम भाग सह्याद्रि पर्वताने व्यापलेला डोंगराळ भाग असून त्याला 'मलेनाड' (डोंगराळ प्रदेश) असें नांव आहे. ह्या मलेनाड व महाराष्ट्राचा मावळ भाग ह्यामध्यें बरेंच साम्य आहे. परंतु मावळभागाप्रमाणें मलेंनाड खडकाळ प्रदेश नसून फारच सुपीक प्रदेश आहे अलिकडच्या एकदोन शतकांत ह्या भागांत मलेरिया रोग फारच फैलावल्यामुळें ह्या प्रदेशाची आतां वाताहत झाली, असली तरी प्राचीन काळीं तो फारच समृद्ध होता. भरपूर पर्जन्यवृष्टि, सुपीक जमीन व अनुकूल हवामान यामुळें या भागांत ऊस, भात, केळी, पानवेल, सुपारी, वेलदोडे, मिरी, नारळ वगैरे मौल्यवान पिकाची लागवड प्राचीन काळीं फार मोठ्या प्रमाणावर होत होती. त्यामुळे हा भाग समृद्ध होता. एवढेच नव्हे तर त्यामुळें तेथील उद्योगधंदे, व्यापार यांचीही अभूतपूर्व भरभराट झाली होती. त्यावेळचे तेथील व्यापारी इतिहासप्रसिद्ध असून भारताच्या सर्व प्रांतांत व नेपाळ, अफगाणिस्तान वगैरे देशांत त्यांचा व्यापार चालत होता. एवढेच नव्हे तर ते रोम, ग्रीस, इजिप्त वगैरे पाश्चिमात्य राष्ट्रें व ब्रह्मदेश, मलाया, जावा, सुमात्रा वगैरे पौर्वात्य देश येथें ही जलमार्गानें जाऊन तेथें आपला व्यापार चालवीत होते. पुण्याजवळची प्रसिद्ध कार्ले लेणी या मलेनाड भागांतील वनवासी शहराच्या एका धनिक व्यापाऱ्यानें स्वखर्चानें कोरविली आहेत. तसेंच ब्रह्मदेश सारख्या दूरच्या देशांत देवळें बांधण्याकरतां या प्रदेशांतील व्यापाऱ्यांनीं देणग्या दिल्याबद्दल शिलालेख आढळून येतात. याच्यावरून हा प्रदेश प्राचीनकाळीं किती समृद्ध होता व तेथील व्यापारोद्योगाची किती भरभराट झाली होती याची कल्पना येते. तसेंच प्राचीन काळीं ह्या प्रदेशांत प्रवास केलेल्या कांहीं परदेशी प्रवाशांनीं या प्रदेशाच्या सुबत्तेबद्दल केलेल्या वर्णनावरून व ह्या भागातील अनेक प्राचीन शिलालेखांत केल्या गेलेल्या उल्लेखावरून हा प्रांत त्या वेळीं 'सुजलां सुफलां' असून 'सुवर्णभूमी' म्हणवून घेण्यास लायक होता असें दिसून येतें.

### केळदी राज्याचा मूलसंस्थापक चौडाप्पा नायक.

अशा या समृद्धीसंपन्न प्रदेशांत केळदी नांवाचें एक गांव आहे. सांप्रत हें गांव मलेनाड भागांतील शिमोगा जिल्ह्यांत आहे. १५ व्या शतकाच्या उत्तरार्धांत ह्या गांवांत बसवप्पा—बसवाक्का नावाचे एक सुखी दांपत्य रहात होते. ते शेती करून आपली उपजीविका चालवीत होते. शिवानुग्रहानें त्यांना चौडाप्पा व

भद्राप्पा नांवाच्या दोन पुत्रांचा लाभ झाला होता. कांहीं काळानंतर बसवप्पा कैलासवासी झाला. त्यामुळें आपल्या मुलांची पालन पोषणाची जबाबदारी बसवाक्कावर पडली. ती तिनें योग्य रीतीनें पार पाडून त्यांना लहानाचे मोठे केले. चौडाप्पा सदाचारसंपन्न, उद्योगी व स्वकर्मनिष्ठ होता. त्याने वडिलांचा धंदा यशस्वीरीतीनें चालवून गांवांत नांवलौकिक मिळविला. सुदैवानें त्याला एक तेजस्वी व राजलक्षणांनींयुक्त अशा पुत्राची प्राप्ती झाली. त्यानें त्याचें नांव 'सदाशिव नायक' म्हणून ठेवलें. एकदां चौडाप्पाला त्याच्या स्वप्नांत एका संन्याशानें दर्शन देऊन "तुझ्या गांवाच्या परिसरांतील 'सीगे बैलू' नांवाच्या माळ-रानांत 'रामेश्वर लिंग' उद्भवले असून त्याच्यावर वारूळ वाढलें आहे; तुझी गाय तेथें दररोज गुप्तपणें जाऊन त्या वारुळावर आपल्या दुधाची धार सोडून येते; ती जागा खणून तेथील रामेश्वर लिंगाचा उद्धार कर; तेथेंच तुला भरपूर गुप्तधन व 'नागरमुरि' नांवाचें शक्तिशाली खड्ग लाभतील; तूं सदैव त्या रामेश्वर लिंगाची उपासना करीत गेल्यास, त्या खड्गाच्या सहाय्यानें पराक्रम गाजवून राज्य कमावशील," असें सांगून तो अंतर्धान पावला. त्याप्रमाणें पितापुत्रांनीं तेथें खणल्यावर त्याठिकाणीं त्यांना रामेश्वरलिंग, गुप्तधनाचा एक हंडा व खड्ग मिळाले. त्यामुळें हर्षभरित होऊन त्यांनीं त्या धनाच्या सहाय्यानें गांवांत देवालय बांधून त्यांत रामेश्वरलिंगाची विधियुक्त प्रतिष्ठापना केली व ते नित्य नियमानें त्याची पूजाअर्चा व आराधना करूं लागले. हें रामेश्वर देवालय सांप्रतही केळदी गांवांत आहे. दोघेही पितापुत्र जात्या धाडसी व पराक्रमी होते. त्यांत देवानुग्रह झाल्यामुळें त्यांचा आत्मविश्वास वाढला. गुप्तधनाचा उपयोग करून त्यांनीं फौजफाटा जमविला. त्या भागांतील पाळेगारांवर स्वाऱ्या करून त्यांचीं कांहीं गांवें त्यांनी आपल्या ताब्यांत घेतली. त्यावेळीं त्या भागावर विजयनगर सम्राटाचे राज्य होतें. परंतु त्यांच्या अमलाखालील तेथील लहान लहान पाळेगार त्यांना वरचेवर त्रास देऊन त्यांचा अंमल झुगारून देण्याचा प्रयत्न करीत. त्यांच्या त्रासाला कंटाळून व ह्या पितापुत्रांच्या पराक्रमाची कीर्ति ऐकून विजयनगर सम्राट अच्युत रायानें त्यांना विजयनगरला बोलावून घेऊन व मानसन्मान करून त्या बंडखोर पाळेगारांना वठणीवर आणण्याची विनंती केली. त्यांच्या विनंतीला मान देऊन त्या दोघा पितापुत्रांनी अतुल पराक्रमानें त्या बंडखोर पाळेगारांना वठणीवर आणून विजयनगर राजाशीं एकनिष्ठ राहण्याविषयीं त्यांच्याकडून हमी घेतली त्यामुळें अच्युतराय खुष होऊन त्यानें पितापुत्रांना पुन: विजयनगरास बोलावून घेतले व समारंभ भरवून त्यांचा मानमरातब करून गोंड, पालख्या, छत्र चामरें वगैरे बिरुदावळ्या अर्पण केल्या आणि केळदी चंद्रगुत्ती वगैरे आठ परगण्यांची मांडलिक राज्याची सनद त्यांना बहाल केली. त्यानंतर दोघेंही पितापुत्र

लवाजम्यासह आपल्या गांवाला परतले. सम्राटाच्या सनदेप्रमाणें सिद्धार्थी संवत्सर माघ शुद्ध तृतीयेच्या शुभमुहूर्तावर ( इ. स. १५०० ) चौडाप्पाचा पट्टाभिषेकोत्सव मोठ्या समारंभानें साजरा करण्यांत आला. याप्रमाणें इ. स. १५०० साली केळदी राज्याची रीतसर स्थापना झाली. तेव्हांपासून सुमारे २५० वर्षे म्हणजे सन १७६३ पर्यंत ह्या राजघराण्यानें कर्नाटकाच्या मलेनाड भागांत अखंड राज्य-कारभार चालवून त्या भागाची उन्नति केली. या राजघराण्याची वंशावळ खालीलप्रमाणें आहे.

**केळदी राजघराण्याची वंशावळ.**

| | | |
|---|---|---|
| १ | चौडाप्पा नायक | ( इ. स. १५००–१५१४ ) |
| २ | सदाशिव नायक | ( „ १५१४–१५४६ ) |
| ३ | दोड्ड संकण नायक | ( „ १५४६–१५५९ ) |
| ४ | चिक्क संकण नायक | ( „ १५५९–१५७१ ) |
| ५ | रामराज नायक | ( „ १५७१–१५८३ ) |
| ६ | हिरिय वेंकटप्प नायक | ( „ १५८३–१६३० ) |
| ७ | वीरभद्र नायक | ( „ १६३०–१६४६ ) |
| ८ | शिवप्पा नायक | ( „ १६४६–१६६१ ) |
| ९ | चिक्क वेंकटप्प नायक | ( „ १६६१–१६६२ ) |
| १० | भद्रप्प नायक | ( „ १६६२–१६६४ ) |
| ११ | हिरिय सोमशेखर नायक | ( „ १६६४–१६७१ ) |
| १२ | राणी चन्नम्माजी नायक | ( „ १६७१–१६९६ ) |
| १३ | हिरिय बसवप्प नायक | ( „ १६९७–१७१४ ) |
| १४ | दुसरा सोमशेखर नायक | ( „ १७१४–१७४० ) |
| १५ | बूदी बसवप्पा नायक | ( „ १७४०–१७५५ ) |
| १६ | चन्न बसव नायक | ( „ १७५५–१७५७ ) |
| १७ | राणी वीरम्माजी नायक | ( „ १७५५–१७५७ ) |
| १८ | किरिय सोमेश्वर नायक | ( „ १७५७–१७६३ ) |

**केळदीहून इक्केरीला राजधानीचें स्थलांतर.**

राज्यारोहण समारंभानंतर दोघेही पितापुत्रांनी केळदी आपली राजधानी करून आपल्या राज्याच्या समृद्धीकडे लक्ष पुरविले. ते जन्मतःच शेतकरी

असल्यामुळें त्यांनीं आपल्या राज्यात कालवे, तळीं वगैरे पाटबंधाऱ्याची व्यवस्था करून व शेतकऱ्यांना इतर साधनांची सोय करून देऊन शेतीची सुधारणा केली त्यामुळें ते आपल्या राज्यात फारच लोकप्रिय झाले. याप्रमाणें त्यांनीं आपल्या राज्यांत शांती व सुबत्ता स्थापन केली. हे दोघेही पितापुत्र एकदां शिकारीस गेले असतां इक्केरीं नांवाच्या एका लहानशा खेड्याजवळ एके ठिकाणीं एक ससा आपल्या शिकारी कुत्र्याचा पाठलाग करींत असतांना आढळला. तें पाहून ते आश्चर्यचकित झाले. ही शुराची भूमी आहे अशी त्यांना खात्री होऊन ती जागा त्यांनीं आपल्या वास्तव्याकरतां मुक्रर केली. त्यांनी तेथें राजवाडा बांधून आपली राजधानी तेथे हलवली. याप्रमाणें केळदी राज्याची राजधानी इ. स. १५१३ मध्यें इक्केरीस स्थलांतरित झाली. त्यानंतर एकच वर्षांत ( इ. स. १५१४ ) चौडाप्पानें इहलोकची यात्रा संपविली.

## सदाशिव नायक ( इ. स. १५१४–१५४७ )

चौडाप्पा नंतर त्याचा मुलगा सदाशिव नायक गादीवर आला. हा 'बापसे बेटा सवाई' असून बापाला त्यानें राज्य स्थापनेत व राज्यकारभारांत मदत केली होती. स्वतः गादीवर आल्यानंतर तर त्याच्या पराक्रमास व कर्तृत्व–शक्तीस जास्तीच वाव मिळाला. त्यानें आपल्या राज्याचा विस्तार वाढविला. एवढेंच नव्हे तर त्यावेळचा विजयनगरचा प्रख्यात सम्राट कृष्णदेवराय यास साम्राज्याचा विस्तार करण्यास मदत केली. विजयनगर साम्राज्याला वरचेवर त्रास देणाऱ्या विजापूर व गोवळकोंडाचे मुसलमानी बादशाहा यांच्या मुलुखावर त्यानें विजयनगरच्या सैन्यासह चाल करून जाऊन त्यांचे कल्याणदुर्ग, जमखंडी, गुलबर्गा वगैरे भाग जिंकून ते विजयनगर साम्राज्यास जोडले. त्यामुळें कृष्ण-देवराय खुष होऊन त्याचा मान सन्मान करून त्याला 'कोटे कोलाहल' व 'एकांगवीर' अशा पदव्या बहाल केल्या. कृष्ण देवरायाच्या प्रमुख सेनापती मध्यें त्याची गणना होत होती व तो त्याचा उजवा हात म्हणून समजला जात होता. बत्तीस वर्षेपर्यंत मोठ्या वैभवानें राज्यकारभार चालवून तो सन १५४६ साली शिवैक्य झाला.

## दोड्ड संकण्ण नायक ( इ. स. १५४६–१५५९ )

सदाशिव नायकाला 'दोड्डसंकण नायक' व 'चिक्कण संकण नायक' असे

दोघे पुत्र होते. त्याच्या मरणानंतर त्याचा वडील मुलगा 'दोड्डु संकण नायक' गादीवर आला. हा ज्याप्रमाणें शूर, धाडसी व कर्तबगार राज्यकर्ता होता त्याचप्रमाणें धार्मिक व सदाचार संपन्न असून परम शिवभक्त होता. त्यामुळें लोक त्याला 'राजर्षि' म्हणून गौरवानें संबोधीत विजयनगर सम्राटाच्या वतीनें त्यानें गोवा प्रांतावर स्वारीं करून, तो प्रांत जिंकून, विजयनगर साम्राज्यास जोडला. हा धार्मिक वृत्तीचा असल्यामुळें काही वर्षे राज्यकारभार पाहिल्यानंतर त्याची जबाबदारी आपल्या भावावर सोपवून तीर्थाटनास निघाला. भारतांतील रामेश्वर, श्रीशैल, केदार, प्रयाग, काशी, वगैरे प्रमुख पुण्यक्षेत्रांना भेटी देऊन तेथें अनेक रीतीनें दानधर्म केला. तीर्थाटनाच्या प्रवासात असतांना तो दिल्लीस आला. त्यावेळीं तेथें त्याच्या पराक्रमाची एक अनपेक्षित व अत्यद्भुत घटना घडली. दिल्ली शहरांत प्रवेश करीत असतांना तेथील वेशीवर टांगलेली एक तलवार पाहून त्याला आश्चर्य वाटले. सहजपणें त्यानें तेथील द्वारपालकाकडे चौकशी केली. तेव्हां बादशहाच्या तैनातीत अंकुशखान नांवाचा एक शूर धिप्पाड बलाढ्य लढवय्या असून कोणी आपणांशी द्वंद्वयुद्ध करून आपणाला पराजित करावें व ज्याची अशी तयारी असेल त्यानेंच ही टांगती तलवार काढावी, असें सर्वांना जाहीर आव्हान देऊन, बादशहाच्या अनुमतीने त्यानें ही तलवार येथें टांगविली आहे; असें द्वारपालकानीं नायकाला सांगितलें. हें ऐकून नायकाचे बाहू स्फुरण पावूं लागले. आपण त्याच्याशीं युद्ध खेळण्यास तयार आहो असें त्यानें द्वारपालकास सांगितलें. तें ऐकून द्वारपालक आश्चर्यचकित झाले. 'तुम्ही परदेशी आहांत तुम्हाला अंकुशखानाची माहिती नाहीं. तो एक अजस्र, धिप्पाड व पराक्रमी लढवय्या असून तुमच्या सारख्या अनेकांना त्यानें लोळविले आहे. विनाकारण विस्तवाशीं खेळून मरण कां ओढवून घेतां ?' असें त्यानें नायकाला सांगून, या साहसापासून त्याचें मन परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. परंतु नायकानें कांहीं एक न ऐकतां तो टांगती तलवार काढून घेतली. तेव्हां निरुपायास्तव द्वारपालकांनीं नायकाला बादशहाकडे नेऊन घडलेली सर्व हकीगत सांगितली. बादशहानें नायकाकडे त्याच्या नांवानिशीची व ठावठिकाणाची चौकशी केली. तेव्हां नायकानें आपला थांगपत्ता लागू न देता 'तीर्थयात्रा करीत फिरणारे आपण एक मुशाफिर आहोत' असें सांगितलें. बादशहानें अंकुशखानास बोलावून, दोघांची भेट करवून द्वंद्व युद्धाची वेळ मुक्रर केली व त्याची तयारी करण्यास हुकुम देऊन, द्वंद्वयुद्ध पहाण्यासाठी येण्यास सर्व अमीरउमरावाना आमंत्रणें पाठविली. ठरल्यावेळीं बादशाहा, सर्व अमीर उमराव व इतर प्रेक्षक, यांच्या मोठ्या जनसमुदायापुढें द्वंद्वयुद्धास प्रारंभ झाला. दोघेही वीर पराक्रमी व कसलेले लढवय्ये असल्यामुळें द्वंद्वयुद्ध फारच प्रेक्षणीय झाले. दोघाही वीरांचें

द्वंद्वयुद्ध पाहून प्रेक्षक मंत्रमुग्ध झाले व कुशल डावपेचाच्या वेळी हर्षोद्‌गार काढून त्यांना उत्तेजन देऊं लागले. परंतु बराच वेळपर्यंत कोणी कोणास हार जाईना. सरते शेवटी नायकानें योग्य संधी साधून मोठया कुशलतेनें व चपळाईनें खानावर जोराचा वार केला. त्यामुळे खानाला मरणान्तिक जखम होऊन तो धाडकन् जमीनीवर लोळला व तत्क्षणी मरण पावला. याप्रमाणें अजिंक्य समजल्या जाणाऱ्या खानावर विजय मिळविल्यामुळें बादशाहा व त्याचे अमीर उमराव नायकाचा अलौकिक पराक्रम पाहून आश्चर्यचकित झाले. त्यांनीं त्याचा मोठा सन्मान व गौरव करून व बहुमूल्य देणग्या देऊन त्याला निरोप दिला. याप्रसंगीं द्वंद्वयुद्धांत नायकानें वापरलेली तलवार त्याच्या आजाला शिवानुग्रहानें मिळालेली 'नागरमुरी' तलवार होती हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. अशाप्रकारे विजय संपादून तीर्थयात्रेहून परत आल्यानंतर त्यानें कांहीं वर्षे पुनः राज्यकारभार पाहिला. सन १५५९ सालीं तो शिवैक्य झाला. त्याच्या कारकीर्दीत त्यानें पुष्कळ दानधर्म केला. देवालयें बांधविली. श्रृंगेरी वगैरे धार्मिक मठांना देणग्या दिल्या. त्याच्यावेळीं राज्यात सुबत्ता नांदत होती.

## चिक्क संकण्ण नायक ( इ. स. १५५९–'५७१ )

त्याच्यानंतर त्याचा भाऊ चिक्क संकण नायक गादीवर आला. त्याच्या कारकीर्दीत घडलेली ऐतिहासिक घटना म्हणजे सन १५६५ सालीं विजयनगरची साम्राज्यशाही व विजापूर गोवळकोंडा वगैरे पाच मुसलमान पातशाही यांच्यामध्यें 'रक्कस तंगडगी' ( विजापूर जिल्हा ) येथें झालेले घनघोर युद्ध. ह्या युद्धांत चिक्क संकण्ण नायक विजयनगरवतीनें भाग घेऊन पराक्रमानें लढला. परंतु युद्धांत विजयनगर साम्राज्याचा रामराजा मारला गेला. त्यामुळें त्याच्या सैन्याचा पराभव होऊन त्याची धूळधाण उडाली. त्यामुळें चिक्कसंकण्ण नायक आपल्या राज्याला परतून त्याच्या संरक्षणाची तयारी केली. विजयनगरचे साम्राज्य बुडाल्यामुळें मुसलमान बादशाहांनी त्या साम्राज्याच्या मांडलिक राजांच्या प्रदेशावर हल्ले करून त्यांचे मुलूख बळकावले. त्याप्रमाणें त्यांनी केळदी राजावरही मोठया सैन्यानिशी स्वारी करून तो मुलूख बळकावण्याचा प्रयत्न केला. परंतु चिक्क संकण्ण नायकानें त्यांच्याशीं मोठया पराक्रमानें लढून त्यांचा हल्ला परतविला व आपल्या राज्याचें रक्षण केलें. त्यानंतरही वारंवार मुसलमानांनीं केळदी राज्यावर हल्ले केले. परंतु प्रत्येकवेळीं त्यांच्याशीं शूरपणानें लढून केळदी राजांनीं आपलें राज्य सुरक्षित राखले. अशा धामधूमीच्या वेळींही यशस्वीरीतीनें राज्यकारभार चालवून चिक्क संकण्ण नायक सन १५७१ सालीं शिवाधीन झाला.

त्याच्यानंतर रामराज नायक (१५७१–१५८३) हिरिय वेंकटप्प नायक (१५८३–१६३०) वीरभद्र नायक (१६३०–१६४६) असे तिघे राजे गादीवर आले. त्यांच्यानंतर सन १६४६ साली प्रख्यात राजा शिवप्पा नायक गादीवर आला. तो मोठा पराक्रमी असून त्यानें आपल्या कारकीर्दीत केळदी राज्याचें वैभव शिखरास पोंचविले. नष्ट झालेल्या विजयनगर साम्राज्याच्या राजाला आश्रय देऊन त्याच्याकरतां विजयनगर साम्राज्य पुनः स्थापन करण्याचा आटोकाट प्रयत्न केला. त्यामुळें त्याचें चरित्र मननीय व उव्दोधक आहे. त्याचप्रमाणें त्याच्यानंतर केळदी राज्याच्या गादीवर आलेल्या कांहीं राजकर्त्यांत राणी चन्नमाजी मोठी कर्तबगार व पराक्रमी राणी होऊन गेली. तिनें ऐन संकटाच्यावेळीं मराठेशाहीच्या राजाराम महाराजांना आश्रय देऊन मोठ्या शिताफीनें व सुरक्षितपणें त्यांना जिंजीला पोंचविले. त्यामुळें संतापून औरंगजेबानें केळदी राज्यावर हल्ला करण्याकरतां पाठविलेल्या अफाट मोंगल सैन्याशीं पराक्रमानें व गनिमी काव्यानें लढून तिनें त्या सैन्याची धूळधाण उडविली. अशा या पराक्रमी व कर्तबगार राणीचें चरित्रही रोमांचकारी व चित्तवेधक आहे. अशा या कर्तबगार दोघा राज्यकर्त्यांचा इतिहास पुढच्या लेखांकात दिला जाईल.



लेखांक १३

# केळदी (बिदनूर) वीरशैव राजघराणे

## (भाग २)

(सन १९६६ जून महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख)

केळदी (बिदनूर) राजघराण्यात शिवाप्पा नायक हे अत्यंत तेजस्वी पराक्रमी व प्रख्यात राजे होऊन गेले. ह्यांच्यापूर्वी गादीवर असलेल्या वीरभद्र नायकांनी केळदी राज्यावर मुसलमानांचे व इतर शत्रूंचे वरचेवर हल्ले होऊ लागल्यामुळें आपली राजधानी इक्केरीहून जास्ती सुरक्षित असलेल्या बिदनूरला हलविली. ह्या वीरभद्र नायकाचा भाऊबंद शिवाप्पा नायक. वीरभद्र नायकाला संतान नसल्यामुळें व त्याला शिवाप्पा नायक ह्याच जवळचा वारस असल्यामुळें तोच गादीचा भावी मालक होता. त्याकरता वीरभद्र नायकानें शिवाप्पा नायकाच्या शिक्षणाची विशेष काळजी घेऊन राज्यकारभारास आवश्यक असें सर्व शिक्षण त्याला देवविले. शिवप्पा हा जन्मतःच चलाख, तडफदार व बुद्धिमान असल्यामुळें थोडयाच काळात राजकर्त्याला आवश्यक असलेल्या सर्व विद्यामध्यें त्यानें पारंगतता मिळवली. तो वयात आल्यानंतर वीरभद्र नायकानें गंगम्माजी व शांतम्माजी नांवांच्या दोघा कुलीन घराण्यांच्या मुलीशीं त्यांचें लग्न लावले.

त्यानंतर शिवाप्पा वीरभद्र नायकाच्या राज्यकारभारांतही सहाय्य करू लागला. तरिकेरेचा नायक वरचेवर केळदी राज्याच्या सीमाभागांत हल्ले करून वीरभद्र नायकाला त्रास देत होता; म्हणून त्याचा बंदोवस्त करण्याकरतां वीरभद्र नायकानें सैन्यासहित शिवप्पास त्याच्यावर स्वारी करण्यास पाठवले. त्या स्वारीत शिवाप्पा नायकानें तरिकेरे नायकाचा पराभव करून त्याचें राज्य केळदी राज्याला जोडले. तसेच मुसलमानानी व इतर हित शत्रूंनी वरचेवर केळदी राज्यावर करीत असलेल्या हल्ल्यांस धैर्याने तोंड देऊन राज्याचे सरंक्षण केले, व राज्यांत शांतता व स्थिरस्थावरता स्थापन केली. त्यानंतर शिवाप्पाला स्वतंत्र राज्यकारभाराचा अनुभव मिळावा म्हणून वीरभद्र नायकानें त्याला आपल्या राज्याच्या चंदावर प्रदेशाचा राज्यकारभार पाहण्यास पाठविलें. तेथेंही त्यानें उत्तमरीतीनें राज्यकारभार चालवून त्या प्रांताची भरभराट केली. वीरभद्र नायकाचें वय झाल्यामुळें व त्याची प्रिय पत्नी वारल्यामुळें संसारातून व राज्यकारभारातून त्याचें मन उडून अंगीं वैराग्यवृत्ती बाणली. त्याचा बहुतेक वेळ धार्मिक कार्यें व तीर्थयात्रा करण्यात जाऊं लागला. तो राजधानीत क्वचितच राहात असे. ह्या परिस्थितीचा फायदा घेऊन त्याचे कांहीं मंत्री व सरदार शिरजोर होऊन बसले. तेव्हा विघडत चाललेली ही परिस्थिती ओळखून वीरभद्र नायकानें शिवाप्पा नायकाला बोलावून घेऊन त्याच्याकडे सर्व राज्यसूत्रें सोपविली. साहजिकच शिवाप्पा त्या शिरजोर लोकांना काबूत ठेवण्याचा प्रयत्न करू लागला. ते त्यांना सहन न होऊन शिवप्पाला जगातूनच नाहीसे करून राज्यकारभार आपले हाती घेण्याचा त्यांनी कट केला. त्याप्रमाणे त्यांनी शिवाप्पाच्या कांहीं सहाय्यकांना वश करून घेऊन व संधि साधून एके दिवशी त्यांनी त्याना व त्याचा भाऊ वेंकटप्पाला एका एकांतस्थळीं कोंडले व त्यांना ठार मारण्याचा घाट घातला. परंतु त्या दोघा भावांच्या हातांत शस्त्रें असल्यामुळें आंत शिरून त्यांना ठार मारण्याचे धैर्य कोणालाच होईना. बाका प्रसंग आळखून ते दोघेही बंधू गर्भगळित न होतां धैर्यानें दरवाजा फोडून बाहेर पडले. तेव्हां तेथें जमलेले त्यांचे सर्व शत्रू पळून गेले. नंतर शिवाप्पानें त्या सर्वांना पकडून यमसदनीं पाठवून दिले. याप्रमाणें सर्व अंतःशत्रूंचा बंदोवस्त करून राज्यांत स्थिरस्थावरता प्रस्थापून कंडलूर येथें राहात असलेल्या वीरभद्र नायकाकडे जाऊन, राजधानीला परत येऊन राज्यधुरा पुनः वाहण्याची त्यानें त्याला विनंती केली. परंतु वीरभद्र नायकानें त्याला आपली संमती दिली नाहीं. थोड्या काळानंतर वीरभद्र नायक सन १६४६ सालीं शिवैक्य झाला.

## शिवाप्पा नायकाचा पट्टाभिषेक व नंतरचा राज्यकारभार.

शिवाप्पा नायक पूर्वीपासूनच राज्यकारभार पहात असला तरी त्याचा विधियुक्त सिंहासनारोहण समारंभ वीरभद्र नायकाच्या मरणानंतर शके १५६८ मार्गशीर्ष शुद्ध १२ दिवशीं ( सन १६४६ ) शुभ मुहूर्तावर विदनूर ( वेणुपूर ) राजधानींत मोठ्या थाटानें व वैभवानें करण्यांत आला. पट्टाभिषेकानंतर त्यानें प्रथम शत्रूंनीं बळकावलेले आपल्या राज्याचे पूर्वीचे भाग परत मिळवून आपलें राज्य बलाढ्य करण्याकडे लक्ष दिलें. विजापूर बादशहानें व आजूबाजूच्या पाळेगारांनी संधी साधून केळदी राज्याचा कितीतरी प्रदेश व्यापला होता. राज्याच्या पूर्वीच्या राजधान्या केळदी व इक्केरी हे सुद्धा शत्रूंनी बळकावले होतें. करितां, त्या सर्व प्रदेशावर स्वारी करून व तेथून शत्रूंना हाकलून लावून केळदी, इक्केरी, सोरब, शिरसी, बनवासी वगैरे आपल्या राज्याचा पूर्वीचा सर्व प्रदेश काबीज करून परत आपल्या राज्याला जोडला. तसेंच बिळगी व स्वादी येथील राजेही वरचेवर केळदी राज्यावर स्वारी करून त्रास देत होते. म्हणून त्यांच्या हीं राज्यावर चालून जाऊन, त्यांचा पाडाव करून, त्यांना आपले मांडलिक बनविले.

## शिवाप्पाची शिस्त.

या प्रमाणें आपल्या राज्याचा विस्तार वाढवून व त्याची संघटना करून राज्य बलाढ्य केल्यानंतर त्यानी आपल्या राज्याच्या अभिवृद्धीकडे लक्ष दिले. विदनूर राज्याचा प्रदेश सुपीक असून तेथील पर्जन्यवृष्टी व हवामानही शेतीला अनुकूल असल्यामुळें त्या भागात ऊंस, भात, केळी, नारळ, सुपारी, मिरे, वेलदोडे वगैरे मुल्यवान पिकें चांगली पिकत असत. परंतु उन्हाळ्यांत पाण्याचा सांठा नसल्यामुळें बागायत शेतीची व्हावी तशी वाढ झालेली नव्हती. करितां, त्यानें आपल्या राज्यात ठिकठिकाणी तळीं बंधारे बांधून आपल्या रयतांना पाटबंधाऱ्याची व्यवस्था करून दिली. तसेच सरकारनें लोकाकडून शेतसारा वसूल करण्याची कांहीं नियमबद्ध पद्धती नव्हती. सरकारी अधिकाऱ्यांनी अजमासानें साऱ्या गांवच्या शेतसाऱ्याची रक्कम गांवकामगारांना कळवावयाची व सर्व गांवकऱ्यांनी मिळून तेवढी रक्कम सरकारात भरावयाची, हीच पद्धत त्यावेळी प्रचलित होती. त्यामुळें गांवातील श्रीमंत वजनदार व वशिलेबाजीच्या लोकांना त्या पद्धतीचा फायदा मिळत होता. परंतु त्यामुळें गरीब रयत मात्र अवजड शेतसारा भरण्यात रगडले जात होते. ही परिस्थिती जाणून ह्या बाबतीत कोणावरही अन्याय होऊ नये म्हणून शिवाप्पाने एक नवीनच शेतसारा पद्धति तयार करून ती अंमलात

आणली. ही त्याची योजना सर्वसाधारणपणें सांप्रतच्या शेतसारा पद्धति प्रमाणेच होती. शेतीयोग्य जमीनीच्या पांच प्रती ठरवून व आपल्या राज्यातील सर्व शेतीजमीनीची मोजणी करवून प्रत्येक शेतकऱ्याच्या जमीनीचें क्षेत्र व त्याची प्रत ठरवून दिली. तसेच प्रत्येक प्रतीच्या शेतातील पिकांचे सरासरी उत्पन्न ठरवून त्या उत्पन्नाच्या प्रमाणावर प्रत्येकाचा शेतसारा ठरवून दिला. या पद्धतीमुळें गरीब व लहान शेतकऱ्यावर होणारा अन्याय दूर झाला एवढेच नव्हे तर सरकारच्या शेतसारा उत्पन्नांतही चांगली भर पडली. शिवाप्पानें अमलात आणलेल्या ह्या योजनेस 'शिवाप्पाची शिस्त' असें नांव आहे. ब्रिटिश काळांत ह्या भागात अंमलात आणली गेलेली शेतसाऱ्याची पद्धत ह्या 'शिवाप्पाची शिस्त' च्या योजनेवरच आधारलेली आहे. ह्याच्या वरूनच शिवाप्पाची अलौकिक बुद्धिमता, कल्पकता व प्रजाहित दक्षता वगैरे गुण ठळकपणे दिसून येतात.

### विजयनगर साम्राज्याच्या पुन:स्थापनेचे प्रयत्न.

शिवाप्पा नायकाच्या कारकीर्दीत घडलेली दुसरी महत्त्वाची घटना म्हणजे त्यावेळी मोडकळीस आलेल्या विजयनगर साम्राज्याचा राजा रंगराय यास आश्रय देऊन त्याच्यासाठी विजयनगर साम्राज्याची पुनर्घटना करण्यासाठी त्यांनी केलेला स्वार्थत्याग व आटोकाट प्रयत्न. रक्कसतंगडगी (विजापूर जिल्हा) लढाईनंतर विजयनगर साम्राज्याची धूळधाण उडाली व त्याचे राजे पेनुकोंडाला जाऊन तेथे मुसलमानांच्या ताबडीतून बचावलेल्या आपल्या राज्याच्या लहानशा भागावर राज्य करीत होते. परंतु मुसलमानानी त्यांना तेथेंही सुखानें राहू दिले नाहीं. त्यावेळी रंगराय नांवाचा त्या राज्याचा राजा होता. राज्याची राजधानी पेनुकोंडा असली तरी तो सुरक्षिततेकरतां बेलोरला राहात होता. विजापूर व गोंवळकोंडा बादशहाच्या सैन्यांनी त्याच्या राज्यांत धुमाकूळ माजवून त्याचा वहुतेक भाग आपल्या कबजात घेतला, व शेवटीं बेल्लोरवर हल्ला करून तेही ताब्यात घेतलें, व रंगरायाचें आश्रयस्थानही नाहींसे करून त्याला देशोधडीस लावले. तेव्हा रंगरायानें साम्राज्याच्या पूर्वीच्या कांही मांडलिकाकडे आश्रय मागितला. परंतु मुसलमानाच्या भीतीनें त्याला कोणीही आश्रय दिला नाहीं. तेव्हा तो हतबुद्ध होऊन शेवटचा उपाय म्हणून शिवप्पा नायकाकडे आला. बिदनूरचे राजे पुर्वीपासूनच विजयनगर साम्राज्याचे मांडलिक व चहाते होते व तें साम्राज्य समृद्धशाली करण्यासाठी त्यांनी सम्राटांना वेळोवेळीं मदतही केली होती. विजयनगरच्या सम्राटांनीही बिदनूर राजांचें महत्व ओळखून, व त्यांची आपणाला झालेली मदत लक्षांत घेऊन, ते त्याचा मानमरातब मोठ्या आदराने व गौरवानें

राखीत होते. परंतु रक्कस तंगडगी लढाईनंतर विजयनगर साम्राज्याची वाताहत झाल्यामुळें व त्याचे राजे विदनूरपासून दूर असलेल्या पेनुकोंडा गावी जाऊन राहिल्यामुळें पूर्वीचा त्यांच्यामधील स्नेहसंबंध तुटला होता. परंतु शिवाप्पानें आपल्या घराण्याचे त्या राजघराण्याशी पूर्वी असलेले स्नेहसंबंध ओळखून रंगराय राजास आश्रय दिला व राजाला शोभेल असा मानमरातब ठेवला. त्यावेळीं शिवाप्पा नायकाचे राज्य अरबी समुद्राच्या पश्चिम किनाऱ्यापासून पूर्वेस कर्नाटकाच्या सीमेपर्यंत मलेनाडचा बहुतेक सर्वभाग व्यापलेला होता. तसेंच सुमारे ५०,००० खडे पायदळ व ३०,००० घोडेस्वार शस्त्रास्त्रानें सुसज्ज असें मोठें सैन्य त्याच्या पदरी होते. विजयनगर साम्राज्याची दुःस्थिती व त्यामुळे दक्षिण हिंदुस्थानात हिंदुधर्मीयांची झालेली पीछेहाट लक्षात घेऊन विजयनगर साम्राज्याची पुनर्स्थापना करण्याचा त्यानें निश्चय केला, व त्याप्रमाणे जय्यत तयारी करून त्यानें बेल्लोरवर स्वारी केली. तेव्हा हिंदू व मुसलमान यांच्यामध्यें घन-घोर युद्ध होऊन त्यांत मुसलमानांचा पाडाव झाला, व पूर्वी रंगरायाच्या ताब्यांत असलेला सर्व मुलुख शिवाप्पानें जिंकून व बेलोर येथें रंगरायाची पुनः स्थापना करून, तो सर्व मुलुख त्याच्या ताब्यात दिला. त्यामुळे खुष होऊन रंगरावाने शिवाप्पाला बहुमोल देणग्या व किताब देऊन व मोठ्या समारंभानें त्याचा सन्मान करून, त्यानें आपल्यावर केलेल्या उपकाराबद्दल कृतज्ञता व्यक्त केली. याप्रमाणें मुसलमानांवर दिग्विजय संपादन करून व विजयनगर साम्राज्याच्या पुनःर्स्थापनेला प्रारंभ करून शिवाप्पा विदनूरास परतला. ह्या दिग्विजयामुळें शिवाप्पा नायकाची कीर्ती सर्व दक्षिण हिंदुस्थानात पसरली व तेथील सर्व राजे व विजापूर, गोवळकोंडा येथील मुसलमान बादशाहा सुद्धा त्याला वचकून वागू लागले. त्याचप्रमाणे विजयनगर साम्राज्याची पुनर्स्थापना होण्याची शुभचिन्हे दिसू लागल्यामुळे दक्षिण हिंदुस्थानातील सर्व जनताही आनंदित झाली.

**श्रीरंग पट्टणवर स्वारी.**

याप्रमाणें विजयनगर साम्राज्याच्या पुनःस्थापनेचा पाया घातल्यानंतर शिवाप्पा स्वस्थ न बसतां हातीं घेतलेलें महत्कार्य तडीस नेण्याच्या उद्योगाला लागला. रक्कस तंगडगी लढाईमुळें विजयनगर साम्राज्याची वाताहत झाल्यानंतर त्याचा कांहीं भाग मुसलमान बादशहांनीं बळकावला. परंतु त्याच्यापेक्षांही जास्ती भाग त्या साम्राज्याच्या हिंदू मांडलिकानी बळकावून ते स्वतंत्र राजे बनले होते. अशा राजापैकीं म्हैसूरचा राजा ह्याही एक होता. त्यानें श्रीरंगपट्टण व त्याच्या भोंवतालचा विजयनगर साम्राज्याचा भाग बळकावून तो आपल्या राज्यास जोडला

होता. शिवाप्पानें तो भाग विजयनगर राज्यास परत करण्याची विनंती म्हैसूर राजास केली परंतु त्यानें ती धुडकावली. तेव्हां शिवाप्पानें त्या भागावर स्वारी करून श्रीरंगपट्टण किल्ल्यास वेढा दिला. शिवाप्पाच्या सैन्यदलापुढें आपलें सैन्यबळ टिकणार नाहीं हे जाणून म्हैसूर राजानें मागचा पुढचा विचार न करतां विजापूर बादशहाची मदत मागितली. विजापूर बादशहाला तेवढेंच पाहिजे होते. त्यानें तावडतोड आपले मोठे सैन्य त्याच्या मदतीला धाडले. म्हैसूर राजाच्या ह्या आपमतलबी कृत्यावरून त्यावेळच्या कांहीं हिंदू राजांच्या स्वधर्माभिमानशून्यतेची कल्पना येते. बादशहाचे सैन्य म्हैसूर राजाच्या मदतीस आल्यामुळें दोन्ही पक्ष समबल झाले व कितीतरी दिवस त्यांच्यामध्यें घनघोर युद्ध चाललें. परंतु दुर्दैवानें कांहीं दिवसानंतर शिवाप्पा आजारी पडले. युद्धाचे नेतृत्व सर्वस्वी त्याच्यावर अवलंबून असल्यामुळें व ह्या नेतृत्वाची जबाबदारी स्वीकारण्यास दुसरा कोणी लायक वीर नसल्यामुळें श्रीरंगपट्टणाचा वेढा उठवून त्यांना आपल्या राजधानीस परत यावे लागले. या आजारातून ते बरे झालेच नाहींत. शेवटीं सन १६६१ सालीं त्यातच त्यांचें देहावसान झालें. याप्रमाणे त्यांनी सुमारें १५ वर्षांची आपली यशस्वी व कर्नाटकाच्या भाग्योदयाची कारकीर्द गाजवून ते शिवैक्य झाले.

## राज्याभिवृद्धीचें कार्य.

शिवाप्पा नायक जसे महापराक्रमी व रणधुरंधर वीर होते त्याचप्रमाणें ते अत्यंत निष्णात व प्रजाहित–दक्ष राज्यकर्ते होते. आपल्या राज्यातील शेतसाऱ्याची शिस्तबद्ध योजना अमलात आणून, तळीं व पाटबंधारे बांधून त्यांनी आपल्या रयतेचा दुवा कसा मिळवला याचें वर्णन वर आलेंच आहे. त्याच्या राज्यात सुपारी, वेलदोडे, मिरे वगैरे मसाल्याची पिके मुबलक प्रमाणांत पिकत असल्यामुळें तेथें इंग्रज, फ्रेंच, पोर्तुगीज वगैरे परदेशस्थ व्यापाऱ्यांनी आपले ठाण मांडून ह्या मूल्यवान जिन्नसांचा व्यापार सुरू केला होता. ह्या जिन्नसांच्या निर्यातीमुळें राज्यातील शेतकऱ्यांना चांगला फायदा मिळत होता. राज्यांतील व्यापारोद्योगही वाढले होते. तसेच ह्या व्यापारामुळें सरकारच्या खजिन्यांतही चांगली भर पडत असे. ह्या राज्याभिवृद्धीच्या कार्यांत ह्या व्यापाराचें महत्त्व जाणून त्यांनी त्यास उत्तेजन देण्याकरतां आपल्या राज्याच्या सर्व भागांत उत्तम रस्ते तयार केले व इतर रीतीनेंही त्याला उत्तेजन दिलें. ह्या पिकाच्या वाढीसही त्यांनी अनेक रीतीनें मदत केली. तसेंच राज्यांत उत्तम बंदोबस्त ठेवून व सर्व प्रजेला न्यायीपणानें व दयार्द्र दृष्टीनें वागवून राज्यात शांतता व सुबत्ता प्रस्थापित केली व जनजीवनात स्थिरता व सुरक्षितता स्थापन केली. ह्यावेळीं बिदनूर

राज्यांत नांदत असलेली शांतता व सुबत्ता यांचे 'जाकोबस क्यांटर विस्साजर' नांवाच्या एका परदेशस्थ प्रवाशानें फार बहारदार वर्णन केले आहे. तें खालील-प्रमाणें आहे.

### परदेशस्थ प्रवाशाचे प्रशंसोद्‌गार.

"The Bednur prince is much more magnificient and powerful than those of Malbar. His kingdom produces many peculiar commodities such as sandalwood, which is found there in great abundance, as well as rice. Bednur is grainery of all Southern India. The city, where Raja holds his court, lies some leagues in land and is connected with the sea-port by a fine road, planted with trees, which the inhabitants are obliged to keap in excellent order. This road is so secure that any stranger might go and sleep there with bags full of money, and nobody would molest or rob him. For, if such a thing occured the people in the neighbourhood would not only be severely punished but would be forced to make good the money."

"बिदनूरचा राजा मलबारच्या राजापेक्षांही बलिष्ठ व वैभवशाली आहे. त्याच्या राज्यात कितीतरी विशिष्ट तऱ्हेचे जिन्नस तयार होतात. येथें चंदन पाहिजे तेवढे मिळते व भातही भरपूर प्रमाणात पिकतो. बिदनूर राज्य दक्षिण हिंदुस्थानचें धान्य कोठार आहे. राजाची राजधानी समुद्र किनाऱ्यापासून कांहीं मैल अंतरावर आहे. ती समुद्रतीरावरील बंदराला उत्तम रस्त्याने जोडली गेली आहे. ह्या रस्त्याच्या दोन्ही बाजूस झाडें लावली गेली आहेत. ह्या झाडांची उत्तम निगा राखण्याची जबाबदारी जवळपास राहणाऱ्या रहिवाशावर टाकली गेली आहे. हा रस्ता प्रवाशांना एवढा सुरक्षित आहे कीं, कोणी प्रवासी पैशानें भरलेल्या थैल्या घेऊन ह्या रस्त्यावर निजला तरी कोणी त्याच्या थैल्या चोरणार नाहीं कीं त्याला त्रास देणार नाहीं. कारण असें घडलें तर त्या भागांतील सर्व लोकांना कडक शिक्षा दिली जात असे. एवढेच नव्हे तर त्यांना चोरीस गेलेली रक्कमही भरणा करावी लागत असे."

### शिवाप्पानें केलेलें धार्मिक कार्य.

शिवाप्पा नायकाच्या राजकीय कर्तबगारीला धार्मिक वृत्तीचीही जोड मिळाली होती. आपल्या कारकीर्दीत त्यांनीं केलेली धार्मिक कार्ये वाखाणण्याजोगी

आहेत. त्यांचें स्वतःचे आचरण तर अत्यंत धार्मिक व नीतियुक्त होतेच, परंतु त्यांनी आपल्या राज्यांतील मठमंदिरांना व देवालयांना अनेक देणग्या देऊन व स्वतःही कांहीं देवालयांची स्थापना करून आपल्या प्रजाजनांची धार्मिक प्रवृत्ती व नीतिमत्ता वाढविण्याचा प्रयत्न केला. श्रीशंकराचार्यांचा सुप्रसिद्ध श्रृंगेरीमठ व पादपूज्य पंचाचार्यांपैकी जगद्गुरु आद्यरेणुकाचार्य यांचा बाळेहळ्ळी सद्धर्म सिंहासन मठ ह्या केळदी राज्याच्या प्रदेशातच आहेत. शिवाप्पा नायकांनी ह्या धर्मपीठांना मोठमोठ्या देणग्या देऊन त्यांच्या पीठाधिपतींचा मानसन्मान केला. त्याप्रमाणें त्यांनी आपल्या राज्यातील मुसलमान व ख्रिश्चन लोकांच्या मशीदींना व चर्चनाही देणग्या दिल्या. धार्मीक बाबतीत त्यांनी कोणत्याही रीतीने धर्मभेद अथवा पंथ-भेद न करतां आपल्या राज्यातील सर्व धर्मीयांना समतेनें वागवून त्यांना सढळ हातानें मदत केली. सन १६५५ सालीं त्यांनी आपले बंधु वेंकटप्पासह भारता-तील प्रमुख तीर्थक्षेत्रांना भेट दिली. या तीर्थाटनांत त्यांनी श्रीक्षेत्र वाराणसीलाही ( काशी ) भेट देऊन तेथील शैवमठाला मोठी देणगी दिली. ह्या देणगीबद्दलचा त्यांनी करून दिलेला ताम्रपट अजूनही त्या मठात आहे. तसेंच त्यांनी आपल्या खर्चानें तेथील कपिलधार तीर्थाचा जीर्णोद्धार करून त्याबद्दलचा शिलालेख कोरला आहे. हा शिलालेख कन्नड, तेलगु, हिंदी, संस्कृत व फारसी ह्या पांच भाषांत पांच निरनिराळ्या शिलांवर कोरलेला असून, हे पांचही शिलालेख सांप्रत तेथे पहावयास मिळतात.

### शिवाप्पा नायकाचे स्मारक.

वरील सर्व हकीगतीवरून शिवाप्पा नायकांनी आपल्या कारकीर्दीत कर्नाटकच्या मलेनाड भागातील आपल्या राज्याच्या समृद्धीकरितां केलेल्या महत्कार्याची कल्पना येईल. सांप्रतही त्या भागांतील लोक त्यांचें गुणगान गाऊन आदरभावानें व गौरवयुक्त शब्दानें त्यांनी केलेल्या कार्याचा उल्लेख करतात. त्या भागाचे सांप्रत मुख्यस्थळ शिमोगा येथील नगरपालिकेनें त्यांच्या स्मारकार्थ अलिकडे त्यांचा भव्य पुतळा उभारला आहे.

या पुढील लेखांत या शिवाप्पा नायकाची कर्तबगार सून व मराठेशाहीच्या राजाराम महाराजांना कठिण प्रसंगीं मदत करून त्यांचें प्राण वांचविणारी राणी चन्नम्मा हिचें मनोवेधक व उद्बोधक चरित्र रेखाटलें जाईल.

लेखांक १४

# केळदी (बिदनूर) वीरशैव राजघराणे

## राणी चन्नम्माजी (सन १६७१-१६९७)

### (भाग ३)

(सन १९६६ जून महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख)

**सोमशेखर नायक (१६६४-१६७१).**

या घराण्याचे सुप्रसिद्ध राजे शिवाप्पा नायक सुमारे १५ वर्षाची आपली यशस्वी व भरभराटीची कारकीर्द संपवून सन १६६१ साली शिवैक्य झाले ही हकीगत मागच्या लेखात आलीच आहे. त्यानंतर शिवाप्पा नायकाचा भाऊ वेंकटाप्पा नायक गादीवर आला, परंतु तो एकाच वर्षात मरण पावला. त्याच्या नंतर शिवाप्पा नायकाचा मुलगा भद्रप्पा नायक राज्याचा मालक झाला. परंतु तोही दोन तीन वर्षात म्हणजे सन १६६४ सालीं वारला. त्याच्यानंतर शिवाप्पा नायकाचा दुसरा मुलगा सोमशेखर नायक गादीवर आला. त्याचे राज्यारोहण झाले तेव्हां तो अविवाहितच होता. हा बुद्धिमान, चतुर व देखणा असल्यामुळें व केळदी राज्यासारख्या राज्याचा मालक झाल्यामुळें अनेक मांडलिक राजे व पाळे-

गार त्याला आपल्या मुली देण्यास तयार होते. त्याकरतां खटपटही करीत होते. पण सोमशेखरनें त्याकडे दुर्लक्ष करून आपणाला योग्य अशी सद्गुणी व सुलक्षणी वधु निवडण्याचे ठरवून त्याप्रमाणें कोटीपूरचे सिद्दप्पा शेट्टी यांच्या चतुर, सुशिक्षित सुसंस्कृत व सुलक्षणीं कन्येची निवड केली व तिच्याशी मोठ्या थाटानें विवाह केला. हीच कन्या इतिहास प्रसिद्ध राणी चन्नम्माजी होय.

सोमशेखर गादीवर आल्याबरोबर म्हैसूर राज्याशीं युद्ध करण्याचा प्रसंग त्याच्यावर आला. त्यांत शूरपणाने लढून त्यानें म्हैसूर राजाचा पराभव केला. त्यामुळे चोहोंकडे त्याचा चांगला दरारा बसला. अशा रीतीने शिवाप्पा नायका-प्रमाणेंच त्याची ही कारकीर्द यशस्वीरीतीनें चालली होती. परंतु त्याचा उत्कर्ष सहन न होऊन कांहीं अंतस्थ राजद्रोही लोकांनी फितुरी करून त्याला अन्नातून मदोन्मत्त हत्तीला देण्याचें औषध चारले. त्यामुळें तो वेडा होऊन अनन्वित अत्याचार करू लागला. या परिस्थितीचा फायदा घेऊन ह्या राजद्रोह्यांनी त्याला ठार मारविले व राजघराण्याच्या दूरच्या एका आप्ताच्या मुलाला गादीचा वारस म्हणून जाहीर करून त्यानी राज्यकारभार आपल्या हातीं घेतला.

**चन्नम्मा राणी.**

त्यावेळी सोमशेखरची पत्नी चन्नम्मा अननुभवी व तरूण होती. तिला मूलबाळही झाले नव्हते. तिला धीर देण्यास व मदत करण्यास राजघराण्यातही कोणी राहिले नव्हते. परंतु ती जात्याच धीट, चतुर, बाणेदार व कर्तबगार होती. अशा परिस्थितीत बिदनूरास राहिल्यास आपल्याही जीवाला धोका आहे हें जाणून ती आपल्या काही निवडक स्वामीभक्त लोकांसह राज्याचीं दुसरी राजधानी मानल्या गेलेल्या भुवनगिरी किल्यांत राहावयास गेली. तेथून आपल्या लोका-मार्फत राज्यातील काही स्वामिभक्त सरदार व मांडलिक पाळेगार यांच्याशी संधान बांधून त्यांना वश करून घेतले. त्यांच्या सहाय्यानें उपरोक्त वारसदार मुलाला व त्याच्या नांवावर राज्यकारभार करीत असलेल्या राजद्रोह्यांना कैद करून राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. त्या भुवनगिरी किल्यातच सन १६७१ साली तिचा राज्यारोहण समारंभ साजरा करण्यात आला. कांहीं दिवस तेथूनच राज्यकारभार चालवून व बिदनूरातील सर्व राजद्रोह्यांचा बंदोबस्त करून तेथें स्थिरस्थावरता स्थापन केल्यावर ती बिदनूरला परत आली व तेथून राज्याचा सर्व कारभार पाहू लागली. या कामी तिला कासरगोडचा तिम्मण्णा नायक व कृष्णप्पय्या सबनीस यांचीं फार मदत झाली.

सोमशेखरला वेड लागल्यानंतर राज्यांत कांहीं काळ अशांतता माजल्यामुळें विजापूरचा बादशहा, सौदेचे व बीळगीचे राजे व इतर कांही पाळेंगार यांनी राज्याचा काही भाग वळकावला होता म्हणून त्या त्या भागावर, वरील दोघा सरदारांच्या सहाय्यानें स्वारी करून आपला सर्व प्रदेश तिने मिळवला. तसेच या अराजक काळांत राज्याचे कांहीं मांडलिक स्वतंत्र रीतीने वागत होते. त्यांच्यापैकी कांहींना दटावून व कांहीं जणावर स्वारी करून त्यांना वठणीवर आणले. अशारीतीनें अगदीं आणीवाणीच्या विकट प्रसंगातून पार पडून व राज्याच्या सर्व शत्रूंचा नायनाट करून राज्यांत शांतता व सुवत्ता स्थापन केल्यामुळें चोहोकडे तिचा दरारा बसला व पराक्रमी व राज्यकार्यधुरंधर व कर्तबगार राणी म्हणून सर्वत्र तिची ख्याती झाली. गोवळकोंडा बादशहाचे, पेद्दूर लिंगाण्णा नांवाच्या त्याच्या एका विश्वासू सरदाराशी वैमनस्य उत्पन्न झाल्यामुळे, त्या सरदारानें भिऊन पळून येऊन चन्नम्मा राणीकडे आश्रय मागितला. तेव्हां राणीनें त्याला आश्रय देऊन त्याचे संरक्षण केलें. त्यामुळें गोवळकोंडा बादशहा चिडला तरी त्या पराक्रमी राणीपुढें आपला कांहीं निभाव लागणार नाहीं हें जाणून, हा अपमान सहन करून मूग गिळून स्वस्थ बसला.

### दत्तकपुत्र बसवराज.

राणी चन्नम्माला कांहीं मूलबाळ नव्हते म्हणून राज्याचे सर्व अधिकार आपल्याकडे घेऊन शांतता प्रस्थापित केल्यानंतर सन १६७३ सालीं संबंधित सर्व लोकांच्या संमतीनें आपल्या आप्तापैकीं एका प्रतिभासंपन्न व राजलक्षणयुक्त मुलास दत्तक घेऊन त्याला 'बसवराज' नामाभिधान केले. त्याचप्रमाणें त्याला राजोचित सर्व शिक्षण देऊन दोघा कुलशील राजकन्यांशीं त्याचें लग्न लावून दिले. तसेच त्याला आपल्या राज्यकार्यांतही सहभागी केले. याप्रमाणें राणीनें त्याला कर्तबगार राज्यकर्ता बनविण्याची दक्षता घेतल्यामुळें हा बसवराज सुद्धां पुढें मोठा विद्वान, पराक्रमी व राजकार्य धुरंधर राजा झाला.

### संकटकाळीं
### राजाराम महाराजांना आश्रय दिला.

महाराष्ट्रीयांच्या दृष्टीनें राणी चन्नमाच्या कारकीर्दीत सन १६९० सालीं घडलेली एक महत्वाची घटना येथें उल्लेखनीय आहे. छत्रपती शिवाजी महाराजांच्या मरणानंतर औरंगजेबानें संभाजी महाराजांना क्रूरपणें ठार मारून त्यांची

पत्नी येसूबाई व मुलगा शाहू यांना पकडून कैदेंत ठेवले. त्याचप्रमाणें राजाराम महाराजांनाही पकडून आणण्याकरतां त्यानें मोठे सैन्य रवाना केले. त्यावेळीं राजाराम महाराज पन्हाळगडावर राहात होते. मोगल सैन्याने येऊन पन्हाळ गडाला वेढा घातला. अफाट मोगल सैन्यापुढें आपला निभाव लागणार नाहीं, हें जाणून राजाराम महाराज आपल्या कांहीं स्वामीभक्त सेवकासह पन्हाळगडावरून गुप्तपणें निसटले व सुरक्षित आश्रयस्थानाकरतां दक्षिणेतील जिंजीकडे निघाले. राजाराम गडावरून निसटल्याची बातमी कळतांच मोगल सेनापतीनें कांहीं निवडक सैन्यासह त्यांचा पाठलाग केला. औरंगजेबाला ही बातमी कळतांच पाहिजे ते साहस करून राजाराम महाराजांना पकडलेच पाहिजे असा त्या सेनापतीला सक्त हुकूम दिला. त्यामुळें मोगल सैन्यानें सर्व ठिकाणची नाकेबंदी करून त्यांना पकडण्याकरतां जंग जंग पछाडले. परंतु राजाराम महाराज युक्ति प्रयुक्तीनें स्थलांतर करीत चित्रदुर्गाला पोंचून तेथील नायकाचा आश्रय मागितला. परंतु मोगलांना भिऊन त्यानें आश्रय देण्याचे नाकारले. प्रवासाच्या दगदगीनें राजाराम महाराजांची प्रकृति बिघडली होती; त्यामुळें त्यांना विश्रांतीची अत्यंत आवश्यकता होती. परंतु चित्रदुर्ग नायकाच्या नकारामुळें हताश होऊन केळदी राज्यात तरी आपणाला आश्रय मिळतो कीं काय पहावें म्हणून जवळच असलेल्या केळदी राज्याच्या हद्दीत प्रवेश करून तेथील होन्नळ्ळी नांवाच्या गांवात वस्ती केली. तेथून आपल्या एका सेवकाकडून आपल्या परिस्थितीचे निवेदन करणारे पत्र राणीकडे पाठवून अशा संकट समयीं आपणांस आश्रय देण्याची विनंती केली.

तो निरोप पोंचल्यानंतर राणीनें आपल्या प्रमुख मंत्र्यांशीं त्याबद्दल चर्चा केली. औरंगजेब बादशहाचा दरारा, त्याचा हट्टी व क्रूर स्वभाव, सर्वांना माहीत असल्यामुळें आश्रय देण्यास तिच्या मंत्र्यांनीं प्रथम असंमती दर्शविली. परंतु आपले सासरे शिवाप्पा नायकांनी आपल्या आश्रयास आलेल्या विजयनगरच्या रंगराव राजाला आश्रय देऊन त्याचे राज्य परत मिळवून देण्याकरतां आपले प्राणही वेंचले, ही गोष्ट राणीनें आपल्या मंत्र्यांच्या नजरेस आणून देऊन, प्राणावर बेतलेल्या संकटकाळी आपल्या आश्रयांस आलेल्या राजाराम महाराजांना आपण आश्रय दिला नाहीं तर तें आपल्या कुलपरंपरेला व शिवाप्पा नायकाच्या उज्वल कीर्तीला काळिमा लावल्यासारखे होईल. करितां आपणावर कोणतेही संकट ओढवले तरी न डगमगतां, त्याला तोंड देऊन राजाराम महाराजांना आश्रय देणें, आपलें पवित्र कर्तव्य आहे असे सांगून त्यांचें मन वळविले. नंतर राणीनें होन्नळ्ळीस आपली माणसे पाठवून राजाराम महाराजांना इतमामानें बिदनूरास आणविले. तेथें एका निराळ्या स्वतंत्र राजवाड्यांत त्यांची राहण्याची व्यवस्था केली.

यावेळीं राजाराम महाराजा बरोबर रूपाजी भोसले, संताजी जगताप, मानोजी मोरे व सर्जेराव असे चौघे स्वामिभक्त सरदार होते.

### औरंगजेबाचा खलिता.

चन्नम्मा राणीनें राजाराम महाराजांना आश्रय दिला ही बातमी मोंगल सेनापतीला कळल्यावर राजाराम महाराजांना आपल्या स्वाधीन करण्याविषयीं त्यानें राणीला खलिता पाठविला. ही बातमी औरंगजेबाला कळतांच त्याला राणीचें हे कृत्य उद्दामपणाचें वाटून तो संतप्त झाला. 'राजारामास आमच्या स्वाधीन करा, नाहींतर तुमचें राज्य धुळीस मिळवू' असा निर्वाणीचा खलिता त्यानेंही राणीकडे पाठविला. या बाबतीत राणीनें आपल्या मंत्र्याशी व राजाराम महाराजांशी वाटाघाट करून एक युक्ती योजली. यापुढे राजाराम महाराजांना आपल्या राज्यांत ठेवून घेणें धोक्याचें आहे हें जाणून त्यांचीं व त्यांच्या सेवकांचीं शस्त्रें, वस्त्रे व घोडे ठेवून घेऊन त्यांना दाक्षिणात्य वेष परिधान करविला व त्यांच्या बरोबर आपली कांही माणसे व इतर मदत देऊन त्यांना गुप्तपणे जिंजीकडे रवाना केले. नंतर आपल्याकडे राजाराम महाराज आले होते हें खरे, परंतु आपल्या खलित्याप्रमाणें त्यांना पकडून तुमच्याकडे पाठविण्याचा आमचा बेत आहे असे समजल्याबरोबर ते आपली शस्त्रें, वस्त्रें व घोडे वगैरे येथेच टाकून देऊन गुप्त वेषानें कोठेतरी पळून गेले. आम्ही ताबडतोब कसून शोध केला, तरी त्यांचा कांही तपास लागत नाही. अशा अर्थाचा खलिता लिहून तो बादशाहाकडे पाठवला व त्याबरोबर ती शस्त्रें, वस्त्रें व घोडेंही त्याच्याकडे रवाना केले. त्यावेळी बादशाहा दौलताबादेत होता.

### केळदी राज्यावर मोगल सैन्याची स्वारी.

राणीने ही युक्ती योजली तरी कुटिल राजकारणात मुरलेला धूर्त बादशहा त्यानें थोडाच फसणार आहे? राजारामाना पळून जाण्यास मदत करून, आपल्या तोंडावर हात फिरवण्याकरता राणीनें ही युक्ती योजली आहे, हें त्यानें ताडले. व त्यामुळें त्याच्या अंगाचा भडका उडाला. केळदी राज्यावर ताबडतोब स्वारी करून तें राज्य खालसा करून, राणीला चांगली अद्दल घडविण्याचा त्यानें निश्चय केला. ताबडतोब मोठ्या सैन्यासह कूच करून केळदी राज्य काबीज करावें व राणीला पकडून आपल्याकडे आणावे, असा आपला मुलगा अजमतार यास हुकुम दिला. राजाराम महाराजांना आश्रय दिल्यावेळेपासूनच राणीला

भावी संकटाची कल्पना होती. म्हणून तेव्हापासूनच तिनें शक्य तेवढी तयारी केली होती. शहाजाद्यानें केळदी राज्याच्या हद्दीपर्यंत येऊन तेथें तळ ठोकला व तेथूनच कूच करून राणीचे सरहद्दीवरील एकदोन किल्ले काबीज करून आपल्या ताब्यांत घेतले. नंतर सैन्यासह बिदनूरास येऊन त्याला वेढा दिला. बिदनूर शहर सपाट प्रदेशावर वसलेले असून त्याचा भुईकोट किल्ला मोंगलाच्या अफाट सैन्यापुढें फार दिवस टिकाव धरणार नाहीं याची जाणीव राणीला होती. परंतु केळदी राज्य डोंगराळ भाग असून जंगलानें व्याप्त होते. सह्याद्री पर्वताच्या पायथ्याशी असलेला हा प्रदेश महाराष्ट्राच्या मावळभागाप्रमाणें असून तेथील लोक शिवाजी महाराजांच्या मावळ लोकाप्रमाणें गनिमी काव्यानें लढण्यांत तरबेज होते. मोगल सैन्याशी तुलना करता आपलें सैन्य लहान असले तरी गनिमी काव्यानें त्यांच्याशी लढून आपण विजय मिळवूं असा राणीला आत्मविश्वास होता. म्हणून बिदनूरला वेढा पडण्यापूर्वीच निवडक सैन्यासह ती भुवनगिरी किल्यांत जाऊन तिने तेथें आपले ठाणें मांडले. भुवनगिरी किल्ला घनदाट जंगलात असून दऱ्या खोऱ्यांनी वेढलेले आहे. त्यामुळें तेथें मोगल सैन्याचा प्रवेश होणेंही मुष्कील होते. राणीने तेथून आपल्या राज्यातील लोकांशी दळणवळण ठेवून मोगलांशी गनिमी काव्यानें लढण्याकरीतां त्यांची संघटना केली. तिची स्वामीभक्त प्रजाही आपल्या राज्याकरतां कष्ट सोसण्यास व पाहिजे तें साहस करण्यास तयार होती. मोगल सैन्याची रसीद तोडणें, त्यांच्या सामानाची लूटालूट व जाळपोळ करून तें नष्ट करणें व टोळचा टोळयांनीं त्यांच्यावर छुपे हल्ले करणे, त्यांना ठार मारणें, अशा गनिमी काव्यानें त्यांच्याशी लढून त्यांना जेरीस आणले. तशांत त्या मावळ भागांतील मलेरिया वगैरे रोगराईनें मोगलांचे अनेक सैनिक पछाडले गेले. मोगल सैन्य अफाट असून त्यांना सपाट प्रदेशावरील लढाईचा अनुभव असला तरी दळण वळणाचे मार्ग नसलेल्या व जंगलानें व्याप्त असलेल्या डोंगराळ प्रदेशात गनिमी काव्यानें छुपे हल्ले करणाऱ्या सैन्याशी लढणें त्याना मुष्किलीचें होतें. सारांश शिवाजी महाराजांचे मावळ सैनिक डोंगराळ भागांत ज्या गनिमी काव्यानें मुसलमान सैन्याशी लढत त्याच पद्धतीनें लढून राणीनें व तिच्या प्रजाजनांनी मोगल सैन्याचा धुव्वा उडविला. त्यामुळें बहुतेक मोगल सैनिक निकामी झाले व त्यांचें धैर्य खचलें. या सर्व कारणामुळें शहाजाद्यानें केळदी राज्य जिंकणें अशक्य आहे हें जाणून वेढा उठविला व आपल्या सैन्यासह केळदी राज्यातून पाय काढला. औरंगजेब बादशहा एवढा हट्टी, क्रूर व दीर्घद्वेषी, परंतु या बाबतीत त्याचें कांहींच न चालल्यामुळें, झालेला अपमान गिळून हात चोळीत,त्याला स्वस्थ बसावे लागले. ह्या घटनेनंतर दक्षिण भारतातील औरंगजेबाच्या सत्तेला उतरती कळा लागली व त्याला ही घटना नांदीच ठरली.

### या घटनेच्या उल्लेखाचा अभाव.

अशा रीतीनें राणी चन्नम्मानें ऐन संकटकाळी राजाराम महाराजांना मदत करून त्यांचे प्राण वाचविले व पर्यायानें मराठेशाहीच्या बचावास मदत केली. एवढेंच नव्हे तर तिनें औरंगजेबासारख्या बलाढ्य व हटवादी बादशाहाशीं लढून, विजय संपादन केला. ही गोष्ट नुसत्या कर्नाटकाच्याच नव्हे तर भारताच्या इतिहासांत एक असामान्य व महत्वाची घटना आहे. परंतु भारताच्या इतिहासांत, एवढेच नव्हे तर श्री. छ. राजाराम महाराजांच्या चरित्रांत सुद्धां या घटनेचा उल्लेख आढळून येत नाही ही खेदाची गोष्ट आहे.

### राणी चन्नम्माचा अंत्यकाळ.

मोगल सैन्य केळदी राज्यातून निघून गेल्यानंतर राणीने आपल्या राज्यात पुनः स्थिरस्थावरता केली. व आपल्या राज्याच्या अभिवृद्धीकडे लक्ष दिले. तसेच ती धार्मिक वृत्तीची असल्यामुळें त्याकाळात तिने काही तीर्थक्षेत्रांना भेटी दिल्या व दानधर्मही केला. आपल्या प्रिय पतीच्या नावानें 'सोमशेखरपूर' नांवाची नवी वसाहत वसवून ते तिने ब्राह्मणाना दान दिले. याप्रमाणे सुमारे २५ वर्षाची आपली अलौकिक कारकीर्द गाजवून ही राणी सन १६९७ सालीं (शके १६२० ईश्वर संवत्सर) भुवनगिरी किल्ल्यात शिवैक्य झाली. सांप्रत तिची समाधी बिदनूर येथील कोपद मठांत आहे.

### राणीचे व्यक्तिमत्व.

चन्नम्मा राणी ज्याप्रमाणे कर्तबगार, राज्यकार्य धुरंधर व पराक्रमी होती त्याप्रमाणे ती सत्वशील व सदाचारी असून धार्मिक वृत्तीची होती. तिच्या देखरेखीखालीं तयार झालेला तिचा दत्तक पुत्र बसवराज हाही मोठा विद्वान व कर्तबगार राजा झाला. त्यानें 'शिवतत्त्व रत्नाकर' नांवाचा एक संस्कृत ग्रंथ रचला आहे. त्यात त्यानें आपल्या दत्तक आईनें आपणास लहानपणीं केलेला उपदेश नमूद केला आहे तो असाः मला समजण्याला कठिण असलेले अनेक विषय मला माझ्या आईनें समजावून सांगितले. नंतर मला माझ्या कर्तव्याची जाणीव करून देऊन खालील प्रमाणें उपदेश केला.

"दिलेलें वचन मोडू नकोस. तुझे कर्तव्य सोडू तूं नकोस. सदा मृदु

भाषण करीत जा. फसवणूक करणाऱ्या लोकापुढें मन मोकळे करून बोलू नकोस. कोणतेही पाप अथवा अधर्म करू नकोस. सतत भगवान् शिवाचे ध्यान करीत जा. आश्रित लोकांचे संरक्षण कर. कोणाचीही निंदा करू नको. संसार असार आहे आपणही अमर नाहीं, ही गोष्ट ध्यानांत बाळगून सतत धर्माने वागावे. संकट आल्यावेळी भिऊ नकोस. तसेच ऐश्वर्य आल्यावेळी गर्विष्ठ होऊ नकोस. देह नाशवंत असून कीर्तीच शाश्वत आहे. करिता, लोकांच्या प्रेमादरास पात्र होऊन मोक्षमार्गाचें अवलंबन कर सतत शांत चित्ताने रहा. आपल्या घराण्याचा गौरव कीर्ती यांचें सतत रक्षण कर."

स्वतः तिच्या पुत्रानेंच केलेल्या वर्णनावरून राणी चन्नम्माच्या असाधारण व अलौकिक व्यक्तिमत्वाची कल्पना येते. राणी ताराबाई, राणी अहिल्याबाई, झाशीची राणी लक्ष्मीबाई, कित्तूर चन्नम्मा देवी ह्या वीरांगना-प्रमाणेंच केळदीच्या राणी चन्नम्मानेंही आपल्या पराक्रमानें व कर्तबगारीनें आपले नांव भारताच्या इतिहासांत अजरामर करून ठेवले आहे.

## राजा बसवराज (१६९७–१७१५)

राणी चन्नम्माच्या निधनानंतर तिचा दत्तक पुत्र बसवराज गादीवर आला. त्याचा राज्यारोहण समारंभ सन १६९७ साली बिदनूर येथे झाला. त्यानेंही आपल्या आईची उज्वल परंपरा चालवून राज्याची अभिवृद्धी केली. हा राजा विद्वान असून संस्कृत व कन्नड भाषेत 'शिवतत्त्व रत्नाकर' 'सुभाषित सुरद्रुम' व 'सूक्ति सुधाकर' नांवाचे तीन ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकी 'शिवतत्त्व रत्नाकर' हा ग्रंथ अलिकडे मद्रास येथें प्रकाशित झाला असून त्याच्यावरून त्याच्या विद्वतेची व तत्कालीन परिस्थितीची कल्पना येते. त्यानें आपल्या काळांत रस्ते, पूल, कालवे वगैरे अभिवृद्धीची कार्ये करून आपले राज्य समृद्ध केलें.

राणी चन्नम्माच्या कारकीर्दीत बिदनूरचे राजघराणें व तंजावर येथील मराठे राजघराणें यांच्यामध्ये आकस्मिक रीतींने घडून आलेला स्नेहसंबंध ह्या बसवराजाच्या कारकीर्दीतही टिकून राहिला असे दिसते. तंजावरच्या चोक्कनाथ नांवाच्या एका तत्कालीन विद्वानानें 'सेवन्तिका परिणय नाटकम्' नांवाचे एक संस्कृत नाटक लिहिले आहे, तेही अलिकडे प्रकाशित झाले आहे. त्या नाटकाचा कथानायक हा बसवराजच आहे. तसेच या बसवराजाचे त्या काळचे एक तैल चित्र सांप्रतही तंजावरच्या प्राचीन ग्रंथसंग्रहालयात आहे, असे कळते. हा राजा सन १७१५ सालीं वारला.

**बसवराजानंतरची कारकीर्द.**

बसवराजानंतर त्याचा मुलगा दुसरा सोमशेखर ( १७१५-१७४० ) व त्यानंतर त्याचा पुतण्या बूदी बसवप्पा नायक यांनी अनेक विद्वानांना आश्रय देऊन त्यांच्याकडून ग्रंथ निर्माण करविले. त्यांच्या आश्रयाखाली असलेल्या विद्वानांत 'लिंगण्णा' नांवाचा विद्वान कवि होता. त्यानें 'केळदी नृपविजय' नांवाचा ऐतिहासिक ग्रंथ लिहिला आहे. त्यानें केळदी राजघराण्याचा साद्यंत इतिहास सविस्तर वर्णिला आहे. सांप्रत केळदी राजघराण्याच्या इतिहासाविषयीं निर्माण झालेले ग्रंथ ह्या प्राचीन ग्रंथाच्या आधारानें लिहिले गेले आहेत.

या बूदि बसवप्प नायकानंतर आणखी काहीं राजे गादीवर आले. परंतु त्यापैकी कोणी कर्तबगार नसल्या कारणानें राज्यास उतरती कळा लागलीं. हें राज्य पुढे कसेंवसें सन १७६३ पर्यंत टिकून राहिले. ह्या साली म्हैसूरच्या हैदरअल्लीने ह्या राज्यावर स्वारी केली व ते जिंकून आपल्या राज्याला जोडले. ह्याप्रमाणें सुमारें अडीचशे वर्षे ह्या राजघराण्यानें कर्नाटकात आत्म गौरवाने व वैभवानें राज्य करून आपली कारकीर्द गाजविली व कर्नाटकाची कीर्ति व समृद्धी वाढविण्यास हातभार लाविला.

**उपसंहार.**

सांप्रतच्या भारताच्या इतिहासात प्राचीन काळीं होऊन गेलेल्या मोठमोठ्या राजघराण्यांचा मात्र उल्लेख केलेला आढळून येतो. परंतु त्यांच्याप्रमाणेच लहान लहान राज्यांच्या कांहीं राजघराण्यांनी सुद्धा भारताचा इतिहास घडविण्यांत कसा सहभाग घेतला आहे हें केळदी राजघराण्याच्या इतिहासावरून दिसून येईल.

तेराव्या शतकापासून उत्तरेकडून प्रारंभ झालेल्या मुसलमानांच्या आक्रमणाला पायबंद घालून दक्षिण हिंदुस्थानचे संरक्षण केलेल्या विजयनगर साम्राज्याची भव्य व उज्वल परंपरा पुढे चालवून केळदी राजघराण्यानें कर्नाटकच्या इतहासांत आपलें नांव अजरामर करून ठेविले आहे. परंतु भारताच्या इतिहासांत त्याचा उल्लेखसुद्धा दिसून येत नाही, ही शोचनीय गोष्ट आहे.

लेखांक १५

# ' ज्ञानप्रसाद ' मासिकाच्या वाढदिवसानिमित्त

(सन १९६६ जानेवारी अंकाचा संपादकीय लेख)

' ज्ञानप्रसाद ' पाक्षिकाचे मासिकात रूपांतर होऊन एक वर्ष पूर्ण भरल्या नंतर त्याच्या पहिल्या वाढदिवशी ह्या मासिकाच्या दुसऱ्या वर्षाचा पहिला अंक वाचकांच्या हातीं देण्यांत आम्हाला सहर्ष धन्यता वाटत आहे. पाक्षिकाचे मासिकात रूपांतर करतेवेळी त्यांतील अनेक अडचणी आमच्या दृष्टीपुढे उभ्या राहिल्या. महाराष्ट्रीय वीरशैव नियत कालिकांचा दुर्दैवी गतेतिहास तर आम्हाला भेडसावीत होताच. त्यामुळें आमच्या पायाला खीळ बसली होती. करिता हे धडाडीचे परंतु धोक्याचे पाऊल उचलावें की नाही या विचारात आम्ही होतो. परंतु आमच्या मनांत वसत असलेल्या वीरशैव समाजाची सेवा करण्याच्या आंतरिक तळमळीनें आम्हाला स्वस्थ वसूं दिले नाहीं. तशांत समाजोन्नतीची कळकळ बाळगणाऱ्या आमच्या कांहीं मित्रांनी आम्हाला उत्तेजन दिलें. त्याच वेळीं समाजातही नवजागृतीचीं चिन्हे दिसू लागली. त्यामुळें उत्तेजित होऊन, भीतभीतच का होईना, हें धडाडीचें पाऊल आम्ही उचलले, व आज एक वर्ष-पर्यंत आमच्या शक्तीनुसार आम्ही मनोभावानें समाजाची सेवा केली. आमच्या मासिकाच्या वाढदिवसाच्या या शुभसमयीं आम्हाला सांगण्याला आनंद

वाटतो की समाजाकडून मिळणाऱ्या सहाय्य व सहकार्याबद्दल आमच्या मनात वसत असलेली भीती सुदैवानें निराधार ठरली व आमच्या अपेक्षेबाहेर आम्हाला समाजाकडून सहाय्य व सकीय सहानुभूती मिळाली. वस्तुत: आमच्या समाज बांधवानी या मासिकाबद्दल दाखविलेल्या आपुलकीने व सहानुभूतीमुळे आम्ही अक्षरशः भारावून गेलो आहोत. करितां, प्रथम आम्ही आमच्या मासिकाचे लेखक, वर्गणीदार, जाहीरातदार, व मासिकाला अन्यतऱ्हेने मदत करणारे मदतगार यांचे मनःपूर्वक आभार मानतो. तसेच मंगलप्रेस व नवमहाराष्ट्र सहकारी मुद्रणालयाचे संचालक मंडळ, सेक्रेटरी व मुद्रणालयाचे कर्मचारी यांनी आजपावेतो जें सहकार्य दिलें त्याबद्दल आम्ही त्यांचेही आभार मानतो. यापुढेंही याचप्रमाणें आपले सहाय्य व सहकार देऊन आम्हाला उत्तेजित करावें व आमच्याकडून होईल ती समाजसेवा करवून घ्यावी अशी त्यांना विनंती करतो.

मासिक यशस्वी रीतीने चालून त्याच्याकडून कांहींतरी समाजाची सेवा घडावयाची असल्यास मासिकाचा दर्जा उच्च ठेवून समाज बांधवाना उपयुक्त होतील असेच लेख व इतर मजकूर प्रसिद्ध करण्याचा प्रथमपासूनच आमचा मानस होता. त्याप्रमाणे तो उद्देश फलद्रूप करण्याच्या दृष्टीनें खर्चाकडे न पाहतां आम्ही आटोकाट प्रयत्न केले. परिणामत: सध्या मासिकाच्या वर्गणीदारांच्या संख्येत जी भराभर वाढ होत आहे व मासिकाच्या वाचकांकडून आम्हाला जीं पत्रें येत आहेत त्यावरून आमचा हा उद्देश सफल झाला आहे, असें आम्ही अभिमानानें सांगू इच्छितो. आमच्या मासिकाची गणना सांप्रत महाराष्ट्रातील अव्वल दर्जाच्या नियत कालिकांत होत आहे ही अभिमानाची व समाजाला भूषणावह गोष्ट आहे. असे असले तरी मासिकानें केलेल्या एवढया प्रगतीवरच आम्ही समाधान न मानतां त्यांत नव्या नव्या सुधारणांची भर घालून तें सर्वांगसुंदर व वाचकांना जास्ती उपयुक्त होईल असा प्रयत्न करण्याचा आमचा मानस आहे. आपल्या सर्वांच्या सहाय्यानें, सहकारानें व सहानुभूतीनें हाही आमचा उद्देश सफल होईल असा आम्हाला आत्मविश्वास वाटतो.

महाराष्ट्रीय वीरशैव समाजाची संघटना करून त्याची सर्वांगीण उन्नती करण्याच्या कार्यक्रमास हातभार लावणें व उच्च पातळीवरून अशा कार्यक्रमाचा प्रचार करणें हे आमच्या मासिकाचें ध्येय असल्याबद्दल आम्ही पूर्वीच जाहीर केले आहे. आजपर्यंत हे धोरण आम्ही काटेकोरपणानें चालवित आहोत, हे आमच्या वाचकांच्या लक्षात आले असेलच. आमचे हें मासिक आंता वैयक्तिक बाब

राहिली नाही. ते आतां वीरशैव समाजाच्या सेवेस सर्वस्वी वाहून घेतलेल्या 'अखिल भारतीय वीरशैव संघाचे मुखपत्र' म्हणून चालविले जात आहे. या संघाचेही ध्येय व धोरण वर लिहिल्याप्रमाणेच असून त्याचे ध्येय धोरणच मासिक अनुसरत आहे. म्हणून मासिकाचे संपादक अथवा संपादक मंडळाचे सभासद कोणीही असले तरी या ध्येयधोरणात बदल होणार नाही व मासिकाशी संबंध असलेल्या कोणाही व्यक्तीचे मत अथवा आवडी निवडी मासिकाच्या ध्येय धोरणाआड येऊ दिले जाणार नाहीं ही गोष्ट आम्ही येथे स्पष्ट करू इच्छितो.

या दृष्टीनें हें मासिक आतां अप्रत्यक्षपणें समाजाच्या मालकीचेच झाले आहे. ह्या आपुलकीच्या भावनेनेंच सर्व समाज बांधवांनी या मासिकाकडे पहावे अशी त्यांना आमची आग्रहाची विनंती आहे. ही गोष्ट लक्षात घेऊन मासिकाचा दर्जा व उपयुक्तता वाढविण्याच्या दृष्टीनें समाज बांधवांनी विधायक सूचना कराव्यात, अशी त्यांना आम्ही विनंती करतो.

आतापर्यंत अशा एकदोन सूचना आमच्याकडे आलेल्या आहेत. त्याचा येथें जाहीरपणे खुलासा करणें जरूर आहे असे आम्हाला वाटते. मासिकाच्या धोरणाच्या कक्षेत असलेले लेखच आम्ही प्रसिद्ध करीत असतो. परंतु या कक्षेत राहून आपल्या लेखात आपले वैयक्तिक मत अथवा विचार मांडण्याचें स्वातंत्र्य लेखकांना असते. तसेच एखाद्या विषयासंबंधी असलेली निरनिराळी प्रामाणिक मते वाचकापुढे मांडल्यास त्यांना त्याबद्दल साधक बाधक विचार करण्यास संधी मिळते. म्हणून अशा लेखांना आम्ही आमच्या मासिकात वाव देत असतो. अर्थात् अशा लेखात मांडलेल्या विचारांना अथवा प्रदर्शित केलेल्या मतांना लेखकच जबाबदार असतात व संपादकावर त्याची जबाबदारी असत नाहीं, हा या बाबतीतील सर्वसामान्य नियम आहे. परंतु कांहीं लेखकांनी आपल्या लेखांत नमूद केलेलीं मतें ही मासिकाचीच मते आहेत अशी काहीं वाचकांनी आपली गैरसमजूत करून घेतलेलें आमच्या नजरेस आल्यामुळें आम्ही ही गोष्ट मुद्दाम आमच्या वाचकांच्या निदर्शनास आणू इच्छितो.

तसेंच दुसऱ्या एका महत्वाच्या बाबीबद्दल उद्भूत झालेला गैरसमज दूर करणें जरूर आहे. दुर्दैवानें आमच्या समाजांत आचार्यपंथी व बसवपंथी असा एक निरर्थक व समाजघातक वाद अस्तित्वात आहे. हा वाद किंवा भेद आता

बहुतेक संपुष्टांत आला असला तरी कोठे कोठे त्याचे विषयुक्त निखारे अजून धुमसत आहेत असें दिसतें. आमच्या मासिकांत हा वाद आम्ही कटाक्षानें टाळलेला आहे. परंतु त्यात श्री बसवेश्वर व इतर शिवशरण यांच्या बद्दलचेच लेख जास्ती प्रसिद्ध होत असल्या कारणानें आमचे मासिक बसवपंथीय आहे अशी कांहीं वाचकांनी गैरसमजूत करून घेतली आहे असे कळते, तरी त्यांची ही समजूत चुकीची आहे. परमपूज्य पंचाचार्य, श्री बसवेश्वर वगैरे शिवशरण व इतर वीरशैव साधुसंत आम्हाला सारखेंच पूज्य आहेत. त्यांच्यामध्ये कोणत्याही तऱ्हेने भेदभाव करणें हें वीरशैव धर्मास व समाजास विघातक आहे असे आमचे स्पष्ट मत आहे व हे मत आम्ही आमच्या मासिकात वेळोवेळी जाहीर केले आहे. परंतु मासिकात परमपूज्य पंचाचार्यांबद्दल विशेष लेख प्रसिद्ध झाले नाहीत ही गोष्ट खरी आहे. परंतु त्याला कारण आमचे धोरण नसून या विषयावर लेख लिहिणाऱ्या लेखकांचा अभाव हें कारण आहे. आजपर्यंत आमच्याकडे या विषयावर लिहिलेले लेख ( मराठी, कानडी, हिंदी, इंग्रजी भाषेतही आल्यास ) आम्ही ते अवश्य प्रसिद्ध करूं, असे आम्ही आमच्या समाज बांधवांस आश्वासन देऊं इच्छितो. यापुढे आमच्या मासिकाविषयीं अशा तऱ्हेचा गैरसमज कोणी करून घेणार नाही, अशी आम्ही आशा बाळगतो.

तसेच आचार्यपंथी व बसवपंथी हा समाजघातक भेदच मुळातून खोडून टाकणें जरूर आहे हे आम्ही आमच्या समाज बांधवांच्या नजरेस आणूं इच्छितो. आपल्या समाजाप्रमाणेंच जैन समाजातही निरनिराळे पंथभेद व मतभेद आहेत. परंतु आमच्या जैन बांधवांनी दूरदृष्टीनें व काळाचीं पावले ओळखून आपल्यातील सर्व मतभेद व पंथभेद बाजूला सारून अखिल जैन समाजाकरतां आपल्या धर्माची एकच बळकट संघटना उभी करण्याचा त्यांनी निश्चय केला आहे, ही शुभवार्ता आमच्या वाचकांनी मागच्या अंकात वाचलीच असेल. आमच्याही समाजाच्या संघटनेच्या दृष्टानें त्यांच्या या प्रशंसनीय कृत्यावरून आपण कांहीं बोध घ्यावयाचा नाहीं काय ? सर्वधर्मसमन्वयाचें वारे सर्व जगांत वहात असतांना वीरशैव धर्माच्या आपल्या लहानशा समाजात असले निरर्थक व समाजघातक वाद उपस्थित करणें किंवा अशी विचारसरणीसुद्धा मनात आणणें चुकीचे व समाजसंघटनेस विघातक आहे. करिता, अशा अनर्थकारक व समाजघातक वादास आमचे समाज बांधव आपल्या मनात मुळीच थारा देणार नाहीत अशी आशा आहे.

या महिन्यात आमच्या समाजाच्या दोघा महाभागांच्या जन्मतिथीं व पुण्यतिथी

येतात. कै. शिरसंगीकर सरदेसाई या महाभागाचें चरित्र माहीत नसलेला वीरशैव सांपडणेंच विरळा. ह्या दानशूरानें आपल्या समाजाच्या गोरगरीब विद्यार्थ्यांना शिक्षणाची सोय करण्याकरता दरसाल सुमारे साठ हजार रुपये उत्पन्नाची आपली सारी मिळकत समाजाला देऊन टाकली आहे. त्यांनी आपल्या अलौकिक दातृत्वानें नुसत्या वीरशैव समाजालाच नव्हे तर साऱ्या भारताला एक आदर्श धडा घालून दिला आहे. त्यांचा जन्म दि. १०–१–१८६२ रोजी झाला होता. तसेच पुण्यश्लोक अप्पासाहेब वारद दि. १९–१–१९११ रोजी कैलासवासी झाले. वीरशैव समाजाच्या उन्नतीकरता त्यांनी केलेले दीर्घ परिश्रम कोणाला माहीत नाहीत ? या दोघां थोर पुरुषाचें चरित्र आमच्या वाचकास उद्बोधक होईल या दृष्टीनें त्यांचे संक्षिप्त चरित्र या अंकात इतरत्र दिले आहे. त्यांची चरित्रें आमच्या समाज बांधवांस उद्बोधक व मार्गदर्शक होतील यात संशय नाहीं. या दोघां महाभागांच्या पुण्यस्मृतीस आमचे शतशः प्रणाम !



लेखांक १६

# श्री गुरुदेव रानडे

( सन १९६६ जुलै महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख )

दिवंगत गुरुदेव रानडे यांची ९ वी पुण्यतिथी गेल्या जून महिन्यात ता. ६ रोजीं निंबाळ येथील त्यांच्या आश्रमांत विधीपूर्वक आचरण्यांत आली. त्यावेळी गुरुदेवांचे कर्नाटक महाराष्ट्र मधील अनेक भक्त, अनुयायी व चहाते यांचा मेळावा तेथें जमला होता. गुरुदेवांच्या पुण्यतिथीच्या निमित्तानें निरनिराळया पंथाचे जातीचे व प्रांताचे लोक एकत्र येऊन हा धार्मिक सोहळा साजरा झाल्यामुळें त्याला एका दृष्टीनें सर्वधर्म संमेलनाचेंच स्वरूप आले होतें, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

**गुरुदेवांचे बालपण व शिक्षण.**

गुरुदेव रानडे यांचा जन्म १८८६ साली विजापूर जिल्ह्यातील जमखंडी येथें झाला होता. पूर्वकाळापासून त्यांचें घराणें पारमार्थिक वृत्तीचें असून त्यांचे मातापिताही अत्यंत सत्वशील भाविक व श्रद्धाळू होते. अशा मातापित्यांच्या पोटीं त्यांचा जन्म झाला असल्यामुळें बाळपणापासून गुरुदेवांचा ओढा परमार्थाकडे होता. 'मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात' ह्या म्हणीप्रमाणें गुरुदेवाच्या भावी पारमार्थिक व उज्वल जीवनाचें भविष्य त्यांच्या बालपणांतच कळून आले. त्यांच्या मातोश्री मोठ्या भाविक व श्रद्धाळू होत्या. त्यांनीं महालिंगय्या नांवाच्या एका लिंगायत साधूचा अनुग्रह घेतला होता. एकदां त्या आपल्या मुलासह गुरुंच्या भेटीस गेल्या

असतांना त्या मुलास पाहुन साधूनें ' हा मुलगा पुढे फार मोठा होणार आहे ' असें त्याचें भविष्य वर्तविले. हे ऐकून त्या माऊलीस अत्यंत आनंद झाला. घरीं परतल्यानंतर तिनें आपल्या मुलास न्हाऊ घालून, ओवाळून त्याच्या पायावर आपले मस्तक ठेवले. केवढा हा श्रद्धाळूपणा ! धन्यतेच्या भावनेनें आपल्याच मुलाला नमन करणारी धन्य ती माता व धन्य तिचा पुत्र ! आपल्या जीवनाच्या अंतिम काळापर्यंतही त्या माऊलीनें आपल्या मुलाला आध्यात्मिक मार्गांत मार्गदर्शन केलें. अशा मातेच्या पोटीं जन्मास आलेला सुपुत्र पुढें जगद्विख्यात तत्वज्ञानी व साक्षात्कारी संत झाल्यास त्यांत नवल नाहीं.

गुरुदेवांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण जमखंडी येथेच झाले. जन्मतःच त्यांची बुद्धि प्रखर असल्यामुळे वर्गात केव्हांही त्यांचा नंबर पहिला असे. एवढेच नव्हे तर मॅट्रिकच्या परिक्षेत त्यावेळची जगन्नाथ शंकरशेठ स्कॉलरशिपही मिळविली. त्या नंतर त्यांनीं उच्च शिक्षणाकरता पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्ये प्रवेश केला. तेथेंही ते आपल्या कुशाग्र बुद्धिमतेने आणि विनयशील व प्रेमळ स्वभावानें तेथील विद्यार्थी वर्गाच्या व प्राध्यापकांच्या प्रेमादरास पात्र झाले. प्रख्यात विद्वान व त्या कॉलेजचे त्यावेळचे प्रिन्सिपाल प्रो. बेन यांची तर त्यांच्यावर बहाल मर्जी होती. त्यांची असामान्य बुद्धिमता व तत्त्वज्ञान विषयातील त्यांची आसक्ति यामुळें त्यांचा प्रि बेनशी दाट संबंध जुळला, व तो शेवटपर्यंत टिकला.

गुरुवर्य रानडे सन १९०७ मध्ये बी ए. परिक्षा पास झाल्यानंतर घरच्या गरीबीमुळें आपल्या स्नातकोत्तर शिक्षणाला विराम देऊन त्यांना नोकरी पत्करावी लागली व ही नोकरी करीत असतांनाच ते डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सभासद होऊन त्यांनी फर्ग्युसन कॉलेजात प्राध्यापकाची नोकरी पत्करली. नंतर सन १९१४ सालीं तत्त्वज्ञान हा विषय घेऊन एम्. ए. ची परीक्षा दिली. त्यांत ते पहिल्या वर्गाच्या पहिल्या नंबरानें पास होऊन चॅन्सेलरचें व न्या. तेलंगांचे अशी दोन सुवर्णपदके त्यांनी मिळविली. त्यांनी संपादलेल्या या दुर्मिळ यशावरून त्यांच्या प्रखर बुद्धिमतेची व गाढ विद्वत्तेची कल्पना येते परंतु त्याच्याही पेक्षां महत्वाची गोष्ट म्हणजे त्या परीक्षेच्या परीक्षकांनी आपल्या अहवालांत त्यांच्या संबंधी केलेला उल्लेख होय. " The examinee knows more than the examiners " परीक्षकांच्या ज्ञानापेक्षा परीक्षार्थीचे ज्ञान जास्त आहे. असा गौरवयुक्त शेरा त्यांनी आपल्या अहवालात दिला होता. प्रत्येक वर्षी निरनिराळया परीक्षांत कोणीना कोणीतरी पहिल्या नंबरला पास होतातच, परंतु

वरीलप्रमाणें असामान्य व गौरवयुक्त प्रशस्तिपत्र मिळवण्याचें भाग्य कोणत्या विद्यार्थ्याला लाभले आहे ? या असामान्य यशानें ते शेफारून गेले नाहींत. यावेळी सुद्धां त्यांचा विनयशील व प्रसिद्धि पराङमुख स्वभाव स्पष्टपणें दिसून आला. ही दुर्मिळ सुवर्णपदके लावून आपला फोटो काढावा असा त्यांच्या मित्रांनी त्यांना आग्रह केला. परंतु ते बिल्ले लावून फोटो काढून घेण्यास मी कांहीं 'बेंदराचा बैल' नाहीं, असे म्हणून स्पष्ट नकार दिला. त्यांच्या बाबतीत 'विद्या विनयेन शोभते' हे सुभाषित यथार्थ होतें.

**शिक्षण क्षेत्रांतील कार्य.**

यानंतर त्यांनी सुमारें दहा वर्षे डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या फर्ग्युसन व विलिंडग्न कॉलेजांत प्राध्यापकाचे कार्य केले. परंतु सदरी संस्थेच्या सभासदांशी मतभेद झाल्याकारणानें सन १९२४ साली त्या संस्थेचा राजीनामा देऊन ते निंबाळास येऊन राहिले. परंतु अशा अद्वितीय व प्रतिभाशाली विद्वानाला निंबाळ सारख्या खेडयात कोण राहू देणार ? सन १९२६ सालीं त्यांनी प्रकाशित केलेल्या त्यांच्या A constructive survey of Upanishad Philosophy या जगद्‌विख्यात ग्रंथानें त्यांना जागतिक प्रख्यात विद्वानांच्या रांकेत नेऊन बसविले होते. या ग्रंथाच्या वाचनानें अलाहाबाद विश्वविद्यालयाचे त्यावेळचे कुलगुरु व प्रसिद्ध विद्वान सर गंगानाथ झा एवढे भारावून गेले की त्यांनी दुसरी काही विचारपूस वगैरे न करतां आपल्या विद्यापीठातील तत्त्वज्ञान शाखेचे प्रमुख व प्राध्यापक म्हणून त्यांची नेमणूक करून त्यांना तारेनें कळविलें. गुरूदेवांची प्रकृती बालपणापासूनच 'मासातोळा' अशी होती. त्यांत पुण्याची हवा न मानवल्यामुळें ते आजारी पडले होते. परंतु गुरूकृपेनें व आत्मबलाच्या जोरावर ते त्यांतून कसेंबसें बचावले. डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा राजीनामा देण्यास तेही एक कारण होते. त्यांच्या प्रकृतीला कोरडी व उष्ण हवा मानवत असल्यामुळें व गुरूस्थानाच्या सानिध्यांत राहून शांतपणें आपले पारमार्थिक जीवन जगण्याची त्यांची प्रबळ इच्छा असल्यामुळें विजापूर जिल्ह्यातील निंबाळ हे खेडें त्यांनी आपल्या कायम निवासस्थानासाठीं निवडलें. तेथे आश्रम बांधून व 'अध्यात्मपीठा' ची स्थापना करून आपल्या आवडत्या अध्यात्म साधनेस व ग्रंथ प्रकाशनच्या कार्यास प्रारंभ केला होता. त्यामुळें तें अलाहाबादला जाण्यास अगदीच नाखुष होते. परंतु कुलगुरू झाचा आग्रह शिगेस पोचला. " आपल्या योग्यतेच्या व लौकिकाच्या एका प्राध्यापकाचा जोड मला या विद्यापीठाला करून

देता आली तर कुलगुरू या नात्यानें मीं स्वतःचा सर्वात मोठा विजय समजेन, तसेच आपण एकही व्याख्यान दिले नाही तरी चालेल परंतु आमच्या विद्यापीठाच्या यादीत आपलें नांव पाहिजे" अशा मजकूराची निर्वाणीची पत्रें त्यांनी लिहिल्यामुळें या नेमणूकीला होकार देण्याशिवाय त्यांना अन्य मार्गच राहिला नाहीं त्यामुळें निरुपायास्तव त्यांनी त्या नेमणूकीला संमती देऊन ते अलाहाबादला राहण्यास गेले. तेथेंही ते विद्यार्थी वर्गांत व प्राध्यापकांतही फारच लोकप्रिय झाले. काही काळानंतर त्यांची त्या विश्वविद्यालयाचे कुलगुरु म्हणून नेमणूक झाली. तेथे त्यांनी वीस वर्षे अध्यापनाचें कार्य केलें. ह्या काळांत ते अलाहाबादला राहत असले तरी वर्षातून दोन तीन महिने तरी निंबाळास येऊन राहात. शेवटीं १९४६ सालीं ते तेथून सेवानिवृत्त होऊन निंबाळास कायमचे येऊन राहिले.

गुरुपरंपरा.

गु. रानडें जमखंडीस असतांना लहानपणींच म्हणजे आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षीच उमदीचे संत श्री भाऊसाहेब महाराज यांचेकडून गुरूपदेश घेतला होता. ते कोल्हापूर जवळील सिद्धगिरी मठाचें मूळ संस्थापक श्री काडसिद्धेश्वर ह्यांच्या परंपरेतील होते. पंचाचार्य परंपरेतील सुप्रसिद्ध वीरशैव संत रेवणसिद्धेश्वर काडसिद्धेश्वरांचे गुरु होते. श्री काडसिद्धेश्वरांचा काळ तेरावे शतक असावें, असें अनुमान आहे. ते त्याकाळचे प्रसिद्ध संत असून त्यांचे मठ व देवालयें सर्व कर्नाटकभर पसरली आहेत. सिद्धगिरीमठ त्यांनीच स्थापन केला. ह्या मठाच्या शिष्य परंपरेत अठराव्या शतकांत मुप्पिन मुनी नांवाचे संत होऊन गेले. त्यांचे शिष्य निंबर्गीचे श्री नारायण महाराज ऊर्फ गुरुलिंगजंगम महाराज व त्यांचे शिष्य श्री भाऊसाहेब उमदीकर. अशा रीतानें गु. रानडेंची गुरु परंपरा फार प्राचीन आहे. ही गुरुपरंपरा लिंगायत पंथीय असली तरी परंपरेतील संतांचे आचरण संप्रदायातीत होते. त्यामुळें त्यांच्या शिष्य परिवारात सर्व जातीचे व पंथाचे लोक असल्याचे आढळून येते. तसेच त्यांचा धर्मोपदेशही एकाद्या विशिष्ट पंथाला अनुसरून नव्हता. गु. रानडेंचे परमार्थ जीवनही अशा गुरुपरंपरेंत व्यतीत झाल्या कारणानें त्यांच्या गुरूची सर्वधर्मसमन्वय वृत्ती त्याच्या अंगीही बाणली होती व ते सर्वधर्मसंप्रदाय अथवा विश्वधर्म यांचे पुरस्कर्ते बनले होते.

गु. रानडेंची गुरुभक्ति वाखाणण्याजोगी होती. 'गुरुः साक्षात्परब्रह्म' या उक्तीप्रमाणे ते आपल्या गुरुना परब्रह्म मानीत होते. नुसत्या पारमार्थिक

नव्हे तर आपल्या लौकिक जीवनातसुद्धां गुरुच्या मार्गदर्शनाशिवाय ते कोणतेही कार्य करीत नसत. आपण सतत आपल्या गुरुच्या सानिध्यात राहून आध्यात्मिक साधना करावी अशी त्यांची फार इच्छा होती. परंतु प्रपंचाच्या व्यापामुळें त्यांना तें शक्य झाले नाहीं. तरी सुद्धा जेव्हा जेव्हा त्यांना सवड मिळे त्या त्या वेळी ते न चुकतां गुरुंच्या भेटीस जाऊन कांहीं काळ त्यांच्या सांनिध्यात घालवीत. सन १९०८-१० च्या सुमारास ते जेव्हां आजारातून बरे झाले तेव्हां आपल्या सद्‌गुरुंनीच आपणाला या संकटातून वांचविले अशी त्यांची दृढ भावना होती. भाऊसाहेब महाराज सन १९१४ साली वारले. आपल्या आयुष्याच्या शेवटच्या काळांत ते इंचगेरीस राहात होते. तेथेच त्यांनी समाधी घेतली. आपल्या गुरुच्या निधनाची वार्ता ऐकून गुरुदेव रानडेना फारच दुःख झाले व ढळढळा रडले. पुढेही काही दिवस त्यांची आठवण झाली की त्यांच्या डोळयांतून दुःखाश्रू गळत. गुरुनिधनानंतर सुद्धां त्यांची गुरुभक्ती कोणत्याही रीतीने कमी न होता ती दिवसें-दिवस वृद्धिंगत होत गेली. त्यांच्या गुरुंनी लिहिलेलीं सर्व पत्रें त्यांनी संग्रहित केलीं होतीं व त्यांना ते प्राणापलीकडे जपत. त्यांच्या परमार्थ साधनेच्या कार्यक्रमांत 'पोथीवाचन' हा एक कार्यक्रम होता. ह्या धार्मिक पोथी वाचनात ह्या पत्रांच्या वाचनाचाही त्यांनी समावेश केला होता. आपल्या गुरुच्या वास्तव्याची सर्व स्थळें त्यांना धर्मक्षेत्राप्रमाणें पवित्र वाटत व संधी मिळेल तेव्हां तें ह्या सर्व स्थळांना भेटी देत. इंचगेरी आपल्या गुरुच्या वास्तव्याचें स्थान असून तेथेच त्यांची समाधी असल्यामुळें ह्या स्थानाच्या सानिध्यातच आपण कायम राहावें ह्या दृष्टीनेंच त्यांनी निंबाळची निवड केली व तेथेच ते आश्रम बांधून अखेरपर्यंत राहिले. आपले गुरु तुकाराम रामदासापेक्षां कोणत्याही रीतीनें कमी नव्हते असें ते अनेक वेळा बोलून दाखवीत. ह्या सर्व गोष्टीवरून आपल्या गुरुबद्दलची त्यांची उत्कट व अनन्य भक्ती दिसून येते.

### पारमार्थिक जीवन.

गुरुदेव रानडे, ज्ञानेश्वर, तुकाराम, बसवेश्वर, पुरंदरदास ह्या संताप्रमाणें साक्षात्कारी संत होते. बालपणापासूनच त्यांचा ओढा पारमार्थिक विषयाकडे असून त्यानी आपल्या वयाच्या १५ व्या वर्षीच आपल्या गुरुकडून अनुग्रह घेतला होता हें वर आलेच आहे. तेव्हांपासूनच त्यांच्या अध्यात्मसाधनेला सुरवात झाली होती. कॉलेजात शिक्षण घेत असताना व त्यानंतर प्राध्यापक म्हणून काम करीत असतांनासुद्धा त्यांची अध्यात्मसाधना चालू होतीच. त्याबाबतीत ते आपल्या गुरूंचे मार्गदर्शन व लिंगाप्पा, अंबुराव, शिवलिंगव्वा वगैरे गुरुबंधु-

भगीनींचा सल्ला ते घेत. ते स्वतः कुशाग्र बुद्धीचे जाडे विद्वान असून त्यांनीं जगांतील सर्व तत्त्वज्ञानाचा व प्रमुख धार्मिक ग्रंथांचा अभ्यास केला होता. तसेंच त्यांची चिकित्सक बुद्धी ही अत्यंत तीव्र होती. याच्या उलट त्यांचे गुरु व गुरुबंधुभगिनी विद्वत्तेच्या व लौकिक दृष्टीनें सामान्य माणसें होती. असे असले तरी ते त्यांच्या मार्गदर्शनाला व सल्ला मसलतीला फार महत्व देत. याच्यावरून त्यांच्या भाविक श्रद्धाळू व निरंहकार स्वभावाची कल्पना येते. परंतु त्यांचा भाविकपणा भोळेपणा नव्हता अथवा श्रद्धा अंधश्रद्धा नव्हती. ज्ञान, भक्ती, कर्म व योग या चार अध्यात्म साधनेच्या मार्गामध्यें भक्तीमार्गावर त्यांचा विशेष भर होता. आपल्या अनुयायांना ते त्याच मार्गाचा उपदेश करीत. त्यांच्या अध्यात्म साधनेंत ध्यान व नामस्मरण याला विशेष महत्व होते. ते नित्यनेमानें ध्यान करीत. कांहीवेळा ते दोन दोन चार चार तास ध्यानस्थ होऊन बसत. काही काळानंतर त्यांची ध्यान साधना परिणतावस्थेला पोचली. त्यामुळे त्यांना आत्मसाक्षात्कारही होऊ लागला. देवाच्या नामस्मरणालाही ते फार महत्व देत. नामस्मरणाचा महिमा तर सर्व संतानी वर्णिला आहे.

कर्नाटकाचे प्रसिद्ध संत पुरंदरदास यांनी तर देवापेक्षा देवाच्या नामालाच जास्ती महत्व दिले आहे. 'देवा तूं नको व तुझी भीडही नको. फक्त तुझे नाम मला पुरे.' ( निन्याको, निन्न हंग्याको, निन्न नाम त्वंदिद्दरे साको ) असे आत्मविश्वासानें बोलून त्यांनी देवाच्या नामाचा महिमा गायिला आहे. गुरुदेव लोकांना नामाचा महिमा समजावून सांगतांना ह्याच पदाचें स्मरण करून देत. परंतु त्यांच्या मताप्रमाणें साध्या नामस्मरणाला महत्व नसून सबीज नामस्मरणाला ते महत्व देत. सबीज नाम म्हणजे गुरूनें दीक्षेच्यावेळीं किंवा अनुग्रहाच्या समयीं शिष्यास दिलेले नाम. ह्या सबीज नामस्मरणानेंच अध्यात्माचें अंतिम ध्येय साधणें शक्य आहे असें ते सांगत. ह्याशिवाय भजन, पोथी वाचन, अध्यात्म चर्चा, सत्संग, पवित्रस्थळांना भेटी यांचा ही त्यांच्या पारमार्थिक जीवनात समावेश झाला होता. ते प्रापंचिक असून लौकिक जीवन जगत असले तरी परमार्थावरील त्यांची दृष्टी कधीही ढळली नाहीं. त्यांच्या प्रत्येक कृत्याचा पाया परमार्थच होता. कोणत्याही गोष्टींचा विचार करतांना पारमार्थिक दृष्टीनेच ते त्याचा विचार करीत. या सर्व गोष्टींचा विचार केला तर त्यांचे सारे जीवन पारमार्थिक होते, असे म्हणावयास हरकत नाहीं. त्यांच्या प्रापंचिक जीवनामध्यें कांहीं अडचणी आल्या व काही संकटे – विशेषतः आजारांचो – त्यांच्यावर कोसळलीं तरी सामान्यतः त्यांचें प्रापंचिक जीवन सुखावेच होते. त्यांच्या मातोश्रींनी व दोघा पत्नींनीही त्यांना या बाबतींत संपूर्ण सहकार व सहाय्य केले. इतर काही संता-

प्रमाणें त्यांना कधींही प्रपंचाचा कंटाळा आला नाहीं, किंवा त्यांनी कधीही त्याची अवहेलना केलो नाहीं, 'प्रपंच साधुनि परमार्थाचा लाभ जयाने केला। तो नर भला रे भला.' या शिवदिनकेसरीच्या उक्तीप्रमाणें ह्या दोन्ही मार्गांचे यशस्वी जीवन जगून प्रापंचिकांना त्यांनी अनुकरणीय धडा घालून दिला आहे. परमात्म्याचा साक्षात्कार ( God – realisation ) हेंच मानवी जीवनाचे अंतिम ध्येय आहे, असे त्यांचे मत होते. त्याप्रमाणें सतत अध्यात्म साधनेने व पारमार्थिक जीवनानें त्यांनी हे अंतिम ध्येय गाठून शेवटी परमात्म्याशी समरस होऊन गेले यात संशय नाही.

## साहित्य संपदा.

गुरुदेव जन्मतः प्रतिभाशाली व प्रखर बुद्धिमान होते. त्यांच्या या गुणाची प्रचीती शिक्षण घेत असतांनाच दिसून आली हे वर सांगितलेच आहे. तत्वज्ञान त्यांचा आवडीचा विषय असल्यामुळें त्याचा त्यांनी सखोल अभ्यास केला होता. त्याच्या अभ्यासाकरतां ते ग्रीक व लॅटिन भाषाही शिकले. संस्कृत व इंग्लिश भाषावरील त्यांचें प्रभूत्व असामान्य होते. कन्नड, मराठी व हिंदी ह्या भाषाही त्यांना अवगत होत्या. ह्या बहुभाषिक ज्ञानाच्या सहाय्यानें त्यांनी तत्वज्ञानावरील सर्व प्रमुख ग्रंथ पालथे घातले होते. परंतु या विषयाचा त्यांचा अभ्यास ग्रंथवाचनापुरता मर्यादित नव्हता. त्या ग्रंथांत ग्रथित केलेल्या तत्वांचा साधक बाधक विचार करून व स्वतः मनन करून त्यांनी आपले स्वतःचे स्वतंत्र व मौलिक विचार बनविले होते. त्यांचे हे विचार त्यांच्या ग्रंथातून ठळकपणे दिसून येतात.

या विषयाचे वाचन व मनन यांच्या बरोबर लेखनकार्यासही त्यांनी सुरुवात केली. आरंभी त्यांनी या विषयावर कांहीं निबंध लिहिले. हे निबंधसुद्धा उच्च व मौलिक विचारानें परिप्लुत होते. ह्यापैकी ग्रीक तत्त्वज्ञानावरील त्यांचा निबंध वाचून प्रो. बेन यांनी या लेखातील विचार जाणू शकतील असे दहा पाच लोकसुद्धा हिंदुस्थानात नाहींत, असे उद्गार काढले होते. सन १९२४ सालीं निंबाळ येथें स्थायिक झाल्यानंतर अध्यात्म-विद्यापीठाची ( Academy of Philosophy and Religion ) स्थापना करून त्याच्या वतीनें त्यांनीं तत्त्वज्ञानावरील आपल्या ग्रंथाच्या प्रकाशनास सुरवात केली. या ग्रंथमालेतील त्यांचा पहिलाच ग्रंथ ( A constructive survey of Upanishadic Philosophy ) हा त्यांनीं १९२६ सालीं प्रकाशित केला. हा ग्रंथ एवढा

उत्कृष्ट ठरला कीं त्याच्या वाचनानें जगांतील प्रमुख तत्त्वज्ञानी भारावून गेले व त्यांनी त्याची मुक्तकंठाने स्तुती केली. ह्या ग्रंथाच्या प्रकाशनानें त्यांची कीर्ती जगभर पसरली व जागतिक कीर्तीच्या प्रमुख तत्त्वज्ञान्यांत त्यांची गणना होऊ लागली. त्या नंतरही त्यांनी कांही बहुमोल ग्रंथ प्रकाशित केले. त्यांच्या ग्रंथ साहित्यापैकी दुसरे उल्लेखनीय ग्रंथ म्हणजे मराठी, कन्नड व हिंदी भाषातील संत साहित्याचें विवरण व विवेचन. कर्नाटक, महाराष्ट्र व उत्तर हिंदुस्थान या भागातील सर्व संतांची चरित्रें व त्यांचें साहित्य यांचे सखोल अध्ययन करून त्यांनी हे ग्रंथ लिहिले आहेत. ह्या ग्रंथात त्यांनी संताच्या साहित्याचे नुसते वर्णन केले नसून ह्या संतांनी चोखाळलेल्या भक्तीमार्गाचे व आत्मसाक्षात्काराचें सविस्तर व सांगोपांग विवेचन केले आहे. गुरूदेव स्वतः आत्मसाक्षात्कारी संत होतेच. परंतु या ग्रंथाच्या वाचनानें त्यांनी साक्षात्कारवादाचा ( Mysticism ) किती विस्तृत व सखोल अभ्यास केला होता, याची कल्पना येते. तसेंच ह्या विषयावरील त्यांचे अमूल्य व मौलिक विचार ही त्यांनी त्यांत ग्रंथित केले आहेत. यामुळें सांप्रत या ग्रंथाचीं गणना साक्षात्कारवादावरील अधिकृत ग्रंथात होते. याशिवाय त्यांनी मराठी व इंग्लिश या दोन्ही भाषांत काही अमोलिक ग्रंथरचना केली आहे. गुरुदेवांचे हे सर्व साहित्य महत्वाचें असून तत्त्वज्ञानाच्या अभ्यासूंना व अध्यात्म साधना करणाऱ्या साधकांना फारच उपयुक्त व मार्गदर्शक आहे. एका इंग्लिश उक्तीप्रमाणें हे साहित्य त्यांना Must पैकी आहे.

## विश्वधर्म व निधर्मीराज्य.

गुरुवर्य रानडेंची गुरुपरंपरा संप्रदायातीत होती, हे वर सांगितलेच आहे. स्वतः गुरुदेवही संप्रदायातीत होते. एवढेच नव्हे तर सर्व धर्मांचा समन्वय करून एकच विश्वधर्म स्थापला जावा असा त्यांचा अभिप्राय होता. विश्वनियंता देव जर एकच आहे तर त्याची प्राप्ती करून देणारा धर्मही एकच विश्वधर्म असावा. जगामध्ये असा एकच विश्वधर्म स्थापन झाल्याशिवाय साऱ्या मानवसमाजात ऐक्य निर्माण होणे शक्य नाही असें ते प्रतिपादीत. तसेंच निधर्मी राज्याबद्दलही ( Secular State ) त्यांचे विचार आगळेच होते. सांप्रत निधर्मी राज्य म्हणजे राज्यशासनाने. सर्व धर्मापासून अलिप्त राहणें व सर्व धर्मांना समान रीतीची धागणूक देणें असा त्याचा अर्थ केला जातो. परंतु ही राजनीती राष्ट्राच्या आध्यात्मिक उन्नतीस पोषक नाहीं. करिता सर्वधर्मसमन्वयरूपी विश्वधर्माचा राज्यशासनात समावेश केला जावा असें त्यांचें मत होते. सांप्रतच्या परिस्थितीत ही त्यांचीं मतें विचारार्ह नाहींत असें कोण म्हणेल ?

### अमृतमहोत्सव.

सन १९४७ सालीं अलाहाबादहून परत आल्यानंतर निंबाळला स्थायिक होऊन त्यांनी आपले शेष आयुष्य सर्वस्वी परमार्थ साधनेला व प्रचाराला वाहिले. त्या निमित्तानें त्यांनी भारतातील निरनिराळ्या भागांत व्याख्यानें दिली. हीं व्याख्यानें नुसती प्रासंगिक अथवा औपचारिक भाषणें नसून त्या त्या विषयावरील अभ्यासपूर्ण व विद्वत्तापूर्ण प्रवचनेच होती. यापैकीच कांहीं व्याख्यानें ग्रंथरूपानें प्रसिद्ध झाली आहेत. त्यांच्या साहित्याचा प्रचारही सर्व भारतभर मोठ्या प्रमाणांत झाला. त्यामुळें ते एक प्रसिद्ध तत्त्वज्ञानी व साक्षात्कारी संत म्हणून सामान्य जनतेत ही त्यांची ख्यती झाली. त्याचप्रमाणें परमार्थाच्या प्रचारार्थ निवडक लायख लोकांना अनुग्रह देण्यासही त्यांनी सुरूवात केली. यामुळे त्यांचा शिष्य व अनुयायी परिवार वाढत गेला. त्यांचें निवासस्थान निंबाळ एक प्रकारे धार्मिक क्षेत्रच बनले. १९५६सालीं त्यांना ७० वर्षे पूर्ण होत होतीं. म्हणून त्यांचे जन्मस्थान जमखंडी येथील रहिवाशांनी व त्यांच्या इतर अनुयायानी त्यांचा अमृत महोत्सव मोठ्या समारंभानें साजरा करून त्यांच्याबद्दलचा आपला प्रेमादर व गुणगौरव व्यक्त केला. या समारंभाच्या काळीही त्यांचा अनासक्त व विनयशील स्वभाव पदोपदी दृग्गोचर होत होता.

### अन्त्यकाळ.

या समारंभानंतर ते फार दिवस जगले नाहीत. वृद्धापकाळी त्यांच्या मूळच्या क्षय रोगानें उचल खाल्ली व त्यातच निंबाळ मुक्कामीं दिनांक ६ जून १९५७ रोजीं त्यांचा अंत झाला. निधनापूर्वी कांहीं दिवस त्यांना आपल्या अंत काळची कल्पना आली होती. व त्याप्रमाणें त्यांनी आपल्या सर्व कार्याची आवरां आवर करून व सर्वांचा निरोप घेऊन अत्यंत शांतपणाने, देवाचे नामस्मरण करीत ह्या जगाचा निरोप घेतला. ज्योतीत ज्योत मिळाली व त्यांचा आत्मा परमात्म्यांत विलीन झाला !

बसवेश्वरांच्या भाषेंत बोलावयाचे झाले तर " पक्व फळ झाडावरून गळून पडत असतांना ते आपणाला पाहिजे म्हणून ईश्वरानें उचलून घेतले ! "

लेखांक १७

# वचन पितामह–
# कै. फकीराप्पा हळकट्टी

(सन १९६६ आक्टोबर व नोव्हेंबर महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख)

**वचन साहित्याचा इतिहास.**

बाराव्या शतकात श्री बसवेश्वर व इतर शिवशरणांनी कर्नाटकात 'न भूतो न भविष्यति ' अशी धार्मिक व सामाजिक क्रांती घडवून आणली व स्वातंत्र्य, समानता, विश्वबंधुत्त्व, दया, प्रेम या सारख्या उदात्त तत्त्वावर वीरशैव धर्माची पुनर्घटना करून त्या वेळच्या कर्नाटकांत नवचैतन्य निर्माण केले. ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंतच्या समाजाच्या साऱ्या थरांत भक्तिमार्गाचा डांगोरा पिटून त्यांच्यांत धार्मिक प्रवृत्ति निर्माण केली आणि विश्वबंधुत्त्व व समता या तत्त्वावर त्यांची एकजूट बांधली. या पुनरुत्थापन चळवळीमुळें समाजाच्या अशिक्षित आणि हीन गणल्या जाणाऱ्या जातीमधून सुद्धां अनेक स्त्री–पुरुष संत निर्माण झाले व त्यांनीही आपापल्या परी धर्माचा प्रचार केला. बाराव्याशतकात कर्नाटकात निर्माण झालेल्या या धर्मजागृतीची तुलना तेराव्या शतकाच्या उत्तरार्धांत महाराष्ट्रीय संतांनी महाराष्ट्रात निर्माण केलेल्या धर्म-जागृतीशीच करतां येईल. ह्या नवधर्माचा प्रचार सामान्य जनतेत करावयाचा असल्या कारणानें साहजिकच महाराष्ट्रीय संताप्रमाणें त्यांनी जनतेच्या मायबोलीतून म्हणजे कन्नड भाषेतूनच

त्याचा प्रचार केला. हा धर्मप्रचार अथवा धर्मोपदेश करीत असतांना संतांनी अंतःस्फूर्तीनें जे उद्‌गार काढले त्यांनाच वचनें असें नांव आहे. ती आत्मनिवेदनात्मक, उपदेशात्मक अथवा तत्त्वविवेचनात्मक अशी आहेत. त्यांची भाषाशैली गद्यपद्यात्मक असून ती साधी, सोपी व सामान्य जनतेसही समजण्यास सुलभ अशीं आहे. अध्यात्माची गूढ व गहन तत्त्वेसुद्धा या वचनांत अर्थगर्भित परंतु सुटसुटीत, ठसकेबाज भाषेत व मोजक्या शद्वात विवेचली गेली आहेत. या वचन साहित्याच्या लोकप्रियतेमुळें त्यावेळची कन्नडभाषेची संस्कृतप्रचुर व जाडजूड शैली मागे पडून वचन साहित्याची ही नवीं भाषाशैली प्रचारात आली. त्यामुळें या वचनसाहित्याला कन्नड वाङ्‌मयात महत्वाचे स्थान प्राप्त झाले आहे. ते आज तागायत अनेक कन्नड कवींना व ग्रंथकर्त्यांना स्फूर्तिस्थान बनले आहे. हें वचन साहित्य निर्माण करणाऱ्या संतांची संख्या सुमारे अडीचशें असून त्यांत सुमारे तीस चाळीस स्त्रीसंत आहेत. या सर्वांच्या वचनांची संख्या अनेक कोटी आहे, असे कांहीं प्राचीन उल्लेख आढळतात. परंतु त्यापैकी बहुभाग सर्वभक्षक काळाच्या उदरांत गडप झाला असल्याकारणानें हा उल्लेख साधार रीतीने पडताळून पहाण्यास सांप्रत कांहींच साधन नाहीं.

**वचन साहित्याचे पुनरुज्जीवन.**

बाराव्या शतकांतील वचन साहित्य एवढें भव्य व अवाढव्य होते तरी त्यावेळीं कल्याण नगरांत घडून आलेल्या राज्यक्रांतीमुळें उद्भवलेल्या धामधूमीच्या काळांत बहुतेक वचन साहित्य नष्ट झाले, व जें कांहीं वचावले गेले ते ठिकठिकाणच्या मठमंदिरांत पडून राहिले. बसवेश्वरांच्या अनुभव मंटपाच्या आध्यात्मिक तालमीत तयार झालेल्या संतांची परंपरा या राज्यक्रांतीमुळें पुढें न टिकल्या कारणानें कांहीं शतकापर्यंत ह्या वचन साहित्याचे संशोधन अथवा संकलन करण्याचा कोणीही प्रयत्न केलेला नाहीं. परंतु १५ व्या शतकांत विजयनगर साम्राज्याचे प्रख्यात सम्राट प्रौढदेवराय ह्यांच्या कारकीर्दीत वीरशैव धर्माला पुनः उज्वल कळा प्राप्त झाली. त्यावेळच्या अनेक शिवशरणांनीं व विद्वानांनीं ठिक–ठिकाणीं जीर्णावस्थेंत पडून राहिलेल्या या वचन भांडाराचा शोध लावून शास्त्रीय–रीत्या त्याचें संकलन केले. त्यापैकीं कांहींजणांनीं त्याच्यावर विवेचनात्मक ग्रंथही रचले. वीरशैव धर्माचा व वचन साहित्याचा प्रमाण ग्रंथ म्हणून मानला गेलेला 'शून्य संपादने' हा ग्रंथ याच काळात निर्माण झाला. परंतु त्याकाळीं मुद्रणकला अवगत नसल्यामुळे या वचनसाहित्याची व त्यावरील इतर ग्रंथांची ओळख फक्त कांहीं मठाधिपती व विद्वान यांच्यापुरतीच मर्यादित राहिली. एकोणीसाव्या शतकांत

ह्या भागांत मुद्रण कलेचा प्रसार झाला तरी, वीरशैव धर्मीयांच्या अनावस्थेमुळें ह्या वचन साहित्याच्या संशोधन व प्रकाशन कार्याकडे कोणी लक्ष दिले नाहीं. परंतु या वीसाव्या शतकांच्या प्रारंभी कै. डॉ. फकीराप्पा हळकट्टींनी आपणाला या धार्मिक व पवित्र कार्याला वाहून घेतले. सांप्रत उपलब्ध असलेले सर्व वचन साहित्य त्यांनीच शोधून काढून त्याचे संपादन – प्रकाशन केले. हें महत्वाचें कार्य करून त्यांनी वीरशैव समाजावर व कन्नड साहित्यावर महदुपकार करून ठेवले आहेत. या त्यांच्या अमोलिक व प्रशंसनीय कार्यामुळें त्यांना 'वचन – पितामह' अशी गौरव युक्त पदवी प्राप्त झाली आहे.

**बाल्य, शिक्षण व सार्वजनिक कार्य.**

श्री फकीराप्पा गुरूवसाप्पा हळकट्टी यांचा जन्म सन १८८० साली धारवाड येथील एका सच्छील वीरशैव घराण्यात झाला. त्यांच्या शिक्षणास प्रारंभ तेथेंच झाला. त्यावेळी साऱ्या वीरशैव समाजांत शिक्षणाबद्दल अनास्थाच वसत होती. बहुतेक वीरशैव आपल्या मुलाबाळांना शिक्षण देण्याकडे दुर्लक्षच करीत होते. उच्च शिक्षण घेतलेल्या पदवीधरांची संख्या तर हाताच्या बोटावर मोजण्या-इतकीही नव्हती. परंतु फकीराप्पाचे वडील सुशिक्षित व कन्नड साहित्यप्रेमी होते. त्यांना शिक्षणाचे महत्व माहीत होते. म्हणून त्यांनी आपल्या पुत्राला उच्च शिक्षण देऊन पदवीधर करण्याचा निश्चय केला होता. त्यामुळे त्यांनी फकीराप्पाच्या बालपणापासूनच त्याच्या शिक्षणाची काळजी घेतली होती. बाळपणीच त्यांनी त्याला वचन साहित्याची ओळख करून दिली होती. फकीराप्पांनी प्राथमिक व उच्च शिक्षण संपवून सन १९०४ सालीं एल्एल्. बी. ची पदवी संपादन केली. त्यावेळी लिंगायत समाजात उच्च शिक्षण घेऊन पदवीधर झालेले तरुण फारच कमी असल्यामुळे सरकारी नोकरीत वीरशैव पदवीधरांना भरपूर वाव होता. ते मोठमोठ्या हुद्यावर नेमले जात होते. त्यामुळे फकीराप्पाच्या हितचिंतकांनी त्यांना सरकारी नोकरी पत्करण्याबद्दल फारच आग्रह केला. परंतु आरंभा-पासूनच सार्वजनिक कार्याकडे त्यांचा ओढा असल्यामुळें सरकारी नोकरी न धरतां वकीलीचा पेशा पत्करून सार्वजनिक कार्याकडे लक्ष पुरविण्याचें त्यांनी ठरविले. त्याप्रमाणें सन १९०४ सालीं एल्एल्. बी. परीक्षा पास झाल्यानंतर त्यांनी जीवन निर्वाहाकरतां वकिली धंद्यास सुरवात केली व त्याच वेळी सार्वजनिक कार्यातही भाग घेण्यास प्रारंभ केला. त्यांनी विजापूर शहर आपलें कायमचें वास-स्थळ केल्यानंतर तेथील काही मृतवत संस्थाचें पुनरुज्जीवन करून कांहीं नवीन संस्था स्थापन करून आपल्या सार्वजनिक कार्याची मुहूर्त मेढ रोवली. सांप्रत तेथें

अस्तित्वांत असलेले सिद्धेश्वर हायस्कूल, सिद्धेश्वर सहकारी बँक, दुष्काळ निवारण समिती वगैरे संस्था त्यांनीच निर्माण करून ऊर्जितावस्थेला आणल्या. त्यांच्या सार्वजनिक कार्याची दखल घेऊन सरकारनें सन १९२४ सालीं त्यांची त्यावेळच्या मुंबई कौन्सिलवर नेमणूक केली होती. तसेच काही काळ त्यांनी मुंबई विश्व-विद्यालयाच्या सीनेटचे सभासद म्हणूनही कार्य केले. सामान्य जनतेच्या प्रगतीला आवश्यक असलेल्या प्राथमिक शिक्षणाचे महत्व त्यांनी पूर्वीपासूनच जाणले होते, म्हणून त्याचा प्रचार करण्याच्या बाबतीतही त्यांनी विशेष श्रम घेतले.

**वचन साहित्य संशोधन–संपादन कार्य.**

अशारीतीनें त्यांच्या सार्वजनिक जीवनाचे क्षेत्र दिवसेंदिवस वृद्धिंगत होत होते तरी त्यांचा मुख्य ओढा साहित्यसेवेकडे असल्यामुळें त्यांनी त्याकडे विशेष लक्ष पुरविले. त्यांतल्या त्यांत त्यांच्या मनावर शिवशरणांच्या वचन साहित्याचा विशेष पगडा बसलेला असल्यामुळें साहित्य क्षेत्रातही त्यांनी मुख्यतः या वचन साहित्याच्या कार्यासच वाहून घेतले. त्यांत त्यांनो स्पृहणीय व चिरस्मरणीय कामगिरी केली. पंधराव्या शतकात प्राचीन वचन साहित्याचें पुनरुज्जीवन झाले होते तरी अलीकडच्या काळात वीरशैव समाजाचे त्याकडे दुर्लक्ष झाले होते. त्या-मुळे ते इतस्ततः जीर्णावस्थेंत पडून राहिले होतें, हे वर सांगितलेंच आहे. या सर्व साहित्याच्या हस्त लिखितांचा शोध करून त्यांचे संपादन व प्रकाशन करणें अत्यंत कठीण, फार श्रमाचे व खर्चाचे काम होते. सामान्यतः अशातऱ्हेचें कार्य सरकार मार्फत अथवा संघटित संस्था मार्फतच केले जाते. परंतु वीरशैव समा-जाची अशी कोणतीही संस्था त्यावेंळीं अस्तित्वांत नसल्या कारणानें श्री. हळकट्टीना हें कार्य आपल्या वैयक्तिक जबाबदारीवर व आपल्या पदराला खार लावूनच करावें लागलें. या कार्याकरतां त्यांनी साऱ्या कर्नाटकभर अनेक वेळा प्रवास केला. ज्याच्याकडे ही हस्तलिखिते पडून होती त्यांची मने वळवून व काही प्रसंगी पैसे देऊन सुद्धां ही हस्तलिखितें हस्तगत केली. तसेच त्याचे संपादन कार्यातही त्यांना एकट्यांनाच हें कार्य करावें लागलें. ह्याच्या प्रकाशन कार्याकरता त्यांनी सन १९२६ साली शिवानुभव नांवाचें मासिक आपल्या खर्चानें सुरू केले. त्यांत क्रमशः हे साहित्य प्रथम प्रकाशित करून नंतर ते ग्रंथरूपानें प्रसिद्ध केले. हें सर्व कार्य अवाढव्य खर्चाचे असून त्याकरतां त्यांना कोणाकडूनही म्हणण्या जोगी आर्थिक मदत मिळाली नाहीं. त्यांची स्वतःची आर्थिक परिस्थितोही विशेष समाधानकारक नव्हती. परंतु अंगिकारलेल्या कार्याबद्दल त्यांची निष्ठा व कळकळ दांडगी व दुर्दमनीय असल्यामुळें ह्या सर्व संकटांस तोड देऊन त्यांनी हे कार्य

अखंडपणे चालविले. ह्या सर्व प्रकाशन कार्यास स्वतंत्र मुद्रणालयाची अत्यंत आवश्यकता होती. परंतु त्या करतां आवश्यक असलेली रक्कम उभारण्यास त्यांना कोणाकडून कांहींच मदत मिळाली नाहीं. शेवटीं त्यांनी त्याकरतां आपले स्वतःचे घर विकून मुद्रणालयाची उभारणी केली. त्यानंतर त्यांना स्वतःच्या मालकीचे घर करता आले नाही व शेवटपर्यंत त्यांना भाडयाच्या घरातच रहावे लागले.

आपल्या शिवानुभव मासिकातून वचन साहित्याच्या प्रकाशनास त्यांनीं प्रारंभ केल्यानंतर थोडक्याच काळांत त्याना चांगली प्रसिद्धी मिळाली व साहित्य क्षेत्रांत त्यांचें नांव गाजू लागले. सन १९२६ सालीं बेळ्ळारीस भरलेल्या कन्नड साहित्य परिषदेच्या अध्यक्षस्थानीं त्यांची निवड झाली, व सन १९३० सालीं भरलेल्या अखिल भारत वीरशैव महासभेच्या अध्यक्षस्थानाची माळही त्यांच्या गळयात पडली. तसेच बेंगळूरच्या कन्नड साहित्य परिषदेनें मोठया समारंभानें त्यांच्या साहित्य सेवेबद्दल मानपत्र समर्पण करून त्यांचा गुणगौरव केला. त्यांची अमोलिक साहित्यसेवा लक्षात घेऊन कर्नाटक विश्वविद्यालयानेही त्यांना डॉक्टरेट पदवी समर्पण करून त्यांच्या गौरवयुक्त कार्यावर शिक्कामोर्तब केलें. त्याचप्रमाणे त्यांच्या कार्याला कांहीं तरी सक्रीय सहाय्य करावे या हेतूनें त्यांच्या कांहीं चहा-त्यांनी त्यांना थैली समर्पण करण्याचा समारंभ घडवून आणला. समाजातील कांहीं सामान्य लोकांनी या कार्यास हातभार लावला तरी समाजांतील धनिक लोकाकडून त्याला विशेष कांहीं मदत झाली नाहीं. या समारंभात जमलेली सर्व रक्कम त्यांनी वचन साहित्याच्या प्रकाशन कार्यासच समर्पण केली. वीरशैव धर्मासंबंधीचे एवढे महत्वाचें कार्य यशस्वी रीतीनें चालले असून सामान्य जनतेकडून त्याचें चीज होत असले तरी समाजाच्या सुशिक्षितांचे व धनिकांचे लक्ष त्या कार्या-कडे जाऊ नये, हें पाहून त्यांना फार वाईट वाटे. ही आपली भावना ते केव्हां केव्हां बोलून दाखवीत. सन १९५५ सालच्या शिवानुभव मासिकांत त्यांनी या संबंधी काढलेले निराशेचे उद्गार येथे उल्लेखनीय आहेत. त्यात त्यांनी आपण आज पर्यंत केलेल्या कार्याचें सिंहावलोकन करून शेवटी त्यांनी "याप्रमाणें आम्ही सतत तीस वर्षे अविश्रान्तपणे केलेल्या कार्याचे दृष्यफल आज दिसून येत आहे. परंतु कांही थोडे अपवाद सोडल्यास आमच्या समाजातील धर्मगुरु, सुशिक्षित लोक व व्यापारी बंधू यांच्याकडून आम्हाला कांहींच सहानुभूती मिळाली नाहीं, ही शोचनीय गोष्ट आहे," असे निराशेचे उद्गार काढले आहेत. दुर्दैवाची गोष्ट म्हणजे सांप्रत काळीसुद्धां आपल्या समाजाच्या ह्या दृष्टिकोनांत कांहीं बदल झालेला नाहीं व तीच शोचनीय स्थिती आजही अस्तित्वात आहे. आमच्या समाजातील

धनिक लोक आपल्या चैनीकरतां व निरर्थक समारंभाला व मिरवणूकीला हजारों रुपये उधळतील परंतु धार्मिक साहित्य प्रकाशनासारख्या सत्कार्याला एक कवडीही देणार नाहींत. अर्थात श्री. हळकट्टीनी वर सांगितल्याप्रमाणें त्याला काही अपवाद आहेत, परंतु ते फारच थोडे. अशावेळीं "घोड्यावर बसून छत्रचामरे मिरवीत मोठ्या समारंभानें येणाऱ्या स्वामीपुढें लोक लोटांगण घालतील व त्याचे पाय धरतील परंतु एखादा गरीब जंगम दारीं आला तर 'इकडे काही नाही; तिकडे जा.' असे म्हणतील. परंतु आमचा कूडल संगम देव अशा ढोंगी लोकांचे नाक कापल्याशिवाय राहणार नाहीं." ह्या श्री बसवेश्वराच्या वस्तुस्थिती निदर्शक वचनाची आठवण झाल्याशिवाय राहात नाही.

प्रकाशन कार्याचें विवरण.

श्री हळकट्टींनी वचन साहित्य क्षेत्रांत केलेल्या कार्याचा विस्तार अभिनंदनीय आहे. त्यांनी कर्नाटकाचा कोनाकोपरा धुंडाळून सुमारे एक हजार हस्तलिखित ग्रंथ गोळा केले. त्याशिवाय अनेक शिलालेख, ताम्रपट व इतर प्राचीन ऐतिहासिक साधनें संग्रहित केली. श्रीबसवेश्वर चरित्रावर प्रकाश पाडणारे अर्जुनवाड वगैरे शिलालेख त्यांनीच शोधून काढून प्रसिद्ध केले. सारांश सरकारचे पुराणवस्तु संशोधन खातेसुद्धां लाखो रुपये खर्च करून जेवढे कार्य करूं शकणार नाही तेवढें कार्य श्री. हळकट्टीनी स्वतःच्या हिमतींवर व पदरचे पैसे मोडून केलें. तसेच संग्रहित केलेल्या ह्या सर्व प्राचीन हस्त लिखितांचे संपादन व प्रकाशन कार्यंही तेवढेच बिकट व गुंतागुंतीचे होते. परंतु हे कार्य सुद्धा त्यांनी सततोद्योगाने यशस्वी रीतीनें पार पाडले. त्यांनी संग्रहित केलेल्या ग्रंथभांडारात श्री बसवेश्वर, चन्नबसवेश्वर, प्रभुदेव, अक्कमहादेवी, अक्क नागम्मा वगैरे सुमारे सत्तर स्त्रीपुरुष शिवशरणांच्या वचनांची हस्तलिखिते होती. ती सर्व त्यांनी संपादन करून 'वचन शास्त्र सार' नांवाच्या बृहद्ग्रंथाच्या चार खंडात प्रकाशित केली. वचनशास्त्राचा हा ग्रंथ आजतागायत प्रमाण ग्रंथ म्हणून मानला जात असून वचनशास्त्रावरील इतर आधूनिक ग्रथ त्याच्या आधारावरच रचले गेले आहेत. तसेच त्यांनी सर्व प्रमुख शिवशरणांच्या चरित्रांची ऐतिहासिक माहिती गोळा करून त्यांची चरित्रे प्रकाशित केली. दि. गुरुवर्य रानडेनी वाखाणलेला व वचन साहित्यावरील प्राचीन ग्रंथ 'शून्य संपादने' हा त्यांनीच प्रथम प्रकाशित केला. तसेच प्राचीन नामांकित वीरशैव कवि व संत हरिहर, राघवांक मग्गेय मायिदेव, तोंटदार्य सिद्धलिंग योगी यांचे कांहीं अमोलिक ग्रंथ यांनीच प्रकाशित

केले. या सर्व वचन साहित्यांत प्राचीन ग्रंथकारांनी वापरलेल्या सांप्रदायिक शद्वांना विशिष्ट अर्थ असून ते सर्वसाधारण कन्नड शद्वकोशात आढळून येत नाहींत. करितां वचन साहित्याच्या वाचकांना उपयुक्त होण्याच्या दृष्टीनें त्यांनी 'शिवानुभव शद्वकोश' नांवाचा एक शद्वकोशही रचला. या शिवाय निरंजन वंशरत्नाकर, केळदी, विळर्गी, वगैरे वीरशैव राजघराण्यांचा इतिहास, आदिशेट्टी पुराण, शिवानुभव सत्यमार्ग, अवधूत गीते, शिवानुभव सूत्रधार, वगैरे अनेक प्राचीन दुर्मिळ ग्रंथ संपादन करून प्रकाशित केले. याप्रमाणें त्यांनी प्रकाशित केलेल्या सर्व लहान मोठ्या ग्रंथांची संख्या सुमारे शंभर भरेल. वरील विवरणा-वरून श्री. हळकट्टींनी वचन साहित्याच्या पुनरुद्धारार्थ केलेल्या अमोलिक व अवाढव्य कामगिरीची कल्पना येईल. याच्यावरून त्यांना बहाल केली गेलेली 'वचन पितामह' ही पदवी किती अन्वर्थक आहे हे दिसून येईल.

**वचन पितामह फकीराप्पांचा फकीरीबाणा.**

श्री. फकीराप्पा हळकट्टी शिवशरणांच्या वचन साहित्याचे संशोधन व संपादन करणारे एक विद्वान संशोधक व साहित्यिक होते एवढेच नव्हे तर त्यांचे स्वतःचें जीवनही या प्राचीन शिवशरणाप्रमाणेच सात्त्विक, शुद्ध व सदाचारसंपन्न होते. त्याची राहणी अत्यंत साधी होती. त्यांची साधी राहणी व निगर्वी आणि विनयशील वागणूक पाहिली तर ते एक जाडे विद्वान व कबर्तगार व्यक्ति असतील अशी कोणालाही कल्पना येणे शक्य नव्हते. ते ध्येयवादी असून त्यांची ध्येय-निष्ठा अढळ व प्रखर होती. आपल्या ध्येयसाधनेच्या कार्यात त्यांना अनेक संकटांना तोंड द्यावें लागले. तरी ते कधी डगमगले नाहींत किंवा कार्यात खंड पडू दिला नाही. एवढे अवाढव्य संशोधन कार्य करण्याकरता त्यांना अनेक वेळा देशसंचार करावा लागला तरी त्यांनी कधीही स्पेशल वाहन ठेवले नाहीं. आरंभा-पासून आयुष्याच्या अखेरपर्यंत सायकलच त्यांची स्पेशल वाहन ठरली. साठी उलटून गेल्यानतरसुद्धां कितीतरी वर्षे ते सायकलवर सवार होऊनच इकडेतिकडे संचार करीत असत. आर्थिक अडचणी बरोबर कांहीं प्रापंचिक संकटांनाही त्यांना तोंड द्यावे लागले. उतार वयात त्यांचा एक सुशिक्षित व कर्तबगार तरुण मुलगा मरण पावला. त्यांची पत्नीही कांहीं रोगानें जर्जरित होऊन मरण पावली. अशी संकटे कोसळली तरी धैर्य गलित न होता त्यांनी आपले कार्य नेटाने पुढे चालविले. वकिली पेशानें संपादन केलेला सर्व पैसा अडका प्रपंचाच्या खर्चाकरतां व साहित्य प्रकाशन कार्याकरतां खर्च होत असल्याकारणें अखेरपर्यंत

त्यांना गरीबीतच दिवस कंठावे लागले. त्यांचें स्वतःचे घरदार तर नव्हतेंच. अंत्यकाळी असलेली त्यांची सारी संपदा म्हणजे एक लहानसे मुद्रणालय व आंतर्वृद्याच्या व्यवहाराचा धार्मिक ग्रंथसंग्रह. त्यांच्या नांवाप्रमाणें (फकीराप्पा) त्यांनीं आपले सारे जीवन खरोखरच फकीरी बाण्यानें कंठले. त्यांच्या सुदैवानें नव्हे तर वीरशैव समाजाच्या सुदैवानें त्यांना दीर्घायुष लाभले होते. हे दीर्घायुष त्यांनी अखंडपणें वचन साहित्याच्या सेवेत घालवून त्याला मूर्तस्वरुप दिलें. प्राचीन शिवशरणांचा हा अमूल्य ठेवा वीरशैव समाजास समर्पण करून आपल्या वयाच्या ८५ व्या वर्षी ( २७ जून १९६४ ) त्यांनी आपली इहलोकची यात्रा संपविली. आतां त्यांचा पार्थिव देह नष्ट झाला असला तरी आपल्या असामान्य व प्रशंसनीय साहित्यसेवेच्या रूपानें त्यांनी आपलें नांव अजरामर करून ठेवले आहे त्यांचें स्वार्थत्यागी व फकीरी बाण्याचें आदर्श जीवन आजच्या समाज सेवकांना स्फूर्तिदायक व मार्गदर्शक आहे यात काही संशय नाहीं.

---

लेखांक १८

# वीरशैव धर्माचे षट्-स्थल शास्त्र

( सन १९६६ डिसेंबर महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख )

कोणत्याही धर्माच्या तत्त्वज्ञानात त्या धर्माचे अंतिम ध्येय व ते ध्येयप्राप्त करून घेण्याला अवश्य असलेला साधनमार्ग असे दोन भाग असतात. त्याप्रमाणे वीरशैव धर्मानुसार शिवजीवैक्याचे ध्येय साध्य करून घेण्यास 'षट्स्थल शास्त्र' हा साधन मार्ग आहे. ह्या षट्स्थल शास्त्रांत शिवाला 'लिंग * ' म्हणजे आपणामध्ये सर्व चराचर सृष्टी विलीन करून घेणारे शिवतत्त्व व जीवाला 'अंग' म्हणजे अशा लिंगामध्यें विलीन किंवा एकजीव होण्याची इच्छा करणारा जीव अशी पारिभाषिक नांवे आहेत.

'अंगाने' षट्स्थल मार्ग अवलंबून शेवटी लिंगामध्ये समरस होणें हे वीरशैव सिद्धांताचे अंतिम ध्येय आहे. यामुळे या ध्येयाला 'लिंगांग सामरस्य' असे नाव दिलें आहे.

---

* लीयते गम्यते यत्र येन सर्वं चराचर ।
तद्वेतल्लिंगमित्युक्तं लिंगतत्व परायणैः ।।
अमिति ब्रह्म सन्मात्रं गच्छतीतिग मुच्यते ।
रूप्यत्यगमिति प्राज्ञैः अंगतत्व विशारदैः ।।

— अनुभवसूत्र

जीव मूलत: शिवाचा अंश असला तरी शक्तिनिर्मित मलत्रयीनें ( आणव-मल, माया मल, कार्मिक मल ) बद्ध होऊन पंचभूतात्मक देह धारण करतो व आपल्या मूळ शुद्ध रूपाला विसरून जाऊन जगाच्या सुखदुःखाच्या जाळ्यात गुरफटला जातो. त्यामुळें त्याला वरचेवर पुनर्जन्म घ्यावे लागतात. मूल तत्त्वाच्या एकत्त्वांत अनेकत्त्व निर्माण करणाऱ्या मलाला 'आणवमल', माये-पासून उत्पन्न होणाऱ्या मलाला 'माया-मल' व पूर्वकर्मांमुळे निर्माण होणाऱ्या मलाला 'कार्मिक मल' अशी नांवे आहेत. ह्या मलत्रयीनें जीव बांधला गेला असला तरी त्याला उपरति होऊन वीरशैव धर्म शास्त्राप्रमाणे योग्य गुरुकडून शिवदीक्षा † घेऊन लिंगधारणा केली तर ह्या मलत्रयीचा नाश होऊन तो शुद्ध जीव बनतो व शिवजीवैक्याच्या मार्गाचे अवलंबन करण्यास लायक होतो. अशी ही शिवदीक्षा तीन प्रकारची आहे. * क्रियादीक्षा, मंत्रदीक्षा, वेधादीक्षा हे तीन प्रकार होत. दीक्षागुरु क्रियादीक्षेनें इष्टलिंग, मंत्रदीक्षेनें प्राणलिंग व वेधादिक्षेनें भाव-लिंग साधकाच्या हस्त, प्राण व आत्मा यामध्ये स्थापित करतो.

इष्टलिंग हे नित्य पूजाअर्चा करण्याचे स्थावर लिंग असून, प्राणलिंग हे साधकाच्या प्राणामध्यें स्थापन केलेलें सुक्ष्मलिंग आहे. ह्या लिंगाचा साधकाच्या सूक्ष्म शरीराशी संबंध असतो. त्याचप्रमाणें भावलिंग साधकाच्या समाधिस्थितींत त्याच्या सर्व मनोवृत्ती नष्ट करणारे असून, त्याचा साधकाच्या कारणशरीराशीं संबंध असतो. या प्रमाणे सद्गुरुकडून शिवदीक्षा घेऊन मोक्षमार्गाचे आक्रमण करीत असताना साधकाला, भक्ताला व उपासकाला भक्त, महेश, प्रसादी, प्राण-लिंगी, शरण व ऐक्य अशा सहा अवस्थामधून जावे लागते. याना 'अंगस्थले'

---

† शिवदीक्षेची व्याख्या —

१) दीयते लिंगसंबंधः। क्षीयते कर्म संचयः ॥
दीयते क्षीयते यस्मात् । सा दीक्षेति निगद्यते ॥

— लिंगपुराण

२) ददाति शिवतादात्म्यम् । क्षीणोतिच मलत्रयम् ॥
अतोदीक्षेति सा प्रोक्ता । दीक्षातंत्रार्थवेदिनः ॥

---

* सा दीक्षा त्रिविधा प्रोक्ता शिवागम विशारदैः ।
वेधारूपा, क्रियारूपा, मंत्ररूपा च तापसा ॥

— सिद्धान्त शिखामणि प. ६ श्लो. १२

असें पारिभाषिक नांव आहे. या सहा अंगस्थलाशी असलेले लिंगाचे आचारलिंग, गुरुलिंग, शिवलिंग, चरलिंग, प्रसादलिंग व महालिंग असे सहा प्रकार मानले आहेत. यांना सहा 'लिंगस्थले' म्हणतात. तसेंच लिंगस्थलात शक्ति व अंगस्थलात भक्ति अधिष्ठित आहेत यामुळे वरील सहा लिंगस्थलामध्ये अनुक्रमें क्रियाशक्ति, ज्ञानशक्ति, इच्छाशक्ति, आदिशक्ति, पराशक्ति व चित्शक्ति या सहा शक्ति व अंगस्थलात अनुक्रमें सद्भक्ति, नैष्ठिक भक्ति, अवधान भक्ति, अनुभव भक्ति, आनंद भक्ति व समरस भक्ति या सहा प्रकारच्या भक्ति अधिष्ठित आहेत. साधक वरील सहा अंगस्थलातून जात असतांना संबंधित असलेल्या त्या त्या लिंगस्थलाशी त्याला तादात्म्य व्हावें लागते.

मोक्षमार्गाचे आक्रमण करीत असतांना साधकाला अगदी व्रतस्थ राहून शुद्ध मनानें काही कठिण व्रते अथवा क्रिया साधनें पाळावी लागतात. षट्स्थल शास्त्राप्रमाणें हीं गुरु, लिंग, जंगम, पादोदक, प्रसाद, भस्म, रुद्राक्षी व मंत्र अशी आठ व्रतें आहेत. ह्यांनाच 'अष्टावरण' असे पारिभाषिक नांव आहे. त्याच प्रमाणें साधकाला काही आचारांचे अवलंबन करावे लागते. हे सदाचार, शिवाचार, लिंगाचार, भृत्याचार, गणाचार असे पांच प्रकारचे आचार आहेत. ह्यांना 'पंचाचार' म्हणतात. येथे नमुद केलेल्या कांहीं पारिभाषिक शब्दांचे अर्थ अथवा मुख्य लक्षणें खालीं दिली आहेत.

अष्टावरण.

१) गुरु :– शुद्धाचरणी व ज्ञानमूर्ती असून शिवदीक्षा देण्याची लायकी असलेला दीक्षा-गुरु.

२) लिंग ( इष्टलिंग ) :– दीक्षागुरुनें शिवदीक्षायुक्त दिलेलें इष्टलिंग. दीक्षाविरहित सामान्य लिंग नव्हे.

३) जंगम :– सिद्धावस्थेला पोचलेला सिद्ध. नामधारी जंगम नव्हे. वीरशैव सिद्धांतात गुरु, लिंग, जंगम हे प्रत्यक्ष शिवच आहेत असे मानले जाते.

४–५) पादोदक व प्रसाद :– गुरु, लिंग, जंगम यांचे पादोदक व प्रसाद सेवन करण्यानें साधकाचा अहंकार नष्ट होतो.

६) भस्म :– शास्त्रोक्त रीतीने तयार केलेली विभूति. कोणतेही भस्म अथवा राख नव्हे. ही साधकाची अंतर्बाह्य शुद्धी करते.

७) रुद्राक्षि :– अंतर्ज्ञानाची दृष्टी निर्माण करणारे शिवचिन्ह.

८) मंत्र :– 'नमःशिवाय' हा पंचाक्षरी मंत्र अथवा 'ॐ नमः शिवाय' हा षडक्षरी मंत्र.

पंचाचार.

१) सदाचार : सतत शुद्ध व सात्विक कर्म करीत राहणें.

२) शिवाचार : लिंगधारी लोकांना शिवस्वरुप मानून त्यांची सेवा करणें.

३) भृत्याचार : सेवकभावानें गुरुलिंग व जंगम यांची सेवा करणे.

४) लिंगाचार : अंगावर इष्टलिंग धारण करून दररोज मनोभावें त्याची पूजा अर्चा करणें.

५) गणाचार : सतत वीरशैव धर्माचे रक्षण करणें व प्रसंगविशेषीं धर्माचें संरक्षण करण्याकरतां आपला प्राणत्यागही करणें.

षट्स्थल.

१) भक्तस्थळ :— साधकानें देहाचा अभिमान सोडून काम, क्रोध, लोभ, मद, मोह, मत्सर वगैरे दुर्गुणांचा त्याग करून समता, विश्वबंधुत्व, सत्य, अहिंसा, दया, क्षमा, शांति, निर्लोभिता वगैरे सद्गुणांचे अवलंबन करून सतत शिवभक्तीत रममाण होणे, इष्टलिंगाची मनोभावें पूजा करणें, त्याचप्रमाणें विनयशील वृत्तीनें व भक्तिभावाने गुरु, लिंग, व जंगम यांची सेवा करून, त्यांच्या पादोदक प्रसादाचे सेवन करणें, अंगावर भस्म, लिंग, रुद्राक्षि धारण करून व सतत पंचाक्षरी अथवा षडक्षरी मंत्र जपून पंचाचाराप्रमाणें आपले वर्तन ठेवणें, ही भक्तस्थलाची मुख्य लक्षणे आहेत. ह्या स्थलामध्ये सात्त्विकवृत्ति, शुद्धाचरण, देवावर विश्वास व भक्तिभाव हे गुण प्रामुख्याने दिसून येतात.

२) महेशस्थल :— भक्तस्थलात वर्णन केल्याप्रमाणें वर्तन ठेवून देवावर व गुरुनें उपदेशिलेल्या मोक्षमार्गावर दृढविश्वास ठेंवणें हे महेशस्थलाचे मुख्य लक्षण आहे.

३) प्रसादीस्थळ :— भक्त व महेश या स्थलात वर्णिल्याप्रमाणें आचरण ठेवून प्रत्येक गोष्टीचा कर्ताकरविता शिव आहे या भावनेनें आपले सर्वस्व शिवाला अर्पण करून ते परत त्याचा प्रसाद म्हणून स्वीकार करणें. शिवार्पण न केलेल्या कोणत्याही वस्तूचा उपभोग न घेणें, ही प्रसादी स्थलाची लक्षणे आहेत. यामुळे साधकांची निरासक्त बुद्धी बळावून कोणतेही कार्य निष्काम बुद्धीने करण्याची प्रवृत्ति याच्यामध्ये दृढमूल होते.

४) प्राणलिंगी स्थल :– भक्त, महेश व प्रसादी या स्थलात वर्णिल्याप्रमाणें आचरण ठेवल्यामुळें साधकाचे चित्त शांत व स्थिर होते व त्याची दृष्टी अंतर्मुख होऊन प्रत्येक वस्तुमध्ये त्याला शिवाच्या अधिष्ठानाचा भास होऊ लागतो. त्यामुळे आपला प्राण हाच लिंग व लिंग हाच आपला प्राण ही भावना त्याच्या मनात दृढमल होते.

५) शरणस्थल :– या अवस्थेत साधक संपूर्ण ज्ञानी होऊन आत्म-साक्षात्काराच्या अवस्थेला पोचतो. त्याला सर्व जग शिवमयच दिसू लागते. 'सर्व धर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज' या गीतेतील भगवंताच्या उपदेशाप्रमाणें तो आपणाला सर्वस्वी शिवचरणीं वाहून घेतो; सतत त्याच्याच ध्यानामध्यें निमग्न राहून त्यांतच रममाण होतो.

६) ऐक्यस्थल :– साधकाची ही शेवटची म्हणजे सिद्धावस्था आहे. या अवस्थेंत त्याचा द्विधाभाव नष्ट होऊन तो शिवाशी पूर्णपणे समरस होऊन जातो. हेंच वीरशैव सिद्धान्ताचे लिंगांगसामरस्य अथवा शिवजीवैक्य नामक अंतिम ध्येय होय.

वर वर्णिल्याप्रमाणें या शिवजीवैक्य साधनमार्गाच्या समुच्चयालाच 'षट्स्थल शास्त्र' म्हणतात. या षट्स्थल शास्त्राला वीरशैव धर्माचरणात फार महत्व असून त्याचे सविस्तर विवेचन वेळोवेळी उदयास आलेल्या वीरशैव दर्शनकारांनी केले आहे. कांहीं दर्शनकारानीं ह्या सहा अंगस्थलांचे ४४ व लिंगस्थलांचे ५७ अशी १०१ स्थले कल्पिली आहेत. ह्यांना 'एकोत्तर शतस्थलें' म्हणतात. त्याचप्रमाणे कांहीं दर्शनकारांनी ६ स्थलांची ३६ त्याचे पुनः २१६ अशीं स्थलें कल्पिली आहेत. परंतु एकंदरीत वीरशैव सिद्धांतामध्यें ह्या सर्व स्थलापेक्षा षट्स्थलालाच जास्ती प्राधान्य दिले आहे. ह्या षट्स्थल शास्त्रांचे विवेचन प्रथमतः सूक्ष्मागम, पारमेश्वरागम व वातुलागम या शैवागमात व सिद्धान्त शिखा-मणी मध्ये केले गेले असून बसवकाळीं व त्याच्यानंतर उदयास आलेल्या शिव-शरणांनी आपल्या वचनामध्यें व दर्शनकारानी आपण रचलेल्या ग्रंथामध्यें त्यांचे सविस्तर वर्णन केले आहे. विशेषतः श्री चन्नबसवेश्वर हे षटस्थल शास्त्राचे आचार्य म्हणून मानले जातात. त्याचप्रमाणें श्रीपती पंडितांच्या श्रीकर भाष्या-मध्येही षट्स्थल शास्त्राचें विवेचन केले गेले आहे.

षट्स्थल सिद्धान्ताचे सामान्य रेखाचित्र.



हे षट्स्थल शास्त्र अथवा शिवजीवैक्याचा साधनमार्ग सामान्य माणसाना सुद्धा सुलभ रीतीनें समजण्याच्या दृष्टीनें वीरशैव दर्शनकारांनी एका व्यावहारिक व लाक्षणिक उदाहरणानें त्याचा खुलासा केला आहे. तो असा, साधकानें (जीवानें) शिवदीक्षारुपी सरोवरामध्ये स्नान करून, मलत्रयीना धुवून टाकून, सद्गुरुने दिलेलें दीक्षायुक्त इष्टलिंग धारण करावे. तेव्हां साधक किंवा उपासक शुद्धजीव बनतो. अशा शुद्धजीवी साधकानें 'अष्टावरण' रुपी आवरण अथवा अंगरक्षक कवच धारण करून व हातांत 'पंचाचार' नामक दंडाचा आधार घेऊन शिवभक्तियुक्त होऊन व मुखानें 'ॐ नमः शिवाय' हा षडक्षरी मंत्र जपीत 'शिव-जीवैक्य' नामक मंदिराकडे प्रयाण करावे. वाटेंत लागणाऱ्या 'षट्स्थल' नामक सहा पायऱ्या क्रमानें चढून शेवटच्या 'ऐक्य' नामक पायरीवरून शिवजीवैक्य देवालयामध्यें प्रवेश करून त्यानें तेथील शिवामध्यें (अंतरात्मामध्यें) ऐक्य (समरस) व्हावे.

वरील सर्व विवेचनावरून 'वीरशैव सिद्धान्त' किती वैशिष्टचपूर्ण व शास्त्रोक्त आहे व ह्या सिद्धान्ताचे प्रतिपादन वीरशैव दर्शनकारांनी कसे सुस्पष्ट व सोप्या भाषेत व सुगम पद्धतीने केले आहे याची पूर्ण कल्पना येईल. मोक्षमार्गाचे आक्रमण करतांना क्रमाक्रमानें पायऱ्या चढून जाण्याची कल्पना नुसत्या वीरशैव सिद्धान्तकारांची नसून श्री समर्थ रामदास स्वामींनी या सोपान मार्गाचा पुरस्कार केला आहे. जसे,

देवा एवढे चपळ नाही । ब्रह्माएवढं निश्चल नाही ।।
पायरी पायरीने चढोनि पाही । मूळ परियंत ।। २०।४।३० – दासबोध.

परंतु वीरशैव संतांनी केल्याप्रमाणें श्री समर्थानी ह्या सोपान मुक्तिमार्गाचे शास्त्रोक्त विवेचन मात्र केलेले नाही.

षट्स्थलाच्या धर्माचरणाविषयीं वीरशैव शिवशरणांनी पुनः पुनः एक गोष्ट जोरानें सांगितली आहे ती ही की षट्स्थलाचे शास्त्र मुख्यतः भक्तिमार्गावर उभारलेले असल्या कारणानें ह्या शास्त्रात वर्णिलेले आचार विचार नुसत्या यांत्रिक रीतीनें आचरल्यानें कांहीं लाभ होणार नाही, उलट त्यामुळे दंभाचार व ढोंग मात्र वाढेल. करिता अनन्यमनस्क होऊन भक्तिभावानें, श्रद्धेनें, आत्मविश्वासानें व समर्पण बुद्धीनें त्यांचे आचरण केले पाहिजे. तसे शुद्धाचरण केल्यानेच त्या

पासून योग्य फलप्राप्ती होईल. तसे शुद्ध व वरीलप्रमाणे शास्त्रोक्त आचरण न करतां उगीच बाह्यावडंबर करणाऱ्यांना उद्देशून षट्स्थल – ज्ञानमूर्ति श्री चन्न-बसवेश्वर, श्री प्रभुदेव, अक्क महादेवी यांनी आपल्या अनुभवपूर्ण वचनात खालील प्रमाणे सांगितले आहे.

"डोके तुळतुळीत करून भगवी वस्त्रे धारण केल्यानें अथवा अंगाला भस्म फासून रुद्राक्षि धारण केल्यानें कोणी जंगम ( संत ) होऊ शकत नाही. ज्ञानी व सदाचारी मनुष्य, जटाधारी असो वा नसो, तोच खरा जंगम ( संत ) होय."

– श्री चन्नबसवेश्वर.

"पोटावर नुसते अन्न बांधून घेतल्याने पोटाची क्षुधा शांत होत नाहीं.

तसेच निवळ दगडावर स्थावर लिंग आहे म्हणून दगड कांहीं भक्त होऊ शकत नाहीं.

त्याचप्रमाणें संस्कार, श्रद्धा व सदाचाराशिवाय नुसतें अंगावर इष्टलिंग बांधून घेतल्यानें कोणी काही सद्भक्त होऊ शकत नाहीं."

– श्री प्रभुदेव.

"काम, क्रोध, लोभ, मद, मोह, मत्सर व आमिष या सात भवींना ( शत्रूना ) तुमच्या देहांत स्थान देऊन तुम्ही अलिंगी लोकांना भवी ( प्रापंचिक ) म्हणता ? आपल्या अंतरंगातील लिंगाचे ( देवाचे ) ज्ञान नसतांना मी शुद्धप्रसादी, मी नित्यप्रसादी ( भक्त ) म्हणून बढाई मारून बाह्य लिंगावर पाणी ओतून पूजा करणाऱ्या दांभिक लोकांना चन्नमल्लिकार्जुन ( देव ) कधी तरी वश होईल काय ?

– अक्क महादेवी वचन.

सारांश याप्रमाणें सर्व शिवशरणांनी यांत्रिक बाह्याचाराचा व दांभिक आचरणांचा कठोर शद्वामध्यें निषेध व्यक्त करून सदाचार व सद्वर्तन यांनाच महत्व दिले आहे.

लेखांक १९

# महात्मा बसवेश्वर बिज्जळ राजाचे प्रधानमंत्री मुळीच नव्हते!

(सन १९६८ जानेवारी महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख)

सामान्यत: सर्व प्राचीन महापुरुषांच्या चरित्रांत वादग्रस्त गोष्टी असलेल्या दिसून येतात. परंतु महात्मा बसवेश्वराच्या चरित्रांत जेवढ्या वादग्रस्त गोष्टी आहेत तेवढ्या दुसऱ्या कोणत्याही महापुरुषाच्या चरित्रांत दिसून येत नाहीत. महात्मा बसवेश्वर एक थोर संत व धर्मगुरु होते. त्यांनी वीरशैव धर्माचा पुनरुद्धार केला. त्यामुळें त्यांच्या जीवनावर आजपर्यंत अनेक काव्यें व पुराणें रचली गेली आहेत. परंतु हे सर्व साहित्य सांप्रदायिक दृष्टीने व बसवेश्वरावरील भक्तीभावनेनें लिहिले गेले असल्यामुळें व हें साहित्य निर्माण करणाऱ्या साहित्यिकांना बसवेश्वराची प्रत्यक्ष अथवा आधारभूत माहिती नसल्यामुळें त्या साहित्यांत बसवेश्वराच्या जीवनचरित्राचा सत्यांश फारच कमी आहे. एवढेंच नव्हे तर मूढ भक्ति भावनेच्या भरांत त्यांनी त्यांत बसवेश्वरासंबंधी अनेक अतिरंजित अथवा काल्पनिक गोष्टीही घुसडून दिल्या आहेत. बसवेश्वर त्यावेळी कल्याण येथें राज्य

करीत असलेल्या कलचूरी वंशीय विज्जळ राजाचे प्रधानमंत्री होते व राज्याचा सर्व कारभार तेच पहात होते व त्यांनी आपल्या कारकीर्दीत अनेक सुधारणा घडवून आणल्या, असली विधानें ह्या प्राचीन ग्रंथांत व त्यांना अनुसरून लिहिल्या गेलेल्या सांप्रत काळच्या ग्रंथातही आटळून येतात. परंतु प्राचीन शिलालेख वगैरे ऐतिहासिक साहित्य व खुद्द बसवेश्वराची वचने यांचे निरीक्षण केल्यास ही गोष्ट असत्य व असंभवनींय आहे असे दिसून येते.

**विज्जळ, पराक्रमी, राजकारणपटु, परंतु कावेबाज राजा होता.**

बसवेश्वरासंबंधीचीं काव्यें व पुराणें यांत राजा विज्जळ हा एक दुर्बळ नेभळट व हलक्या कानाचा राजा होता व आरंभीं बसवेश्वरावर त्याचा संपूर्ण विश्वास असला तरी पुढे चहाडखोर लोकांच्या शिकवणीमुळें त्याच्या मनांत बसवेश्वराच्या वाढत्या प्राबल्याबद्दल मत्सर उत्पन्न झाला, त्यामुळें घडी घडीं त्यांच्यामध्यें खटके उडूं लागले, परंतु ह्या भांडणांत शेवटी बसवेश्वराच्या आध्यात्मिक बलापुढे त्याला नमते घ्यावे लागे, असे नमूद केले गेले आहे. परंतु ही गोष्ट असत्य व . काल्पनिक आहे. त्यावेळच्या शिलालेखांतील लिखाणावरून पहाता विज्जळ हा एक शूर, पराक्रमी, व्यवहार-चतुर, राजकारणपटु परंतु धूर्त, कावेबाज व महत्वाकांक्षी राजा होता असे दिसून येते. आरंभी हा त्यावेळच्या चालुक्य राजाचा एक लहान मांडलिक होता. परंतु कालक्रमानें आपल्या कर्तब-गारीनें चालुक्य राजाच्या दरबारांत त्यानें आपलें प्रस्थ वाढविलें व शेवटी त्या राजालाच पदच्युत करून तो चालुक्य साम्राज्याचा सम्राट बनला, हे ऐतिहासिक सत्य पाहिले असतां वर नमूद केलेले पुराणांतील विज्जलाचे वर्णन किती निराधार आहे हे दिसून येते.

**त्यावेळच्या कोणत्याहि शिलालेखांत बसवेश्वराचा उल्लेख नाहीं.**

विज्जळ राजाच्या कारकीर्दीत कोरले गेलेले सुमारे पन्नास शिलालेख सांप्रत उपलब्ध आहेत. त्या सर्वात त्याचे व त्याच्या हाताखालील अनेक सरदार मांड-लीक व अधिकारी यांचे उल्लेख आढळून येतात. परंतु या पैकी एकाही शिलाले-खात बसवेश्वराचा उल्लेख दिसून येत नाही. बिज्जळाने बारा वर्षे राज्य केले व त्या सर्व अवधींत ते बिज्जळाच्या पदरीं होते. परंतु ते प्रधानमंत्री असते तर एखाद्या तरी शिलालेखात त्यांचा उल्लेख आला नसता काय ?

## बसवेश्वर साक्षात्कारी संत होते.

त्यावेळच्या शिलालेखात अथवा इतर ऐतिहासिक साहित्यांत वसवेश्वराचा उल्लेख दिसून येत नाही. ही काव्ये व पुराणें निराधार असल्यामुळें त्याच्यावरून बसवेश्वरांच्या जीवनाची खरी हकीगत कळून येत नाही. असे असले तरी सुदैवाने त्यांनी स्वतः रचलेली वचने सांप्रत उपलब्ध आहेत. त्यांच्यामध्ये त्यांच्या ऐहिक जीवनाचे उल्लेख विशेष दिसून येत नसले तरी त्यांचे आध्यात्मिक जीवन व आचार विचार ह्यांचे संपूर्ण व स्पष्ट चित्र त्यांत उमटले आहे त्याच्यावरून पहाता ते भगवान बुद्ध, येशु खिस्त व महात्मा गांधीजी यांच्याप्रमाणे संपूर्ण अहिंसावादी व सत्यवादी असून भूतदया, प्रेम, निस्वार्थ, नम्रता वगैरे सद्‌गुणांनी मंडित असे भक्तिमार्गीय साक्षात्कारी संत होते.

निरनिराळ्या धर्मांतील सर्व प्रमुख संतांच्या चरित्राचा अभ्यास केलेले दि. गु. रानडे यांनीही बसवेश्वराबद्दल असाच अभिप्राय नमूद केला असून त्यांनी त्यांची सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय संत तुकाराम महाराज यांच्याशी तुलना केली आहे. बसवेश्वराचे अहिंसा व्रत नुसते कायीक नसून महात्मा गांधीजीप्रमाणें ते काया, वाचा, मने संपूर्ण अहिंसावादी होते. यज्ञामध्येसुद्धा पशुहत्या करण्यास त्यांचा विरोध होता. कोणाच्या मनाला लागेल असे कठोर शद्बसुद्धा उच्चारू नयेंत असा त्यांचा उपदेश होता. संतांच्या अंगी प्रामुख्यानें दिसून येणारे नम्रता, सरलता, भूतदया, प्रेम वगैरे सद्‌गुण तर त्यांच्या अंगी ओतप्रोत भरले होते, हे त्यांच्या वचनावरून स्पष्ट दिसून येते. तसेच धार्मिक चर्चेकरतां त्यांनी 'अनुभव मंटप' नांवाची धार्मिक संस्था स्थापून ते आपला बहुतेक काळ लिंग-पूजा, शिवशरणांची (साधुसंताची) सेवा व धार्मिक चर्चा, उपदेश ह्याच्या मध्यॆंच घालवित होते. असा हा संत महत्वाकाक्षी, धूर्त व कावेबाज राजाचा प्रधानमंत्री होऊन राज्यकारभार चालविणे शक्य होते काय ?

## महात्मा गांधीजींनी कोणतेही अधिकारपद स्वीकारले नाहीं.

या बाबतीत दुसरी एक गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. 'म.गांधीजी स्वतंत्र हिंदूस्थानचे प्रधानमंत्री झाले असते तर ?' असा एक प्रश्न टाईम्स आफ इंडिया पत्रानें दोन वर्षामागे आपल्या देशाच्या काही पुढाऱ्यांना विचारला होता. त्याला

कै शास्त्रीजी, श्री. मुरारजी, कै. श्रीप्रकाश वगैरे पुढ.त्यांनी दिलेले उत्तर मननीय आहे. 'महात्मा गांधीजी संपूर्ण अहिंसावादी व सत्यवादी होते. ते प्रधानमंत्री होणे शक्य नव्हते व एखादेवेळी झाले असते तर सध्याच्या परिस्थितीत त्यांची कारकीर्द संपूर्ण अयशस्वी झाली असती. म्हणूनच जरी त्यांनी स्वातंत्र्य युद्धाचे नेतृत्व स्वीकारले होते व ते स्वतंत्र हिंदुस्थानचे एकमेव नेते होते तरीसुद्धा स्वतंत्र हिंदुस्थानच्या राजवटीत त्यांनी कोणतेही अधिकारपद स्वीकारण्याचे नाकबूल केले होते' असा त्यांनी आपल्या उत्तरात उल्लेख केला आहे. लोकशाही राजवटीत सुद्धां जर महात्मा गांधीजी प्रधानमंत्री होणे शक्य नव्हते तर बाराव्या शतकात बिज्जल राजासारख्या प्रबळ व निरंकुश राजाच्या राजवटीत म. गांधीजी सारखेच संपूर्ण अहिंसावादी असलेले बसवेश्वर त्या राजाचे प्रधानमंत्री असणे कसे शक्य आहे? तसेच बिज्जल राजाच्या कारकिर्दीत शांतता नांदत होती असेही नाहीं. दुसऱ्यांचें सिंहासन बळकावूनच तो राजा झाला असल्या कारणानें, दुसऱ्या राजाशी व इतर मांडलिकाशी लढून त्यांच्यावर आपली सत्ता स्थापण्यात व आपल्या विरुद्ध रचले जात असलेले राजकीय कट मोडून काढण्यातच त्याचा सर्व वेळ गेला. त्याच्या भावानेंच त्याच्याविरुद्ध रचलेल्या राजकीय कटामुळेच त्याला आपल्या प्राणाला मुकावे लागले. अशा हिंसाचाराच्या व धामधूमीच्या काळात बसवेश्वर त्याचा प्रधानमंत्री होऊन राज्यकारभार पाहणें अगदीच अशक्य व असंभवनीय आहे.

## बसवेश्वराच्या आयुष्यातील दोन घटना.

ह्या बाबतीत त्यांच्या वचनामध्येच नमूद केल्या गेलेल्या त्यांच्या आयुष्यांतील दोन घटना उल्लेखनीय आहेत. एकदा त्यांच्या आश्रमाच्या गायी रानात चरत असतांना काहीं चोरांनी पळवून नेल्या. ही हकीगत गुराख्यांनी येऊन बसवेश्वरांना सांगितल्यावर 'उगीच आरडाओरड करू नका. गाईचा उपभोग घेणारा देव येथे असल्याप्रमाणें तेथेही आहे, परंतु वासरे नसल्यामुळें गाई हंबरडा फोडीत असतील, करितां या वासरांना नेऊन त्या चोराकडे सोडा.' अशी त्यांनें गुराख्यास आज्ञा केली. त्यांनी तसे केले असतांना त्या चोरांना पश्चात्ताप होऊन ते बसवेश्वरास शरण येऊन त्यांचे भक्त बनले. त्याचप्रमाणें एका रात्रीं एक चोर त्यांच्या घरात शिरून त्यांच्या पत्नीच्या अंगावरील दागिने काढून घेत असतांना, जागी होऊन तिने आरड़ा ओरड केली. तेव्हा तो चोर पळून जात असतांना सेवकांनी त्याला पकडून बसवेश्वरापुढें उभे केले, तेव्हां देवाची ही संपत्ती नेण्यास आलेला मनुष्य चोर नसून देवच आहे.

करितां 'तुझ्या अंगावरील सर्व दागिने काढून त्याच्या हवाली कर' अशी वसवेश्वरांनी तिला आज्ञा केलीं. तेव्हा तो चोर पश्चात्ताप पावून त्यांचा भक्त बनला. अशा काटेकोरपणाने व एक निष्ठेने अपरिग्रहव्रत पाळणारे वसवेश्वरं प्रधानमंत्री म्हणून राज्यकारभार पहात असतांना चोरांना व दरवडेखोरांना शिक्षा करीत होते की तेथेही त्यांना सोडून देऊन उलट फिर्यादींनाच आपला तत्त्वोपदेश करीत होते ? तसेच, काही राजकारणी सज्जनाप्रमाणें वैयक्तिक जीवन व सार्वजनिक जीवन ह्यांच्यामध्ये भेद करणारे वसवेश्वर नव्हते. 'बोले तैसा चाले' हे तर त्यांचे मुख्य ब्रीद होते. ह्या दोन घटनाचा विचार करता वसवेश्वर प्रधानमंत्री पदावर असणें अशक्य कोटीतील गोष्ट होती.

**बसवेश्वर क्रांतिकारी समाजसुधारक होते.**

तसेच वसवेश्वर जसे अहिंसावादी व भक्तिमार्गी संत होतें त्याचप्रमाणें ते क्रांतिकारी समाजसुधारकही होते ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. आपल्या हिंदु समाजात जातिभेद, अस्पृश्यता, या सारख्या अनिष्ट रूढी आजसुद्धा किती प्रबल व दृढमूल आहेत हे आपण प्रत्यक्ष पाहातो. प्राचीन काळी तर समाजावरील त्यांची मगरमिठी अत्यंत बळकट होती. अस्पृश्य लोकांना गांवामध्ये येण्याससुद्धा मनाई होती. चातुर्वर्ण्य समाजव्यवस्थेमुळे स्पृश्य हिंदु समाजातही अनेक जाती निर्माण होऊन त्याच्यामध्ये रोटीबेटी व्यवहार संपूर्णपणें बंद झाला होता. समाजामध्यें उच्चनीच भावना बोकाळून परस्पर द्वेषाला ऊत आला होता. खुद्द विज्जळ राजाही पुराणमतवादी शैव–हिंदू असून जातिभेद व अस्पृश्यता मानणारा होता. त्याच्या दरबारात व राज्यामध्येही अशा पुराणमतवादी व रूढीप्रिय कर्मठ हिंदूंचेच प्राबल्य होते. अशा परिस्थितींत वसवेश्वरांनी अस्पृश्यांची अस्पृश्यता नष्ट करून व समाजातील जातिभेदाला मूठमाती देऊन समता व बंधुभाव यासारख्या उदात्त तत्त्वावर सर्व समाजात एकी घडवून आणून त्यांच्यामध्ये रोटीबेटी व्यवहार सुरु केला. आजच्या कांही बोलघेवडे समाज सुधारकाप्रमाणें ते बोलके सुधारक नव्हते. त्यांनी आपल्या अनुभव मंटपांत सर्व जातीच्या व धर्माच्या लोकांना प्रवेश दिला होता. त्यामुळें त्यांच्या अनुयायांत महार, मांग, चांभार, ढोर, बेरड, शिंपी, न्हावी, परीट, व्यापारी, ब्राह्मण, जैन वगैरे सर्व जातीच्या व धर्माच्या लोकांचा समावेश झाला होता. बसवेश्वर या सर्वांशी समभावानें वागत होते. एवढेंच नव्हे तर हे सर्व लोक परस्परांशी बंधुभावानें वागत होते. त्यांच्यामध्यें रोटीबेटी व्यवहार सर्रास चालू होता. अशा तऱ्हेची समाज सुधारणा बसवेश्वरांनी आपल्या सर्व आयुष्यभर चालविली होती. शेवटी शेवटी तर त्यांनी मधुवय्या

नांवाच्या एका ब्राह्मण अनुयायाच्या मुलीचे हरळय्या नांवाच्या चांभार अनुयायाच्या मुलाशी लग्न लावून देऊन समाज सुधारणेंचा उच्चांक गांठला होता. अशा प्रकारची क्रांतिकारक समाज सुधारणा घडवून आणणारे वसवेश्वर पुराणमतवादी बिज्जल राजाचा प्रधानमंत्री होऊन परंपरागत रूढीनें जखडलेल्या त्याकाळच्या पुराणमतवादी व प्रतिगामी स्वरूपाच्या समाजाचा राज्यकारभार पहात होते असे म्हणणें अगदी हास्यास्पद आहे.

**वसवेश्वरांना सामाजिक बहिष्काराची व खुनाची धमकी दिली गेली होती.**

समाजाच्या अशा परिस्थितींत वसवेश्वर प्रधानमंत्री होऊन राज्यकारभार चालविणें तर बाजूलाच राहो परंतु त्यांच्या या सामाजिक सुधारणेमुळें चिडून जाऊन समाजाच्या कर्मठ लोकांनी त्यांच्यावर सामाजिक बहिष्कार घातला होता, ही गोष्ट 'आम्हाला देवाचा आधार असेपर्यंत सारा गांव रागावून तरीं आमचे काय वांकडें करणार आहे ? आमच्या मुलांना तुमच्या मुली देऊ नका व आमच्या कुत्र्यापुढें भाकरीचा तुकडाही टाकूं नका.' या त्यांच्या वचनावरून स्पष्ट आहे. तसेच कांही कर्मठ लोकांनी त्यांना खुनाची धमकीही दिली होती असें त्यांच्या एकदोन वचनावरून दिसून येते. 'असले पुण्यकार्य करीत असतांना मला मरण आलें तर तें माझें मोठें भाग्य म्हणून समजेन' ('मरणवे महानवमी') असे त्यांनी त्या वचनांत म्हटले आहे.

**वसवेश्वर बिज्जळ राजाच्या खजिन्याचे प्रमुख होते.**

वसवेश्वर प्रधानमंत्री नव्हते तरी त्याच्या राजवटींत त्याच्या खजिन्याचे प्रमुख ( Head of the Treasury ) होते ही गोष्ट खरी आहे. ही गोष्ट त्यांच्या एका वचनामध्येंच नमूद केलेली आहे. त्यावेळीं त्यांना 'भांडारमंत्री' म्हणत असत. त्याकाळीं सर्वच सरकारी अधिकाऱ्यांना लोक गौरवानें मंत्री म्हणून संबोधीत असत. ह्या भांडार मंत्र्याला राज्य कारभारांत अथवा खजिन्यावर सुद्धां काहीच अधिकार नसे. राज्यातील कर वसूल करण्याकरितां निराळेच अधिकारी नेमले जात होते. तसेच राजाज्ञे प्रमाणें खजिन्यातून पैसा काढून देणें व खजिन्याचा हिशेब ठेवणे एवढेंच कार्य या भांडारमंत्र्याचे असे. हें कार्य करण्यांत वसवेश्वरांना आपल्या तत्त्वाना मुरड घालण्याची जरूरी नव्हती. म्हणूनच त्यानी हे कार्य बिज्जळाच्या आग्रहावरून पत्करले होते.

बिज्जळ राजा धूर्त व कावेबाज होता. तसेंच तो व्यवहारचतुर असून आपले हित सांधण्यांत अत्यंत वाकबगार होता. त्याच्या व बसवेश्वराच्या स्वभावात जमीन अस्मानाचा फरक असला तरी तो बसवेश्वराचे महत्व व आध्यात्मिक मनोवृत्ति जाणून होता. बसवेश्वर आरंभापासूनच कारकून म्हणून त्याच्या खजिन्यात काम करीत होते त्यावेळीं त्यानें त्यांची सचोटी, प्रामाणिकपणा, कार्यक्षमता वगैरे गुण पारखले होते. अशा प्रामाणिक मनुष्याच्या हातात आपला खजिना सुरक्षित राहील याची त्याला खात्री झाली असल्यामुळें त्यानेंच आग्रहाने बसवेश्वरास हे काम स्वीकारण्यास भाग पाडले होते. खरी वस्तुस्थिती अशी असतांना प्राचीन कवीनी व पुराणकर्त्यांनी या मंत्री शब्दाचा विपर्यास करून बसवेश्वर प्रधानमंत्री होते म्हणून त्यांचे वर्णन केले. परंतु त्यांचे हे विधान निराधार आहे. एवढेंच नव्हे तर बसवेश्वर त्याकाळांत व तसल्या राजवटींत प्रधानमंत्री होऊन राजकारभार पाहणे अगदीं असंभवनीय व अशक्य कोटीतील गोष्ट होती, हे वरील विवेचनावरून दिसून येईल. तसेच बसवेश्वर आध्यात्मिक प्रवृत्तीचे असून धार्मिक व सामाजिक सुधारणा घडवून आणणें हें त्यांच्या जीवनाचें मुख्य ध्येय असल्या कारणानें त्यांनीही असल्या प्रधानमंत्रीपदाची आशा बाळगली नव्हती असे साधार त्यांच्या वचनावरून कळून येतें.



## लेखांक २०

## अखिल भारतीय वीरशैव महासभेचे व शिवयोग मंदिराचे आद्यसंस्थापक

# परमपूज्य लिं. श्री. हानगल कुमार स्वामीजी

( सन १९६९ मार्च–एप्रिल महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख )

वीरशैव समाज भारतातील एक प्रमुख समाज असून त्याची जनसंख्या सुमारे एक कोटी आहे. या समाजाची वस्ती मुख्यतः कर्नाटकात ( म्हैसूर राज्य) असून त्याच्या लगत असलेल्या महाराष्ट्र, आंध्र व तामीळनाड प्रांताच्या कांही भागातही पसरलेली आहे. ह्या समाजाची प्राचीन परंपरा उज्वल व भव्य असली तरी गेल्या शतकात हा समाज फारच अवनत स्थितीला पोचला होता. ब्रिटिश अमदानीत इंग्रजी शिक्षणाला जास्ती महत्व आल्यामुळें कांही समाजांनी त्या बाबतीत आघाडी मारून आपली प्रगती करून घेतली. परंतु समाजात पसरलेल्या अज्ञानामुळें व 'शिकणें आपले काम नव्हे' अशा गैरसमजूतीमुळें वीरशैव समाज शिक्षणाच्या बाबतीत मागसलेला राहिला.

ह्या समाजात मागच्या शतकाच्या अखेरीस हाताच्या बोटावर मोजण्या

इतकेच बी. ए. पदवीधर होते. ह्या समाजांत इ. स. १९०१ पर्यंत एलएल. बी. परीक्षा पास झालेले, तसेच इ. स. १९१६ पर्यंत एम्. ए. झालेले कोणीच नव्हते ही गोष्ट लक्षात घेतली तर ह्या समाज शिक्षणाच्या बाबतीत किती मागसलेला होता याची कल्पना येते. ह्या समाजाचे मुख्य धंदे शेती व व्यापार. परंतु समाजातील अज्ञानामुळें व ह्या धंद्यातील मंदीमुळें ह्या धंद्याच्या बाबतीतही समाजाचीं प्रगती खुंटली होती. समाजाची ही अवनत परिस्थिती लक्षात घेऊन त्याच्या सर्वांगीण उन्नती करता ह्या शतकाच्या प्रारंभी ज्या काही महाभागांनी स्वार्थ त्यागाने व अत्यंत कळकळीनें प्रयत्न केले त्यांच्यात परमपूज्य लिं. श्री हानगल स्वामीजी हे प्रमुख आहेत, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.

## जन्म व दैवी घटना.

श्री हानगल कुमार स्वामीजींचा जन्म शा. शके १७८८ सालीं धारवाड जिल्ह्याच्या जोयिशर हरळहळ्ळी नांवाच्या एका खेड्यातील सालीमठ आडनांवाच्या एका अत्यंत गरीब कुटुंबात झाला. पित्याचे नांव बसवप्पय्या व मातेचे नांव नीलम्मा. हे दोघेही सच्छील व सदाचारीं असून गरीब असले तरी आपल्या मनमिळावू वागणूकीनें गांवात लोकप्रिय झाले होते. कुमारस्वामीजी त्यांचे दुसरे पुत्र. ह्यांचा जन्म श्रीमती नीलम्माच्या माहेरी (लिंगद हळ्ळी) येथे ब्राह्मी मुहुर्तावर झाला. त्या दिवशी सकाळी तेथें एक विचित्र घटना घडली. त्यावेळी त्या घरातील एक म्हातारी बाई व त्याच्या दारावर भिक्षा मागण्याकरीता आलेला एक जंगम साधू यांच्यामध्ये खालील संवाद घडला.–

म्हातारी – आज आमच्या घरी पुत्रजन्म झाला आहे. करिता तुम्हाला भिक्षा मिळणार नाही.

जंगम – बाई, पुत्रजन्माच्या शुभप्रसंगी लोक दानधर्म करतात. परंतु तुम्ही भिक्षा सुद्धा वाढत नाही, याला काय म्हणावे ?

म्हातारी – श्रीमंताच्या घरीं एक दोनच अपत्ये जन्मतात म्हणून ते त्यावेळी दानधर्म करतात. आम्हा गरीबांच्या घरी भाराभर मुले जन्मास येतात व त्यांना पोसणे सुद्धा आम्हाला कठीण होते. तेव्हा आम्ही दानधर्म कुठला करावा ?

जंगम – तुम्हाला तुमचे अपत्य पोसणे होत नसेल तर आम्हाला त्याचीच भिक्षा वाढा.

म्हातारी – ( हसून थट्टेनें ) हरकत नाही. घेऊन जा.

जंगम – ठीक आहे.

हा संवादानंतर जंगम साधू निघून गेला. हा कांही दैवी चमत्कार होता कीं काकतालीय न्यायानें घडलेली एक अवचित घटना होती, हें सांगणे कठीण आहे. परंतु या घटनेच्या मथितार्थाप्रमाणें ह्या बालकानें याच गावीं आपल्या भावी आयुष्यात संन्यासव्रत स्वीकारलें ही गोष्ट मात्र खरी.

**बालपण व शिक्षण.**

त्याकाळी बहुतेक गांवात सरकारी प्राथमिक शाळा नव्हत्याच. कुमारस्वामींच्या आजांनी आपल्या गांवी चौथ्या इयत्तेपर्यंत एक गांवठी शाळा चालविली होती. त्यात स्वामीजींनी तिसऱ्या इयत्तेचे शिक्षण संपविलें. परंतु गरीबीमुळें परगावी जाऊन पुढील शिक्षण घेणें अशक्य असल्यामुळें ते घरीच राहिले. दुर्दैवानें त्याच वेळीं त्यांचे वडील वारले. त्यामुळे घरच्या कुटुंबाचा सर्व भार ते व त्यांचे बंधू यांच्यावरच पडला. कुटुंबात पांच सहा माणसे व घरीं तर अठराविश्वे दारिद्र्य, यामुळे व घराण्याचा पीढीजात धंदा भिक्षुकीचा असल्यामुळें दोघेही बंधू गांवात भिक्षा मागूनच कुटुंबाचा उदरनिर्वाह चालवीत होते.

नित्याप्रमाणें स्वामीजी एके दिवशी भिक्षेस गेले असतांना 'तूं किती दिवस भिक्षा मागून पोट भरणार? शाळामास्तर हो अथवा एखादी नोकरी धर. जन्मभर भिक्षा मागून पोट भरण्यात तुला लाज वाटली पाहिजे' असे त्यांना एका म्हाताऱ्याने छेडले. ही हिणवणूक स्वामीजींच्या मनाला लागली व त्यांचा स्वाभिमान जागा झाला. या म्हाताऱ्याचे म्हणणें त्यांना पटले. या पुढे आपली टीचभर पोटाची खळगी भरण्याकरतां कोणत्याही प्रसंगी भिक्षा मागावयाची नाही; कसेही करून पुढील शिक्षण घ्यावयाचेच, असा निश्चय करून पुढे भिक्षा न मागतां रिकामी झोळी घेऊन ते तसेच घरी परतले व आपल्या आईला व वडील बंधूला त्यांनी आपला निश्चय कळविला. दारिद्र्यामुळे व भिक्षुकीशिवाय इतर कामधंदा नसल्यामुळें साहजिकच त्यांनी त्याला विरोध केला. तेव्हा स्वामीजी निरुपाय होऊन स्तब्ध राहिले परंतु ते आपल्या निश्चयापासून ढळले नाहींत.

शिक्षणाकरता परगांवीं राहण्याची कांही सोय नसतांनाही ईश्वरावर भार टाकून ते एके दिवशीं कोणाला न सांगता घराबाहेर पडले व सातव्या इयत्तेपर्यंतची सरकारी शाळा असलेल्या कज्जरी नांवाच्या गांवास निघून गेले. तेथे त्यांना कोणाचीही ओळख नव्हती. करितां तेथील एका सार्वजनिक कट्टयावर बसून पुढे काय करावे ह्या विचारात ते मग्न झाले. कर्मधर्मसंयोगानें त्याचवेळी तेथील राचय्या हिंरेमठ नांवाचे एक सद्गृहस्थ तेथे आले. स्वामीजींचे फाटके कपडे व चिंताक्रान्त म्लानवदन पाहून त्यांनीं त्यांची विचारपूस केली. स्वामीजीनी त्यांना आपली सर्व हकीकत सांगितली, व शिक्षण घेण्याच्या निश्चयानें आपण येथें आल्याचे कळविले. स्वामीजीची हकीगत व त्याचा निश्चय ऐकून त्या गृहस्थाला त्याच्याबद्दल कौतुक वाटले व दयाही आली. नंतर त्यानें त्यांना घरीं नेऊन त्याची राहण्याची सोय केली, व इतर कांहीं गृहस्थांच्या सहाय्यानें त्यांच्या जेवणाखाण्याची व्यवस्था करून तेथील शाळेंत त्यांचे नांव दाखल केले. स्वामीजी जात्याच बुद्धीमान असल्यामुळें तेथें ते हुशार विद्यार्थी म्हणून चमकले. तेथील शिक्षण संपल्यावर ते त्यावेळच्या मुलकी परीक्षेला बसले. परंतु दुर्दैवानें नव्हे तर सुदैवाने ते त्या परीक्षेत नापास झाले, सुदैवानें म्हणण्याचे कारण ते जर परीक्षा पास झाले असते तर सरकारी मास्तरकीची नोकरी धरून त्यातच ते गढून गेले असते व आपल्या भावी आयुष्यात त्यांनीं जे कांहीं महत्वाचें समाजकार्य केले ते घडले नसते.

## सन्यास व्रताचा निश्चय.

नापास झाल्यामुळे हिरमुसले होऊन स्वामीजी कज्जरीगांव सोडून लिंगद हळ्ळी येथील आपल्या आजोळी गेले. तेथें एक गांवठी शाळा सुरू करून आपला उदरनिर्वाह करू लागले. सुदैवानें त्याचवेळी त्यांना तेथील एका गृहस्थाच्या घरातील वीरशैव धर्माचे धार्मिक साहित्य पहाण्यास मिळाले. त्यांनी त्याचा अभ्यास सुरू केला. बालपणापासूनच त्यांची मनोवृत्ती धार्मिक असल्यामुळें या धार्मिक साहित्याचा त्यांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला व तत्परिणामीं त्यांनी आपले सर्व भावी आयुष्य आध्यात्मिक जीवन जगण्यातच घालविण्याचे ठरविले.

स्वामीजींच्या आयुष्यातील हा काळ अत्यंत महत्वाचा काळ म्हणण्यास हरकत नाहीं. त्यावेळी त्यांनी आपल्या भावी जीवनासंबंधी जो निश्चय केला तो कायमचाच. तसेच ज्या गावी त्यांच्या जन्मकाळीं आरंभी नमूद केलेली

अलौकिक घटना घडली होती त्याच गांवी त्यांनी हा निश्चय केला. हाही एक योगायोगच म्हणावयाचा. नंतर त्यांनी शक्य तेवढें इतर धार्मिक साहित्य मिळवून त्याचाही अभ्यास केला. समानशील लोकाशी अध्यात्मचर्चाही ते करू लागले. त्याप्रमाणें काही काळ गेल्यानंतर त्यांची आई त्यांच्याकडे आली व लग्न करून प्रापंचिक बनण्याचा आग्रह करू लागली. त्यांच्या करतां आपण एक मुलगी पाहून ठेवल्याचेही तिनें सांगितले. स्वामीजींनी तिला आपला निश्चय कळविला. परंतु ती आपला आग्रह न सोडतां त्यांना आपल्या निश्चयापासून परावृत्त करण्याकरतां हरतऱ्हेनें प्रयत्न करू लागली. आजोळच्या माणसांनीही प्रयत्न केले. परंतु ते आपल्या निश्चयापासून ढळले नाहींत. शेवटी त्या सर्वांच्या आग्रहाला कंटाळून त्यांनी गावठी शाळा बंद केली व आपण संपादलेले तीनशे रुपये आपल्या आईला देऊन टाकून अध्यात्म साधनेकरतां हुबळी येथील सिद्धारूढ स्वामींच्या मठात जाऊन राहिले.

**अध्यात्म साधना व गुरुदीक्षा.**

हुबळी येथें सिद्धारूढ स्वामींच्या मठात धार्मिक साहित्याचे अध्ययन व अध्यात्म साधना व चर्चा करण्यात ते आपंला सर्व वेळ घालवू लागले. परंतु एवढयानें त्यांच्या मनाचे समाधान झाले नाही. अशा मनस्थितीत असतांना म्हैसूर प्रांतातील यळंदूर धर्मपीठाचे अधिपती व वैराग्य संपन्न शिवयोगी श्री बसवलिंग स्वामी देशसंचार करीत हुबळीस आले. तेव्हा कुमार स्वामीनीं त्यांच्याशी अध्यात्म चर्चा केली. त्या चर्चेत त्यांना त्या शिवयोगींचे आध्यात्मिक श्रेष्ठत्व कळून आले. तेथेंच त्यांनी त्यांचे शिष्यत्व पत्करून त्यांच्या सेवेत राहण्याची आपली इच्छा प्रगट केली. कुमार स्वामीजींच्या अंतःकरणाची आध्यात्मिक तळमळ व भूक पाहून ते शिवयोगीही त्यांच्यावर खूष झाले व त्यांनीही त्यांना आपला शिष्य म्हणून पतकरले.

नंतर दोघेही परत यळंदूरास गेल्यावर शंभुलिंग बेट्ट नांवाच्या इतिहास प्रसिद्ध गुहेंत आठ दहा महिने योगाभ्यास व अनुष्ठान करीत राहिले. या काळांत कुमारस्वामीजींनी केलेली आध्यात्मिक प्रगती पाहून बसवलिंग शिवयोगी खूष झाले व त्यांनी त्यांना गुरूदीक्षा देऊन गुरुपदेश केला. त्यानंतर ते दोघेही पुनः देशसंचारास निघून हुबळी जवळील अण्णीगेरी येथें गेले असतांना बसवलिंग स्वामी तेथेंच आजारी पडले. शेवटी त्या आजारातच ते लिंगैक्य झाले. आपल्या

गुरुजींच्या शिवैक्यामुळें कुमारस्वामीजी एकाकी झाले. नंतर ते तेथून सोरब भागांत ( शिमोगा जिल्हा ) जाऊन तेथील एका अनुकूल व प्रशांत स्थळीं राहून योगाभ्यास व अनुष्ठान करण्यात मग्न झाले.

## हानगल येथील कुमारस्वामी मठाचे अधिपती म्हणून नेमणूक.

त्यावेळी हानगल येथील कुमारस्वामी विरक्तमठाचे अधिपती फकीर स्वामी म्हणून होते. ते वृद्ध झाले असल्यामुळें आपल्या मठाच्या उत्तराधिकारी पदाकरतां एका योग्य शिष्याच्या शोधात होते. त्यांच्या कांहीं भक्तांनी त्यांना कुमारस्वामीजींची शिफारस केली. नंतर त्या स्वामींनी कुमारस्वामीजींना बोलावून घेऊन त्यांना आपला आशय कळविला. प्रथम त्यांनी त्याला नकार दर्शविला तरी शेवटीं त्या स्वामींच्या व इतर हितेच्छू मंडळींच्या आग्रहास्तव त्यांनी त्याला कबूली दिली व ते त्या मठाचे उत्तराधिकारी झाले.

कांहीं काळानंतर फकीरस्वामी लिंगैक्य झाले व त्यांचे ठिकाणी मठाधिपती म्हणून कुमार स्वामींजीचा पट्टाभिषेक झाला. प्रारंभापासूनच त्यांच्या मनात धर्म प्रचाराची तळमळ होती. आपले सर्व आयुष्य त्या कार्याला वाहून घेण्या करताच त्यांनी संन्यासव्रत स्वीकारले होते. आता ते एका मठाचे अधिपती झाल्या मुळें त्यांना आपल्या मनांतील ईप्सिताला मूर्त स्वरूप देण्याची संधी मिळाली. लगेच त्यांनी त्या मठात एक संस्कृत पाठशाळा उघडून तेथे विद्यार्थ्यांना कन्नड व संस्कृत भाषांचे व धार्मिक साहित्याचे शिक्षण देण्याची व्यवस्था केली. तसेच इतर मठाधिपतीप्रमाणें मठात स्वस्थ न बसतां त्यांनी हानगल भागात गावोगावी पदयात्रा करून प्रत्येक ठिकाणीं आपल्या सुश्राव्य प्रवचनानें व सदुपदेशानें धर्मजागृती केली आणि समाजाची सेवा व संघटना करण्याकरतां स्थानिक लोकांच्या संस्था स्पथान केल्या.

## अखिल भारतीय वीरशैव महासभेची स्थापना.

समाज जागृतिकरतां त्यांनी केलेल्या या पदयात्रेमुळें त्यांचा निगर्वी, दयाळु व सौजन्यपूर्ण स्वभाव, सात्त्विक व शुद्ध आचार विचार, साधे जीवन व मुख्यतः समाजसेवेविषयीं त्यांच्या अंतःकरणातील तळमळ या गोष्टी लोकांच्या दृष्टोत्पतीस आल्या व त्यांचा त्यांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला.

ते एक स्वार्थत्यागी, कळकळीचे व कर्तबगार समाजकार्यकर्ते म्हणून सर्व कर्नाटकभर त्यांची कीर्ती पसरली. त्यामुळें कर्नाटकच्या इतर भागातूनही आपल्या भागात दौरा करण्याविषयीं त्यांना आमंत्रणें येऊ लागलीं. त्याप्रमाणें स्वामीजींनीं कर्नाटकच्या इतर भागातही संचार करून समाजात जागृती निर्माण केली. ह्या दौऱ्यातून त्यांना आपल्या समाजाच्या उणीवांची चांगली जाणीव झाली. तसेच समाजसेवेविषयी तळमळ असलेल्या ठिकठिकाणच्या समाजसेवकाशीं व पुढाऱ्याशीं त्यांचा परिचय झाला. हे समाज सेवक आपापल्या ठिकाणीं समाज-सेवेचे कार्य करीत होतेच. परंतु सर्व समाजाकरतां संघटित रीतीनें कार्य चालले नव्हते. तसेच त्यांचे कार्य धार्मिक अथवा शैक्षणिक अशा आपल्या क्षेत्रापुरतेच मर्यादित होते. अशा परिस्थितीत साऱ्या समाजाच्या सर्वांगाण उन्नतीकरतां एका संघटित संस्थेची आवश्यकता आहे, हें स्वामीजींनी हेरलें. त्या दृष्टीनें समाजाचो धार्मिक, सामाजिक, औद्योगिक व सांस्कृतिक उन्नति साधण्याकरता एक संस्था स्थापण्याच्या योजनेविषयीं त्यांनी ठिकठिकाणच्या समाजसेवकाशी विचार-विनिमय केला. वहुतेक कार्यकर्त्यांना ही योजना पटली.

त्यानंतर या योजनेला मूर्तस्वरूप देण्याच्या दृष्टीनें स्वामीजींनी इ. स. १९०३ सालीं धारवाड येथें अशी समाज सेवकांची व समाजाच्या इतर प्रमुखांची एक औपचारिक सभा बोलावून त्यांच्यापुढें त्यांनी आपली योजना मांडली. या सभेंत ह्या योजनेवर साधक वाधक चर्चा होऊन साऱ्या समाजाची सर्वांगीण उन्नत्ती साधण्याकरतां 'अखिल भारतीय वीरशैव महासभा' नांवाची संस्था स्थापण्याचे ठरविले. त्याप्रमाणे ह्या संस्थेचें पहिले अधिवेशन इ. स. १९०४ साली वीरशैव समाजाचे त्यावेळचे सुप्रसिद्ध दानशूर पुढारी पुण्यश्लोक शिरसंगीकर सरदेसाई यांच्या अध्यक्षतेखालीं धारवाड येथें भरविण्यात आले. हे अधिवेशन भरविण्यात स्वामीजींनीच पुढाकार घेतला.

हे अधिवेशन अपेक्षेपेक्षांही जास्ती यशस्वी झाले व त्यामुळें साऱ्या समाजांत अभूतपूर्व जागृती झाली. आजच्या प्रमाणें सभासंमेलने भरवून, भाराभर ठराव मंजूर करून हात झाडुन मोकळे न होता, ह्या अधिवेशनात समाजोन्नतीचा भरीव कार्यक्रम आखला गेला व त्यानंतर तावडतोव त्याच्या अंमलबजावणीसही सुरवात झाली. समाजोन्नतीला प्रथम समाजात विद्याप्रसाराची अत्यंत आवश्य-कता आहे हे जाणून गरीब वीरशैव विद्यार्थ्यांना शिष्यवेतने देण्याकरता शिक्षणफंड उभारण्याचे ठरले. त्यानंतर थोड्याच काळात लाखो रुपये जमवून 'लिंगायत

एज्युकेशन असोसिएशन ' नांवाची संस्था धारवाड येथे स्थापून त्या फंडातून गरीब विद्यार्थ्यांना शिष्यवेतने देण्यास सुरवात केली. आज तागायत ह्या फंडातून शिष्यवेतने दिलीं जातात. अनेक गरीब विद्यार्थी ह्या फंडाच्या सहाय्यानें सुशिक्षित झाले आहेत. त्याचप्रमाणें कर्नाटकात ठिकठिकाणीं समाज सेवेकरतां संस्था स्थापन होऊन त्यांच्या मार्फत महासभेचा कार्यक्रम अमलात येऊ लागला.

महासभेचे दुसरे अधिवेशन त्याच्या पुढच्याच वर्षी श्रीमंत शिरसंगीकर सरदेसाई यांच्याच अध्यक्षतेखाली बेंगळूर येथें भरविण्यात आले. तेथेही या अधिवेशनानंतर साऱ्या म्हैसूर प्रांतांत अपूर्व जागृती झाली व महासभेच्या कार्यास जोरदार चालना मिळाली. तेथेही म्हैसूर प्रांताच्या विद्यार्थ्यांकरतां शिक्षणफंड उभारण्यांत आला. महासभेचे तिसरे अधिवेशन सन १९०७ सालीं सोलापुरात बेंगळूरचे सर पुट्टणशेट्टी यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें. हें अधिवेशन भरविण्यांत वीरशैव समाजाचे त्यावेळचे नामवंत पुढारी सोलापूरचे कै. अप्पासाहेब वारद ह्यांनी पुढाकार घेतला होता. ह्या अधिवेशनास जातांना कुमारस्वामीजींनी कोणत्याही प्रवाससाधनांचा उपयोग न करतां पादचारी होऊन व मार्गातील प्रत्यक गांवांत महासभेच्या कार्यक्रमाचा प्रचार करीत ते सोलापूरास पोचले आणि अधिवेशनानंतर त्या भागांतही संचार करून तेथील समाजात जागृती निर्माण केली.

## शिवयोग मंदिराची स्थापना.

ह्या प्रमाणे महासभेची पहिली तीन अधिवेशने वीरशैव समाजाची वस्ती असलेल्या उत्तर कर्नाटक, म्हैसूर प्रांत ( जुना ) व महाराष्ट्र या तीन प्रमुख भागात भरविली गेल्यामुळे सारा समाज खडबडून जागा झाला व महासभेच्या समाजोन्नतीच्या कार्यक्रमास तनमनधनानें सहाय्य करू लागला. ठिकठिकाणीं नव्या दमाचे उत्साही तरूण समाजसेवक निर्माण होऊन ते महासभचा कार्यक्रम अंमलात आणण्यासाठीं हिरीरीनें भाग घेऊं लागले. त्या काळांत महासभेच्या कार्यास फंडाची अथवा कार्यकर्त्यांची उणीव कधीच भासली नाहीं.

थोडयाच काळात महासभेचे उद्दिष्ट अपेक्षेपेक्षाही यशस्वी झालेले पाहून स्वामीजीस व महासभेच्या इतर कार्यकर्त्यांस अत्यंत आनंद झाला. परंतु स्वामीजी चाणाक्ष व दूरदृष्टीचे होते. तेवढयानें त्यांचे समाधान झाले नाही.

ल्याने निर्माण झालेली ही जागृती व उत्साह कायम राखून समाजोन्नतीच्या कार्यक्रमास कायमचे स्वरुप द्यावयाचे असेल तर त्याकरतां आपले सर्व आयुष्य समाजसेवेस वाहून घेणाऱ्या प्रामाणिक व स्वार्थत्यागी कार्यकर्त्यांचा संच निर्माण केला पाहिजे. नाहीतर काही काळानें या जागृतीला व उत्साहाला ओहोटी लागून समाजोन्नतीचा कार्यक्रम बंद पडेल, हें त्यांनी जाणले व असला कार्यकर्त्यांचा संच तयार करण्याच्या योजनेचा विचार करू लागले. तेव्हा त्या काळात आळसात व चैनीत आपलें जीवन व्यतीत करीत असलेल्या समाजातील शेकडो मठाधिपतींचे चित्र त्यांच्या डोळ्यापुढे उभे राहिले. खरे पाहिले असता धार्मिक जागृति व समाजसेवा करण्या करताच आपल्या प्राचीन वीरशैवाचार्यांनीं ह्या मठसंस्था स्थापन करून ह्या मठांचे अधिपती संन्यासव्रतानें राहून धर्मप्रचार व समाजसेवा करावी असा नियम घालून दिला आहे. वीरशैव धर्माच्या प्राचीन वैभवास हा धार्मिक निर्बंधच कारण झाला आहे. परंतु कालांतरानें ह्या धार्मिक निर्बंधात शिथिलता येऊन बहुतेक मठाधिपती आपले कर्तव्य विसरले व स्वार्थी बनून आपला व आपल्या आप्तेष्टांचा स्वार्थ साधण्यांत मग्न झाले. हे धर्मगुरू म्हणून घेत असले तरी या पैकी बहुतेकांना आपल्या धर्माची तोंड ओळखसुद्धा राहिली नाहीं. अशा मठाधिपतींची संख्या आपल्या समाजात हजार दोन हजार तरी भरेल. संन्यासव्रताने राहणाऱ्या या सर्व मठाधिपतीमध्यें जागृती निर्माण करून त्यांना त्यांच्या कर्तव्याची जाणीव करून देऊन व त्यांना धर्मप्रचार व समाजसेवा करण्यास आवश्यक असलेले शिक्षण देऊन त्यांना कार्यास प्रवृत्त केल्यास समाजोन्नतीच्या कार्यास आवश्यक असलेला समाजसेवकांचा कायमचा संच तयार होईल, ही कल्पना स्वामीजीना सुचली. त्याप्रमाणें ह्या मठाधीपतींना आवश्यक शिक्षण देऊन समाजसेवेंत तरबेज करण्याकरतां गुरुकुल पद्धतीवर एक संस्था स्थापण्याची योजना त्यांनी तयार केली.

अखिल भारतीय वीरशैव महासभेचे चौथे अधिवेशन इ. स. १९०८ सालीं बागलकोट येथें भरले असतांना स्वामीजींनी त्या सभेत ही योजना मांडली. तेथें ही योजना मजूर झाली. एवढेंच नव्हे तर समाजाच्या सर्व पुढाऱ्यांनी त्याला हृत्पूर्वक सक्रीय पाठिंबा दर्शविला. लगेच अधिवेशनाच्या दुसऱ्या दिवशी ह्या योजनेला मूर्त स्वरूप देण्याकरतां कै. अप्पासाहेब वारद यांच्या अध्यक्षतेखालीं पुढाऱ्यांची व कार्यकर्त्यांची स्पेशल सभा भरली व त्यांत या कार्याकरतां मोठा फंड उभारावा व एक योग्य स्थळ पाहून तेथें ही संस्था स्थापन करावी असें ठरले.

व्यवहार चतुर अप्पासाहेबांनीं मोठ्या प्रमाणांत फंड जमवून बागलकोटला एक सुताची गिरणी स्थापावी व त्याच्या नफ्यातून ही संस्था चालवावी म्हणजे समाजाच्या औद्योगिकरणाच्या कार्यक्रमास चालना मिळेल व ह्या धार्मिक संस्थेच्या खर्चाकरतां कायम फंडाची व्यवस्थाही होईल असे सुचविले व ही सूचनाही सर्वांना पसंत पडली.

ह्या सभेनंतर तावडतोव स्वामीजी व इतर पुढारी यांनीं फंड जमविण्यास सुरवात केली. फंडही हां हां म्हणता जमला. ही संस्था प्राचीन ऋषीमुनींच्या आश्रमाच्या धर्तीवर स्थापावयाची असल्याकारणानें, घनदाट वस्तीपासून दूर असलेले, निर्जन परंतु अशा आश्रमाला नैसर्गिक अनुकूलता असलेले बदामी तालुक्यांतील मलप्रभा (मलापहारी) नदीच्या काठावरील एक रम्य, प्रशांत व वनश्रीनें नटलेले स्थल या संस्थेकरतां निवड करण्यात येऊन तेथे माघ शु. ७ शके १८३० च्या शुभ दिवशी ही संस्था समारंभानें 'शिवयोग मंदीर' या नांवानें स्थापण्यांत आली. हें स्थळ सोलापूर गदग रेल्वेच्या बदामी स्टेशन पासून आग्नेय दिशेस ७ मैलावर आहे. शिवयोग मंदीर स्थापण्याच्या वेळी तो भाग अरण्यमय होता त्यामुळे तेथे जाण्यास चांगला रस्ता नव्हता. परंतु आतां बदामी स्टेशनापासून थेट शिवयोग मंदिरापर्यंत चांगला रस्ता तयार झाला आहे.

**शिवयोग मंदीर स्थळ महात्म्य.**

शिवयोग मंदीर स्थापलेले स्थळ व त्याच्या आसमंतातील प्रदेश वैदिक काळापासून प्रसिद्ध आहे. प्राचीन काळी दक्षिण भारतात आर्यांची वस्ती स्थापणाऱ्या अगस्ती ऋषींचा आश्रम या भागात होता असे सांगण्यात येते. शिवयोग मंदिरापासून दोन मैलावर नागनाथेश्वर देवालय आहे. तेथे पूर्वी नागनाथसिद्ध आश्रम बांधून राहात होते. सातव्या शतकात कर्नाटक व महाराष्ट्र या दोन्ही प्रांतावर राज्यकरणाऱ्या सुप्रसिद्ध चालुक्य राजघराण्याची राजधानी बदामीच होती. बदामीपासून चार मैल अंतरावर शिवयोगमंदिराला जाण्याच्या रस्त्यावर सुप्रसिद्ध प्राचीन बनशंकरी (शाकंबरी) देवीचे देवालय आहे. ही देवी चालुक्य राजघराण्याची कुलदेवता होती. तेथे दरसाल मोठी यात्रा भरते. सातव्या शतकात चालुक्य राजांनी बांधलेली व त्यांतील अप्रतीम प्राचीन कलाकुसरीनें जगप्रसिद्ध झालेली, अनेक

देवालये असलेली, इतिहास प्रसिद्ध पट्टदकल्ल व ऐहोळी हीं प्रेक्षणीय स्थळें याच भागात आहेत. भारतात निवडल्या गेलेल्या प्रवासी स्थळामध्यें हीं दोन्हीं महत्वाची प्रवासस्थळें आहेत. अशा पवित्र व इतिहासप्रसिद्ध भागांत शिवयोगमंदीर स्थापले गेले आहे.

## शिवयोग मंदिराची फलश्रुति.

शिवयोग मंदीर संस्था स्थापन झाल्यानंतर तेथें शिक्षण घेणाऱ्या साधकाकरतां काही इमारती बांधून, इतर सोयी निर्माण करून व स्वतः तेथे राहून स्वामीजींनी शिक्षणेच्छु साधकांना शिक्षण देण्यास सुरवात केली. ह्या आश्रमात प्रथम तीनच साधक शिक्षणाकरतां आले व पुढे एकवर्षपर्यंत सातच साधक होते. परंतु नंतर या विद्यामंदिराची उपयुक्तता मठाधिपतींना व इतर लोकांना कळल्यामुळें जास्ती साधक ह्या संस्थेत दाखल होऊ लागले. ही संस्था स्थापन झाल्यापासून शेवटपर्यंत म्हणजें सुमारे वीस वर्षें स्वामीजी या आश्रमात राहून तेथील साधकांना मार्गदर्शन करीत होते. ह्या काळात शेकडो साधक स्वामीजीं-च्या मार्गदर्शनाखालीं तेथील शिक्षण घेऊन बाहेर पडले. त्यापैकी कांहीं ठिकठिकाणचे मठाधिपती बनून स्वामीजींच्या आकांक्षेप्रमाणें निःस्वार्थ बुद्धीनें धर्मजागृति व समाजसेवा करु लागले. अशा मठाधिपतीमध्यें हुबळी मूरसावीर मठाचे ज. गु. श्री. गंगाधर राजयोगींद्र स्वामीजी, त्यांचे गुरु लिं. गुरुसिद्ध स्वामीजी बेळगांव येथें सुमारे ३/४ शें गरीब विद्यार्थ्यांकरतां मोफत प्रसाद निलय (बोर्डींग) चालविणारे श्री नागनूर स्वामीजी व नवलगुंद गवीमठाचे अधिपती श्री बसवलिंग स्वामीजी हे प्रमुख आहेत.

## शिवयोग मंदिराच्या प्रवेशाबद्दल.

शिवयोग मंदिराचे ध्येय, हेतू व उद्देश श्रेष्ठ आहेत. या धार्मिक, सामाजिक, व आध्यात्मिक संस्थेतून पुष्कळ माहेश्वर विद्यार्थी शिकून बाहेर पडले आहेत. पण भक्त लोकांच्या मुलांना तेथे शिकण्यास प्रवेश नसल्याचे व मनाई असल्याचे आम्ही ऐकतों. कर्नाटक महाराष्ट्रातील काही मठाचे वीसपंचवीस तरी मठाधिपती भक्तवर्गीय आहेत त्यांना या शिवयोग मंदिरांत धार्मिक व संस्कृत शिक्षण घेण्यास सर्व अटी मान्य असल्या तरी प्रवेश मिळत नाहीं. फक्त जन्माने माहेश्वरजंगम घराण्यातल्या मुलानांच प्रवेश दिला जातो असे समजते. हे जर खरे असेल तर लिं. श्री. हानगल्ल कुमार स्वामीजींच्या विशाल

तत्त्वाचे आम्हीं प्रत्यक्षात आचरण करीत नाहीं असें खेदाने म्हणावे लागेल. तेव्हा या पवित्र शिक्षण मंदिरात कोणाही वीरशैव विद्यार्थ्यांस प्रवेश मिळणे अगत्याचे आहे, असे आम्हाला वाटते.

## स्वामीजींचे इतर सार्वजनिक कार्य.

हानगल श्री कुमारस्वामीजी प्रारंभापासून धार्मिक प्रवृत्तीचे असल्याकारणानें व समाजोध्दाराला धर्मजागृतीची अत्यंत आवश्यकता आहे, हे जाणून त्यांनी त्या कार्यक्रमावर भर दिला होता. वीरशैव धर्माच प्राचीन साहित्य व शिवशरणांचे वचन साहित्य यावद्दल त्यांना आदर व गौरव होता. त्यांनी वचनपितामह कै. हळकट्टींना वचन साहित्याच्या संशोधन व प्रकाशन कार्यात उत्तेजन व सहाय्य केले. आपल्या प्रवासात त्यांनी शेकडो प्राचीन हस्तलिखित ग्रंथ संबंधित लोकाकडून मिळवून शिवयोग मंदिरात त्यांचे एक मोठें संग्रहालय बनवून त्यांच्या संशोधनाची व प्रकाशनाची व्यवस्था केली. आजही अनेक संशोधक व साहित्यिक ह्या संग्रहालयाचा उपयोग करीत आहेत. अखिल भारतात वीरशैव धर्मांचा प्रचार करण्याच्या दृष्टीने भारताच्या इतर भाषांत वीरशैव धर्मग्रंथांचे अनुवाद करण्याचा त्यांचा मानस होता. परंतु त्या कार्यास आवश्यक असलेल्या तज्ञ विद्वानांच्या अभावी त्यांची इच्छा अपूर्णच राहिली.

नुसत्या भारतातच नव्हे तर परदेशातसुद्धा वीरशैव धर्माचा प्रचार करण्याची त्यांची इच्छा होती व त्या कार्याकरतां वीरशैव समाजातील पहिले पदवीधर कोल्हापूरचे कै. श्री. वीरवसाप्पा श्रेष्ठी यांना परदेशी पाठवण्याची तयारी त्यांनी केली होती. परंतु काही कारणास्तव ही त्यांचीं योजना अपुरीच राहिली. सुप्रसिद्ध परळी वैजनाथ प्रकरणात त्यांनीं बजावलेली कामगिरी तर सर्वश्रुतच आहे. वीरशैव शूद्र असल्यामुळें त्यांना वैजनाथ ज्योतिर्लिंगाची पूजा अर्चा अथवा रुद्राभिषेक करण्याचा अधिकार नाहीं अशा आशयाचा दावा कांहीं लोकांनी हैद्राबाद कोर्टात मांडला होता. त्याप्रकरणीं स्वामीजी स्वतः हैद्राबादेस जाऊन काही शास्त्राच्या साह्यानें न्यायाधीशास अधिकृत शास्त्राधार दाखवून वीरशैव शूद्र नसून उच्चवर्णीय आहेत, त्यांना रुद्राभिषेक करण्याचा अधिकार आहे यावद्दल खात्री करून दिली. परिणामतः त्या दाव्याचा निकाल वीरशैव समाजाच्या बाजूने लागला. ह्या प्रकरणात स्वामीजींनी फंड जमवून त्याला आर्थिक सहाय्यही केले होते.

या प्रमाणें स्वामीजींचे कार्य मुख्यतः धार्मिक क्षेत्रात झाले असले तरी शिवशरणाच्या तत्त्वाप्रमाणें त्यांनीं परमार्थ व प्रपंच यांचा मेळ घातला होता. समाजोन्नतीस धर्मजागृत्तीबरोबर सामाजिक शैक्षणिक, औद्योगिक, सांस्कृतिक वगैरे क्षेत्रातही त्याची प्रगती होणें जरूर आहे, असें त्यांचे ठाम मत होते. त्याप्रमाणे त्यांनीं आपल्या कार्याची दिशा ठरविली होती. सांप्रतच्या काळात इंग्लिश शिक्षणाची आवश्यकता पटून त्यांनीं त्या दृष्टीनें प्रामुख्याने भाग घेतला होता. समाजाच्या गरीब विद्यार्थ्यांना मदत करण्याकरतां आपल्या सर्व जहागिरीचे उत्पन्न समाजास वहाल करणारे सुप्रसिद्ध दानशूर पुण्यश्लोक लिं. लिंगाप्पा जायाप्पा शिरसंगीकर देसाई यांनी स्वामीजींच्या प्रेरणेनेंच हा मोठा स्वार्थत्याग केला. शिवयोग मंदिरातील साधकांना धार्मिक शिक्षणाबरोबर इंग्रजी व हिंदी भाषाही शिकविण्याची व्यवस्था स्वामीजींनी केली.

समाजाच्या कृषी व औद्योगिक प्रगतीकडेही त्यांनी लक्ष पुरविले. आपल्या प्रत्येक प्रवचनात ते त्यांचा उल्लेख करीत. कै. अप्पासाहेब वारदांच्या सूचनेप्रमाणें त्यांनीं शिवयोग मंदिर फंडातून बागलकोट येथें कापसाची जिनिंग व प्रसिंग फॅक्टरी सुरू केली. आपल्या हयातींत स्वतः त्याची देखरेख करून ती नांवारुपास आणली. मात्र त्यांच्या अपेक्षेप्रमाणें सुताची गिरणी स्थापन झाली नाहीं. शिवयोग मंदिराचे सांप्रतचे मुख्य उत्पन्न ह्या फॅक्टरीचेच आहे.

शिवयोग मंदिरांतही त्यांनी गोशाळा व कृषिकर्म स्थापून त्यांची जोपासना व देखरेखीचे कार्य तेथील साधकावर सोपविले. त्यामुळें साधकांना शेतीचे व पशुपालनाचे प्रत्यक्ष व व्यावहारिक ज्ञान मिळू लागले.

समाजोद्धारास स्त्रियोन्नतीची आवश्यकताही त्यांनी जाणली होती. महासभेच्या अधिवेशनाच्यावेळी व शिवयोग मंदिरांतील शिवरात्रीच्या यात्रेच्यावेळी ते महिला परिषदा भरवीत. त्यामध्ये महिलांच्या उन्नतीचा कार्यक्रम आंखण्यांत महिलांना मार्गदर्शन करीत. त्यांना गायन कलेचीही अभिरुची होती. पंचाक्षरी नांवाचा एक अंध व गरीब मुलगा त्यांच्याकडे सहाय्यार्थ आला असतांना त्याचे सुस्वर गायन ऐकून त्यांनीं त्याला आपणाकडे ठेवून घेतले. आपल्या खर्चानें त्यांनीं त्याला गायन कलेचे शिक्षण देवविले. नंतर त्याच्या मदतीनें शिवयोग मंदिरांत साधकाकरतां गायन वर्गही सुरू केला. याप्रमाणें ते समाजोद्धाराच्या प्रत्येक

कार्यक्रमांत लक्ष घालून त्याच्या अमलबजावणीच्या कार्याला प्रोत्साहन व सहाय्य देत होते.

**स्वामीजींची कांही वैशिष्टचें व आठवणी.**

वरील सर्व हकीगतीवरून स्वामीजींनी प्रतिकूल परिस्थितीतही समाजोद्धाराचे किती प्रचंड कार्य केलें याची कल्पना येईल. अत्यंत गरीब कुळात जन्मलेले व कन्नड भाषेशिवाय दुसरी भाषा न जाणणारे एक गांवठी शाळा शिक्षक आपल्या उत्तर आयुष्यात साऱ्या वीरशैव समाजाचे नेते बनून अ. भा. वीरशैव महासभा व शिवयोग मंदिरासारख्या महत्वाच्या संस्था स्थापन करतात ही गोष्टच अलौकिक आहे. याच्यावरून त्यांच्या अंगी वसत असलेल्या असामान्य कर्तबगारीची कल्पना येते.

याशिवाय विशाल दृष्टीकोण, दूरदर्शिकत्व, साधे व सात्त्विक जीवन, निःस्वार्थ बुद्धि, मनमिळावूपणा, बोलल्याप्रमाणें वागण्याचे खडतर व्रत हे त्यांचे गुणही त्यांच्या ह्या असामान्य यशाला कारणीभूत झाले आहेत. सांप्रदायिक व सकुचित विचारांना त्यांच्या मनांत थारा नव्हता. त्यांचा स्वधर्माभिमान प्रखर असला तरी ते परधर्माच्या बाबतीत सहिष्णुवादी होते. एकदा त्यांचे शिष्य व गवीमठाचे सांप्रतचे अधिपती श्री बसवलिंगस्वामी यांनी आपल्या एका भाषणांत 'जगातील सर्व धर्मांमध्ये वीरशैव धर्मच श्रेष्ठ आहे' असे प्रतिपादन केले. तेव्हा स्वामीजींनी त्यांना बोलावून 'सर्व धर्मांची मूल तत्त्वे एकच आहेत. परंतु प्रत्येकाला आपला धर्मच श्रेष्ठ वाटतो. आपल्या धर्माबद्दल अवश्य अभिमान बाळगावा, परंतु इतर धर्मांना कमी लेखू नये. कारण दुसऱ्या धर्मांतही कांहीं चांगली तत्त्वे असतात' असा उपदेश केला. बसवलिंग स्वामींना हा उपदेश पटला व त्याला अनुसरुन ते आता आपल्या मठात दर वर्षी 'सर्वधर्म संमेलन' भरवितात.

साधकांना सुधारण्याची स्वामीजींची पद्धत अनुकरणीय अशी होती. हुबळी मूरसाविरमठाचे भूतपूर्व अधिपती लिं. श्री. गुरुसिद्द स्वामी जगदृगुरु अल्पवयी असतांना शिक्षणाकरतां शिवयोग मंदिरास गेले. त्यावेळी त्यांच्या अंगावर भरजरी रेशमी कपडे होते. गळयात सोन्याचा चौक ( गुंडगडगी ) होता. बरोबर सेवेकरतां दोन तीन सेवेकरी घेऊन श्रीमंती थाटात ते तेथे गेले. त्याचा तो श्रीमंती थाट स्वामीजींना आवडला नाहीं. तरी त्यांना त्याबद्दल कांही न बोलतां आपल्या आश्रमात प्रवेश दिला. उपदेश करून अथवा आश्रमाचे नियम दाखवून

त्यांना सुधारण्यापेक्षां आपल्या व साधकांच्या साध्या जीवनाच्या प्रत्यक्ष उदाहरणा-नेच ते सुधारतील अशी स्वामीजींची अपेक्षा होती. त्याप्रमाणेंच घडले दहा पंधरा दिवसातच श्री. गुरुसिद्ध स्वामीजींना आपल्या श्रीमंती थाटाची लाज वाटू लागली. त्यांनी त्याचा त्याग केला. सेवेकऱ्यावरोबर सर्व उंची वस्त्रें व आभरणे देऊन त्याना परत पाठवून दिले व इतर साधकाप्रमाणें ते साधेपणाने राहूं लागले.

स्वामीजींचें जीवनही अत्यंत साधे होतें. आश्रमात ते साधकाबरोबर रहात; व त्यांच्याबरोबरच जेवणखाण करीत. इतर मठाधिपतीप्रमाणें ते कधींही मिरवले नाहीत क कधीही पालखीत पाय ठेवला नाहीं. प्रवासातही ते आपल्या बरोबर काहीच लवाजमा घेत नसत. ते आपला सर्व प्रवास पायी अथवा बैलगाडीतून करीत असत. ते जसे साधे होते तसेच प्रसिद्धि पराङ्मुखही होते.

अ. भा. वीरशैव महासभा व शिवयोगमंदिर संस्था स्थापून त्यांनीच त्यांना नांवारूपास आणले. तरी त्यांच्या अध्यक्षपणाची माळ त्यांनीं कधीही स्त्रीकारली नाहीं. शिवयोग मंदिराच्या विश्वस्त मंडळातही त्यांनीं आपले नांव घालू दिले नाहीं. सतत ३२–४० वर्षे त्यांनी समाजोद्धाराचे प्रचंड कार्य केले, तरी ते सर्व त्यांनी पडद्याआड राहूनच केले. समाजोद्धाराची त्यांची तळमळ वाखाणण्या-जोगी होती. त्यांना त्याचा निदिध्यास लागला होता.

आयुष्याच्या अंतकाळीं ते आजारी असतांना चित्रदुर्गचे ज. गु. स्वामीजी त्यांच्या भेटीस येऊन 'आपली प्रकृती आता कशी आहे?' असे विचारले, तेव्हा मला प्रथम आमच्या समाजाची प्रकृती कशी आहे ते सांगा, असे त्यांनीं कळकळीचे उद्गार काढले. या आजाराच्यावेळीं आपल्या समाचारास आलेल्या लोकांशीं ते आपल्या आजाराविषयीं विशेष न बोलतां समाजकार्याविषयींच नेहमी बोलत. याच्यावरून समाजोद्धाराविषयीं त्यांच्या मनात वसत असलेल्या तळमळीची कल्पना येते.

**अंतकाळ.**

इ. स. १९३० सालीं स्वामीजी मुदेनूर गांवाला समाजकार्याकरता गेले असतांना तेथे ते आजारी पडले. तेव्हा तेथून त्यांना हावेरीस आणून औषधो-

पचार करण्यात आला. परंतु त्याने आजार हटण्याचे चिन्ह दिसेना. स्वामीजींना आपला अंतकाळ जवळ आला असल्याची कल्पना आली. शिवयोग मंदिरातच देह ठेवण्याची त्यांची इच्छा असल्यामुळे अशा परिस्थितीतच त्यांना शिवयोग मंदिरात नेण्यात आले. त्या आजारातच तेथे ते दि. ९ फेब्रुवारी १९३० रोजीं लिंगैक्य झाले. त्यांची समाधी तेथेंच उभारण्यात आली आहे.

याप्रमाणें या महानुभावानी सतत सुमारे चाळीस वर्षे समाजकार्याकरतां आपला देह झिजवून शेवटीं आपणाला प्रिय असलेल्या शिवयोग मंदिराच्या पवित्र भूमीतच आपला देह ठेवला. श्रीची समाधि आज शिवयोग मंदिरातच आहे.

गेल्या वर्षी त्यांचा जन्मशताद्धि उत्सव शिवयोगमंदिरात व कर्नाटकात इतर ठिकाणीं मोठ्या वैभवाने साजरा करण्यात आला.

त्याच प्रमाणें ता. ९-२-१९६९ रोजी श्री हानगल कुमारस्वामीजींचो ३९ वी पुण्य तिथी सर्वत्र थाटाने साजरी झाली. त्यांचा जयंती दिन किंवा पुण्य तिथी साजरी करींत असतांना आपल्या समाजातींल धनिकांनीं, मठाधिपतीनीं, नेत्यांनीं व कार्यकर्त्यांनीं श्रींच्या आदर्श जीवनकार्याचें आपल्या जीवनात प्रत्यक्ष आचरण केल्यास त्या पूननीय अमर आत्म्यास शांति लाभेल यात संदेह नाहीं.

## लेखांक २१

## आदर्श कर्मयोगी–

# श्री. म. नि. प्र. स्व. श्री. शिवबसव शिवयोगी

## (श्री. नागनूर महास्वामीजी) बेळगांव

**( सन १९६९ मार्च–एप्रिल महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख )**

**वीरशैव धर्माची मठसंस्था.**

मठसंस्था, वीरशैव धर्माच्या धार्मिक संघटनेचे एक वैशिष्टयपूर्ण व भूषणास्पद प्रमुख अंग आहे. धर्मप्रचाराकरतां व वीरशैव समाजाची धार्मिक व सामाजिक सेवा करण्याकरतां प्राचीन वीरशैव धर्मगुरूंनीं गांवोगांवीं मठसंस्था स्थापून या कार्याकरतां मठाधिपती नेमले. या योजनेप्रमाणें या मठाधिपतींनी निस्पृहतेने व निःस्वार्थबुद्धीनें समाजाची सेवा केल्यामुळेच प्राचीनकाळीं वीरशैव समाजाची भरभराट झाली होती. परंतु कालांतरानें हे मठाधिपती आपले कर्तव्य विसरून स्वार्थी बनले. कांही जण आळसात व चैनीत काळ घालवू लागले. त्यामुळें त्यांची अधोगती होऊन समाजाची प्रगतीही खुंटली.

ही परिस्थिती जाणून ह्या मठाधिपतींना त्यांच्या कर्तव्याची जाणीव करून देऊन त्यांना धार्मिक व सामाजिक समाजसेवेचे शिक्षण देण्याकरतां पूज्य लिं. श्री हानगल कुमारस्वामीजींनीं इ. स. १९०८ सालीं शिवयोग मंदिर नांवाची संस्था स्थापन केली. तेथें मठाधिपतींना व इतर साधकांना अशा प्रकारचे शिक्षण देण्याची व्यवस्था केली. ही हकीगत श्री कुमारस्वामीजींच्या चरित्र लेखांत दिलेलीच आहे. त्यांनी योजलेल्या कार्याप्रमाणें कांहीं मठाधिपतींनी ह्या शिवयोग मंदिरांत शिक्षण घेऊन सांप्रत कर्नाटकाच्या निरनिराळ्या भागात समाजसेवेचे प्रशंसनीय कार्य करीत आहेत. अशा मठाधिपतींमध्यें बेळगांवचे श्री. म. नि. प्र. स्व. श्री. शिवबसव स्वामीजीं (नागनूर) हे प्रमुख आहेत.

## जन्म, बाल्य व अभ्यास.

श्री स्वामीजींचे मूळ गांव, बेळगांव जिल्ह्याच्या बैलहोंगल तालुक्यातील नागनूर नावाचें एक खेडें. तेथील शिवय्यनवरमठ नावाच्या एका धार्मिक व सदाचारसंपन्न कुळात इ. स. १८९६ सालीं श्री स्वामीजींचा जन्म झाला. त्यांच्या पित्याचे नांव आडिवेय्यनवरू व मातेचे नांव रुद्रम्मा. घरची गरीबी असल्यामुळें व त्यांचा पिता बालपणीच वारल्यामुळें घरच्या कुटुंबाचा सर्व भार त्यांच्यावर पडला. त्यामुळें लहानपणीच त्यांना झोळीव्रत स्वीकारून आपल्या कुटुंबाचे पालन पोषण करावे लागले. अर्थातच त्यांच्या शिक्षणाची हेळसांड झाली.

ते सुमारे दहा वर्षांचे झाल्यानंतर त्यांची धार्मिक प्रवृती व सदाचारसंपन्न वर्तणूक पाहून तेथील ग्रामस्थानीं त्यांना विरक्त रुद्राक्षिमठाचे मठाधिपति नेमले. खेड्यातला मठ नांवाचाच होता व त्याला उत्पन्नही काही नव्हते आणि मठाधिपती म्हणून त्यांच्यावर काहीं जबाबदारीही नव्हती. परंतु बाकीच्या मठाधिपती प्रमाणें नांवाचे मठाधिपती न बनता आपण आपले कर्तव्य बजावले पाहिजे ही जाणीव त्यांना होती. म्हणून शिक्षण घेण्याकरतां ते प्रथम हुबळी येथील रुद्राक्षिमठातील पाठशाळेत जाऊन तेथे थोडे धार्मिक शिक्षण घेतले. परंतु तेवढ्याने त्यांचे समाधान झाले नाहीं. याच सुमारास श्री हानगल कुमारस्वामींनी मठाधिपतींना धार्मिक शिक्षण देण्याकरतां शिवयोग मंदिर संस्था स्थापन केलेली पाहून त्यांना अत्यंत आनंद झाला व मोठ्या उत्साहाने व उत्सुकतेनें त्यांनी तेथें सन १९१० साली प्रवेश केला.

त्यांची सात्विक व मनमिळावू व विनयपूर्ण वर्तणूक आणि धार्मिक शिक्षण

घेण्याची उत्सुकता पाहून थोड्याच काळात श्री कुमारस्वामीजींची त्यांच्यावर फार मर्जी बसली. ते त्यांचे पट्टशिष्य बनले. त्यांच्या मार्गदर्शनाखाली तेथे बारावर्षे राहून त्यांनी तेथील अध्यात्मसाधना, शास्त्राध्ययन वगैरे अभ्यासक्रम पूरा केला. आपल्या गुरुंचा आशीर्वादपूर्ण निरोप घेऊन ते सन १९२२ सालीं नागनूरास परतले. त्यांच्या रुद्राक्षिमठाला धड इमारतही नव्हती. म्हणून प्रथम त्यांनी त्याच्या दुरुस्तीकडे लक्ष दिले. तसेच आजूबाजूच्या खेडोपाडी जाऊन ते धर्मप्रचारही करू लागले. त्याचप्रमाणें फावल्यावेळीं शिवयोगमंदिरास जाऊन तेथे ते आपल्या गुरुस त्यांच्या कार्यात साह्य करुं लागले. श्री कुमारस्वामीजींच्या अंत्यकाळीं ते त्यांच्या जवळच राहून त्यांचीं मनोभावानें सेवा करीत राहिले. सन १९३० सालीं श्री कुमारस्वामीजी लिंगैक्य झाल्यानंतर ते आपल्या गावास परतले.

**बेळगांवात मोफत प्रसाद निलयाची स्थापना व त्याची प्रगती.**

ह्याप्रमाणे समाजसेवेतच तें आपला सर्वकाळ घालवीत असले तरी तेवढ्यानें त्यांचें समाधान झालें नाहीं. समाजसेवेचे कांहींतरी भरीव कार्य आपण करावे असे त्यांच्या मनानें घेतलें. वीरशैव समाजोद्धारांस मुख्यतः शिक्षणाची आवश्यकता आहे हा विचार श्री कुमारस्वामींनीं त्यांच्या मनावर पूर्णपणे बिंबविला होता, व आपल्या अंतकाळीहीं त्यांनीं त्यांना समाजशिक्षणाचे कार्यच हातीं घेण्याचा उपदेश केला होता. म्हणून आपल्या पूज्य गुरूच्या आज्ञेप्रमाणें समाजाच्या शिक्षण कार्यासच आपले सर्व आयुष्य वाहण्याचा त्यांनीं निश्चय केला.

त्यावेळी बेळगांव हेच शिक्षण केंद्र असल्यामुळें खेड्यातील गरीब विद्यार्थ्यांना आपल्या खर्चानें शहरात राहुन शिक्षण घेणें शक्य नव्हते. त्यामुळे कितीतरी हुषार, बुद्धिमान परंतु गरीब विद्यार्थ्यांना इंग्रजी शिक्षणास मुकावे लागत असे. श्री. स्वामीजींनी समाजातील गरीब विद्यार्थ्यांची ही शोचनीय परिस्थिती ओळखली व त्या करतां बेळगावात गरीब विद्यार्थ्यांकरतां एक मोफत प्रसादनिलय ( बोर्डिंग ) स्थापण्याचे त्यांनीं ठरविले.

त्या करतां त्यांनीं प्रथम गावोगांवी संचार करून धान्य व इतर मदत गोळा केली व बेळगांवातील किल्ला भागातील एक घर भाड्यानें घेऊन तेथे दि. ६ जून १९३२ रोजी शुभमुहूर्तावर प्रसाद निलयाची स्थापना केली. ह्या प्रसाद निलयांत

प्रथम २५ विद्यार्थी दाखल झाले. श्री स्वामीजी स्वतः तेथे राहून प्रसाद निलयाची सर्व व्यवस्था पहात विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करीत व वर्षातून कांहीं दिवस खेडोपाडीं संचार करून धान्य व फंड गोळा करीत.

दिवसेंदिवस विद्यार्थ्यांची संख्या वाढूं लागली व ह्या संस्थेची उपयुक्तता लोकांना पटल्यामुळे त्यांच्याकडून जास्ती मदतही मिळू लागली. किल्ल्यातील घर पुरेनासे झाले, म्हणून त्यांनी शहापूर भागात एक मोठें घर भाड्याने घेतले. परंतु पुढें पुढे तेंही पुरेनासे झाल्यामुळें त्यांनी सन १९४३ सालीं मारुती गल्लीतील एक मोठी इमारत खरेदी करून त्यात प्रसाद निलयाकरतां आवश्यक असलेली दुरुस्ती व फेरफार करून तेथे त्याची कायमची व्यवस्था केली. ह्या इमारतीच्या दुरुस्तीकरतां स्वामीजींनी सुमारे अडीच लाख रुपयें खर्च केले.

या कामीं त्यांना हुबळी मूरुसावीरं मठाचे जगद्गुरुंनीं व इतर धनिकांनी मदत केली. हें प्रसाद निलय आजपर्यंत या इमारतीत असून तेथे सुमारे तीनशें विद्यार्थी रहातात. सध्यासुद्धां स्वामींजीं स्वतः तेथें राहुन प्रसाद निलयाची सर्व व्यवस्था पाहातात व विद्यार्थ्यांचे दैनंदिन जीवन व त्यांचे जेवणखाण वगैरे गोष्टींवर ते स्वतः देखरेख करतात. विद्यार्थ्यांच्या सोईकरतां त्यांनीं तेथे एक ग्रंथालय व वाचनालय स्थापन केले आहे. तसेच त्यांना हिंदी व संस्कृत शिकविण्याची व्यवस्थाही केली आहे. याप्रमाणें विद्यार्थ्यांना आवश्यक असलेल्या सर्व सुखसोयी त्यांनी तेथें निर्माण केल्या आहेत. हल्ली बोर्डिंगमध्ये तीनशेवर विद्यार्थी आहेत.

### प्रसाद निलयाची नवीन भव्य इमारत.

याप्रमाणे श्री स्वामीजींनी प्रसाद निलयाकरतां स्वतंत्र इमारतीची व्यवस्था केली तरी दिवसें दिवस विद्यार्थ्यांची संख्या वाढत असल्यामुळें ही इमारतसुद्धां आतां पुरेनाशी झाली आहे. शिवाय ही इमारत बेळगांव शहराच्या गजबजलेल्या बाजाराच्या भागात असल्यामुळें तेथें विद्यार्थ्यांना खेळण्यास अथवा हिंडण्याफिरण्यास वाव नाहीं. करितां स्वामीजींनी बेळगांवच्या उत्तरेकडच्या एक्स्टेनशन भागांत श्री. जवाहरलाल मेडिकल कॉलेजसमोर पुणें–बेंगळूर रस्त्यास लागून असलेली सरकारी पांच एकर जमीन मिळवून तेथे सुमारे आठ लाख रुपये खर्च करून विद्यार्थ्यास उपयुक्त अशा सर्व साधनानी समृद्ध अशी एक भव्य टोलेजंग दुमजली इमारत बांधली आहे.

या इमारतीचे उद्घाटन वीरशैव समाजाचे प्रमुख नेते व अखिल भारतीय काँग्रेसचे अध्यक्ष माननीय एस. निजलिंगाप्पा यांच्या शुभहस्ते दि. १९-२-१९६९ रोजीं मोठ्या समारंभाने झाले. म्हैसूर राज्याचे कांहीं मंत्री व कर्नाटकाचे कांही मठाधिपती ह्या समारंभास उपस्थित राहून श्री स्वामीजींनीं आजपर्यंत केलेल्या प्रशंसनीय समाज सेवेच्या कार्याची मुखभर वाखाणणी केलीं. ही इमारत दुमजली असून त्यांत ७२ खोल्या व ४ मोठे हॉल आहेत. ग्रंथालय, वाचनालय, स्वैपाकघर, भोजनालय वगैरे विद्यार्थ्यांच्या सोयीकरतां इतर भागहीं निर्माण केले आहेत.

## विद्यार्थिनी प्रसाद निलय.

श्री स्वामीजींच्या शिक्षण क्षेत्रातील कार्याचे दुसरे एक वैशिष्टच येथे उल्लेखनीय आहे. आपल्या समाजाची खरी सुधारणा व्हावयाची असेल तर त्याच्याकरतां आपल्या समाजाचा स्त्रीवर्ग सुशिक्षित झाला पाहिजे असे श्री स्वामीजींचे ठाम मत आहे. त्याप्रमाणे गरीब विद्यार्थिनींनाही शिक्षण घेण्याची सोय व्हावी ह्या दृष्टीनें त्यांनी त्यांच्याकरतां एक निराळे मोफत विद्यार्थिनी प्रसाद निलय सुरु करून त्यांच्या देखरेखीकरतां दोघा सेवानिवृत्त शिक्षकांची नेमणूक केली आहे ह्या प्रसाद निलयात सध्या तीस विद्यार्थिनी आहेत. त्यांना शिवण-काम वगैरे गृहोद्योगाचे शिक्षण देण्याची व्यवस्थाही करण्यात आली आहे.

## श्री. नागनूर स्वामीजींचे शिष्य श्री. प्रभुदेव स्वामीजी

परमपूज्य श्री नागनूर स्वामीजींच्या सार्वजनिक व बोर्डिंगच्या व्यवस्थेच्या सर्व कामांत श्री प्रभूदेव गुरु शिवबसव स्वामी रुद्राक्षमठ नागनूर व श्री. सोलभय्या सिद्दय्या गूगिकोळ्ळमठ हे मोठ्या आस्थेने सहाय्य करीत असतात. श्री प्रभुदेव स्वामीजी मूळचे यमकनमर्डी गांवचे असून त्यांचे प्राथमिक शिक्षण बेळगांवांत व १८ वर्षे संस्कृत अध्ययन वीरभद्रछत्र बेंगळूर येथे झाले आहे. ते संस्कृत पंडित आहेत. ते आपल्या गुरूच्या सर्व सार्वजनिक कार्यांत अत्यंत उत्साहानें भाग घेत आहेत.

## स्वामीजींची इतर सार्वजनिक कार्ये.

स्वामीजींनी मुख्यतः समाज शिक्षणाचे कार्य केले असले तरी समाजोन्नती-च्या इतर कार्याकडेही त्यांनी दुर्लक्ष केलेले नाही . समाजाची सर्वांगीण उन्नत्ती

होण्यास समाज जीवनाच्या सर्व क्षेत्रांत प्रगती होणे जरूर आहे हे त्यांनी जाणले आहे. परंतु त्या करतां समाज सेवकानें आपल्या मर्यादित शक्तीचा विचार न करतां समाज सुधारणेच्या प्रत्येक कार्यक्रमात आपले तोंड खुपसून 'एक ना धड भाराभर चिंध्या' म्हणीप्रमाणें वागणे त्यांना पसंत नाही. परंतु त्या त्या क्षेत्रांत कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांना सहाय्य करणें हे समाज सेवकाचे कर्तव्य आहे, असे ते मानतात व त्याप्रमाणें ते वागतात. वचनपितामह कै. हळकट्टी यांनी केलेल्या वचन साहित्य संशोधनाला त्यांनी फंड जमवून पैशाची मदत केली. तसेच इतर साहित्यिकांनाही ते शक्त्यानुसार मदत करतात. कोणीही समाजसेवक त्यांच्याकडे मदत मागण्यास गेला तर त्याला ते शक्त्यानुसार मदत करून प्रोत्साहन देतात.

अलीकडे शिवयोग मंदीर संस्थेत अव्यवस्था माजून ती संस्था मोडकळीस आली होती. म्हणून विश्वस्त मंडळाच्या व कांहीं प्रतिष्ठित लोकांच्या आग्रहा-वरून त्यांनीं त्या संस्थेचे अध्यक्षपद स्वीकारले आहे. त्याच्या पुनरुज्जीवना करतां ते अत्यंत श्रम घेत आहेत. त्यांच्या नेतृत्वामुळें त्या संस्थेला पूर्वीचे वैभव प्राप्त होईल अशी आशा आहे.

वरील सर्व विवेचनावरून श्री स्वामीजींच्या कर्तबगारीची व त्यांच्या निःस्वार्थ सेवेची कल्पना येईल. महाराष्ट्रातही अनेक वीरशैव मठ व त्याचे मठाधिपती आहेत. त्यापैकीं कांहीं मठांना भरपूर मिळकतीही आहेत. त्यापैकीं कांहींनी तरी श्री. नागनूर स्वामीजींचे अनुकरण करून समाजाच्या शिक्षणाचे कार्य मनोभावें व निःस्वार्थ बुद्धीनें केले तर महाराष्ट्रीय वीरशैव समाजाच्या शिक्षणाच्या कार्याची किती तरी प्रगती होईल. परमेश्वर त्यांना तसे करण्याची सुबुद्धी देवो!

लेखांक २२

# अ. भा. वीरशैव महासभेचे मुंबई अधिवेशन आणि महाराष्ट्रीय वीरशैव समाजोन्नतीचा कार्यक्रम

( सन १९६९ मे महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख )

अ. भा. वीरशैव महासभेचे अठरावें अधिवेशन मुंबईत भरण्याचे वृत्त कळल्यानंतर त्या संबंधीचे माझे काही विचार प्रगट करण्याचा माझा मानस होता. परंतु त्यानंतर माझ्या जीवनात अचानक घडून आलेल्या दुर्दैवी घटनेमुळें त्या संबंधी काही लेख लिहिण्याच्या मनस्थितीत मी नव्हतो. परंतु सदरी अधिवेशनाच्या सरचिटणीसानी या अधिवेशनाच्या स्मरणिकेकरतां मी एखादा मार्गदर्शक लेख लिहावा अशी इच्छा प्रकट केल्यावरून व महाराष्ट्रीय वीरशैव समाजाच्या दृष्टीनें हे अधिवेशन महत्वाचे आहे असें मला वाटल्यावरून या बाबतीतील माझे कांहीं विचार मी या लेखात मांडीत आहे.

वीरशैव समाज मुख्यतः कर्नाटक, महाराष्ट्र व आंध्र या तीन प्रांतात वसलेला आहे. कर्नाटकात हा समाज बहुसंख्य असून तो तेथील सर्व सार्वजनिक क्षेत्रांत

आघाडीवर आहे. ही परिस्थिती लक्षांत घेतां व अ. भा. वीरशैव महासभेचा गतेतिहास पाहाता ही महासभा आतां कर्नाटकातील वीरशैव समाजाकरतां कांहीं कार्य करू शकेल कीं नाहीं याबद्दल मला शंका वाटते. परंतु मुंबई अधिवेशनाचे नियोजित अध्यक्ष श्री. शिवकुमार स्वामीजी वीरशैव समाजाचे नामवंत पुढारी व शिक्षण क्षेत्रात अभूतपूर्व व प्रशंसनीय कार्य केलेले एक अनुभविक व थोर कर्मयोगी आहेत. महासभेचे ध्येय धोरण व त्याचा आगामी कार्यक्रम या बद्दल त्यांचे विचार काय आहेत याची मला कल्पना नाहीं. करिता यासंबंधी मी काही लिहू शकत नाही. परंतु महाराष्ट्रातील वीरशैव समाज अल्पसंख्य असून तो सर्व सार्वजनिक क्षेत्रात मागासलेला आहे. करिता महाराष्ट्रीय वीरशैव समाजाचीं संघटना व प्रगती साधण्याच्या दृष्टीनें साऱ्या महाराष्ट्रात कार्य करणाऱ्या अशा एका संस्थेची जरुरी आहे यांत शंका नाहीं करितां येत्या अधिवेशनात अशी एक संस्था स्थापण्याच्या दृष्टीनें मी माझे कांहीं विचार खाली मांडीत आहे.

१) संघ स्थापना

ह्या अधिवेशनात अ. भा. वीरशैव महासभेची महाराष्ट्र शाखा या नांवाची एक संस्था स्थापण्यात यावी. परंतु त्याचे ध्येयधोरण व कार्यक्रम महाराष्ट्राच्या विशिष्ट परिस्थितीला अनुरुप होईल अशा रीतीनेंच आंखले जावे. तसेच त्याचे पदाधिकारीं व कार्यकारिणीचे सभासद होता होईल तितके मराठी जाणणारेच असावेत. त्यांच्यापैकीं काहींना तरी कन्नड भाषा समजत असल्यास उत्तमच. ह्या संस्थेचे ध्येयधोरण व कार्यक्रम मुख्यतः शैक्षणिक, धार्मिक, साहित्यिक व सामाजिक क्षेत्रापुरतेच मर्यादित असावे. त्यांत राजकीय क्षेत्राचा समावेश करू नये.

२) शैक्षणिक कार्यक्रम.

महाराष्ट्रीय वीरशैव समाजांत मोठ्या प्रमाणांत शिक्षणाचा प्रसार झ त्याशिवाय त्याची प्रगती होणार नाहीं. शिक्षण सर्व प्रगतीचा पाया आहे करितां या संस्थेच्या कार्यक्रमांत शिक्षण प्रसाराच्या कार्यावर मुख्य भर दिला जावा. ही गोष्ट ह्या अधिवेशनाच्या कार्यकर्त्यांनाही पटलेली असून त्या करतां एक ' विशिष्ट फंड' उभारण्याची योजना मंजूर करण्यांत येणार आहे,असे कळते. ही योजना अत्यंत स्तुत्य व स्वागतार्ह असली तरी महाराष्ट्रीय वीरशैव समाजाचीं विशिष्ट परिस्थिती

लक्षांत घेतां ती व्यवहारिक होणार नाहीं असे मला वाटते. दिवसेंदिवस विद्यार्थ्यांची संख्या वाढत आहे व वाढणें समाजाच्या हिताचे आहे. तेव्हा महाराष्ट्रीय वीरशैव समाजाच्या सर्व, निदान बहुसंख्य, गरीब विद्यार्थ्यांना मदत करता येईल एवढा मोठा फंड, कार्यकर्त्यांनी कितीही प्रयत्न केले तरी जमणार नाही व भरपूर फंड न जमल्यामुळें काहीं थोडयाच गरीब विद्यार्थ्यांना त्यापासून मदत मिळेल. त्यामुळे समाजात निरुत्साह उत्पन्न होऊन हा फंड वांटण्याच्या बाबतीत फंड कमिटीवर पक्षपाताचे आरोपही येतील. तसे झाल्यास ह्या फंडामुळे होणाऱ्या लाभापेक्षा हानीच जास्त होईल व त्याचा समाजावर अनिष्ट परिणाम होईल. तसेच समाजाचे काही धनिक लोक समाजाच्या अशा स्थानिक संस्थाना सांप्रत मदत करीत असल्यामुळें ते ह्या केंद्राच्या 'विशिष्ट फंडाला' सढळ हातानें मदतही करूं शकणार नाहींत. त्याकरतां असला 'विशिष्ट फंड' उभारण्यापेक्षां महाराष्ट्रातील मुख्य मुख्य शिक्षण केंद्रात वीरशैव विद्यार्थ्यांकरतां मोफत विद्यार्थीनिलये ( Free boarding house ) स्थापण्याची योजना आंखणेच योग्य होईल. असली विद्यार्थी निलये आजही काहीं शिक्षणकेंद्रात स्थापली जात आहेत. परंतु गरजेच्या दृष्टीनें पहाता ती अगदीच अपुरी आहेत.

अशा विद्यार्थी निलयात गरीब विद्यार्थ्यांना मोफत राहण्याची व जेवणाची व्यवस्था झाली पाहिजे. परंतु महाराष्ट्रातील कोणत्याही विद्यार्थी निलयात गरीब विद्यार्थ्यांना मोफत जेवण देण्याची व्यवस्था नाहीं. एवढेंच नव्हे तर कांहीं विद्यार्थीनिलयांत राहण्याकरतां सुद्धां विद्यार्थ्यांकडून भाडे वसूल केले जाते. विद्यार्थी निलय चालकाकडे भरपूर फंड नसल्यामुळें त्यांना ही गोष्ट करावी लागते, ही गोष्ट खरी. परंतु त्यामुळे गरीब विद्यार्थ्यांचा प्रश्न सुटत नाहीं. करितां, महाराष्ट्र शाखेच्या कार्यकर्त्यांनी ठिकठिकाणच्या धनिक लोकांना व पुढाऱ्यांना भेटून अशा संस्थांच्या चालकांना जास्तो फंड जमविण्यास मदत केल्यास हे कार्य मोठ्या प्रमाणावर यशस्वी होईल. तसेच हे कार्य जबाबदार संस्थेच्या मार्फत संघटित रीतीने झाल्यास त्याचा समाजावर व विशेषतः धनिक लोकांवर चांगला परिणाम होईल व ते अशा स्थानिक संस्थांना सढळ हातानें मदत करण्यास पुढे येतील. धनिक लोकांना आपल्या देणगीचा उपयोग आपल्याच भागात व्हावा व त्यामुळें आपलें नांवही गाजावें अशी इच्छा असते. ही त्यांची इच्छा मुंबईतल्या विशिष्ट फंडाला देणगी देऊन पुरी होणार नाहीं तर स्थानिक विद्यार्थी निलयाला देणग्या देऊनच सफल होईल. कार्यकर्त्यांनी हा सर्वसामान्य मनुष्य स्वभाव लक्षात घेऊनच आपल्या कार्यक्रमाचे धोरण ठरविले पाहिजे. अर्थातच या धोरणाचे यशापयश कार्यकर्त्यांच्या प्रयत्नावर अवलंबून राहील.

## ३) शिक्षण संस्था स्थापण्याची आवश्यकता नाही.

कर्नाटकातल्या प्रमाणें महाराष्ट्रातही आपल्या समाजाचीं हायस्कूले व कॉलेजे स्थापली जावीत असें काहीं कार्यकर्त्यांना वाटतें. परंतु महाराष्ट्रीय वीरशैव समाजाची मर्यादित शक्ति लक्षात घेता हा कार्यक्रम अमलात आणणें शक्य होणार नाहीं. तसेंच महाराष्ट्राच्या सर्व प्रमुख ठिकाणीं सांप्रत अशा शिक्षण संस्था अस्तित्वात असल्यामुळे नवीन संस्था स्थापण्याची जरूरीही नाहीं. यापेक्षां अशा सर्व शिक्षण केंद्रात मोफत विद्यार्थी निलये स्थापण्यावरच आपली सर्व शक्ति केंद्रीत करणें योग्य होईल. कर्नाटकातील काही मठाधिपतींनीं समाजाच्या गरीब विद्यार्थ्यांना मदत करण्याकरता मोफत प्रसाद निलये स्थापून किती अभूतपूर्व व अचाट कामगिरी केली आहे, याची कार्यकर्त्यांना माहिती आहेच. या क्षेत्रातील श्री शिवकुमार स्वामीजींचे कार्य अत्यंत प्रशंसनीय आहे. सांप्रत त्यांच्या मोफत प्रसादनिलयात सुमारे तीन हजार विद्यार्थ्यांना राहण्याची व जेवण्याची व्यवस्था केली जात आहे. हा सर्व अवाढव्य खर्च स्वामीजी स्वतः फंड जमवूनच करीत आहेत. महाराष्ट्रात अनेक मठाधिपती असून त्यापैकी काहींना भरपूर उत्पन्नही मिळत आहे. परंतु हे मठाधिपती अशी मोफत विद्यार्थी निलयें स्थापण्यास पुढे सरसावत नाहींत हीं दुर्दैवाची गोष्ट आहे. परंतु महाराष्ट्रातील वीरशैव समाजाच्या सर्व कार्यकर्त्यांनी महाराष्ट्र शाखेच्या मार्फत संघटित रीतीनें प्रयत्न करून अशा मठाधिपतींवर समाजाचे दडपण आणल्यास काही मठाधिपती तरी काळाची पावले ओळखून अशा संस्था स्थापन करण्यास पुढे येतील. पण हा कार्यक्रम अंमलात आणण्यात अशा मठाधिपतींचे मन वळविण्यावरच जास्ती भर दिला जावा व ह्या कार्यक्रमामुळें समाजात नसते वाद माजणार नाहीत याबद्दल दक्षता घ्यावी.

## ४) अस्पृश्यता निवारण व पोटजाती निर्मूलन.

आपण सर्व बसवेश्वराचे अनुयायी म्हणून अभिमान बाळगतो, परंतु आपण कोणीही बसवेश्वराच्या तत्त्वाचें पालन करीत नाहीं. समाजातील जाती व अस्पृश्यता नष्ट करून समतेच्या तत्त्वावर समाज संघटित करणें हा बसवेश्वरांचा मुख्य कार्यक्रम होता. परंतु आजची समाजाची परिस्थिती पाहिली तर त्यात अनेक पोटजाती निर्माण झाल्या आहेत. उच्च नीच भेदभावही माजले आहेत. महाराष्ट्रातील कांहीं ठिकाणीं माहेश्वर, जंगम, पंचम, वाणी वगैरे तथाकथित उच्चवर्णीय लिंगायत, कुंभार, परीट, माळी, गवळी, साळी वगैरे पोटजातींच्या

लिंगायतांना लिंगायत म्हणून मानण्यास तयार नाहीत व त्यांच्याशी बेटीव्यवहार ( शरीरसंबंध ) तर राहोच पण रोटी व्यवहार सुद्धां ( सहभोजन ) करण्यास तयार नाहींत. ही परिस्थिती आपल्या समाजाला कलंक प्राय आहे. करितां आपल्या समाजातील सर्व पोटजातींच्या लोकांना समान लेखून त्यांच्यामध्ये सर्रास सहभोजनाची प्रथा पाडणें जरूर आहे. तसेच निरनिराळया पोटजातीच्या लोकांत विवाह घडवून आणण्याच्या कार्यक्रमासही उत्तेजन देणे आवश्य आहे. अस्पृश्यता निवारण हा कार्यक्रम तर आतां राष्ट्रीय कार्यक्रम झालेला आहे. या सर्वदृष्टीनें महाराष्ट्र शाखेच्या कार्यक्रमात 'समाजांतील पोटजातीचे निर्मूलन व अस्पृश्यता निवारण' या कार्यक्रमाचा समावेश केला जावा. कुंभार, परीट, माळी, साळी, गवळी वगैरे मागासलेल्या पोटजातींच्या लिंगायतात जागृत्ति निर्माण करून त्यांची सघटना करण्याच्या दृष्टींनें त्या त्या समाजाच्या लोकांच्या परिषदा भरविणे हा एक उत्तम उपाय आहे व अशा तऱ्हेचे प्रयत्न आज होत आहेत. महाराष्ट्र शाखेने हाच कार्यक्रम मोठया प्रमाणावर अंमलात आणून साऱ्या समाजाच्या एकीकरणाचे ध्येय साधावें.

## ५) आचार्यवर्ग व विरक्तवर्ग वादाचे निर्मूलन.

महाराष्ट्रीय वीरशैव समाजात गतकालीं अस्तित्वात असलेले आचार्यवर्ग व विरक्तवर्ग किंवा पंचाचार्य अनुयायी व बसवानुयायी असले समाज घातक निरर्थक वाद सुदैवाने आता मिटले आहेत, ही एक संतोषाची गोष्ट आहे. परंतु कांहीं कांहीं ठिकाणीं अजूनही असल्या वादाचे पडसाद ऐकू येतात. करितां असले समाज घातक वाद पुनः कोठेही निर्माण होणार नाहींत याबद्दल दक्षता घेतली जावी.

## ६) वीरशैव साहित्य निर्माण.

मराठी भाषेंत वीरशैव धर्मसाहित्य, ग्रंथाच्या व नियतकालिकांच्या स्वरूपात दिवसेंदिवस जास्त प्रमाणांत प्रगट होत आहे. या बाबतींत गेल्या पांचसहा वर्षांत 'ज्ञानप्रसाद' मासिकानें प्रशंसनीय कार्य केले आहे. त्यामुळें साऱ्या महाराष्ट्रीय वीरशैवसमाजबांधवात जागृति निर्माण होऊन त्यांना आपल्या धर्माबद्दल व समाजाबद्दल अभिमान वाटत आहे. तसेंच आपल्या धर्माबद्दल जास्त माहिती करून घेण्याची जिज्ञासाही त्यांच्यामध्यें प्रबल झाली आहे. धर्मसाहित्य रचणारे नवीन लेखकही निर्माण होत आहेत. परंतु बहुतेक सर्व वीरशैव धर्मसाहित्य कन्नड भाषेत असल्यामुळें व सांप्रतच्या मराठी लेखकांना ती भाषा अवगत नसल्यामुळें धर्म-

साहित्य निर्मितीच्या त्यांच्या कार्यात अडथळा निर्माण झाला आहे. परंतु एखाद्या संस्थेमार्फत प्रयत्न केल्यास त्यांच्या मार्गातील ही अडचण दूर होण्यासारखी आहे. करितां महाराष्ट्र शाखेनें हें कार्य हाती घेऊन त्याच्या मार्गातील ह्या अडचणीचे निवारण करून त्यांना शक्य तेवढें आर्थिक सहाय्य केल्यास थोडयाच काळात मराठी भाषेंत वीरशैव धर्मसाहित्य मोठ्या प्रमाणांत निर्माण होईल.

७) ज्ञानप्रसाद मासिकास सहाय्य

समाजोन्नतीकरतां ठिकठिकाणी चाललेल्या कार्यक्रमाला वेळोवेळी प्रसिद्धी मिळणे जरूर आहे. त्यामुळें समाजांत चांगली जागृति होते. परंतु महाराष्ट्रांतील वर्तमानपत्रे अथवा नियतकालिके आमच्या समाजाच्या कार्यक्रमांना अथवा घडा-मोडींना विशेष महत्व देत नाहींत व त्यांना प्रसिद्धीही देत नाहींत. परंतु आपल्या समाजाच्या सर्वांगीण उन्नतीला सर्वस्वी वाहून घेतलेले 'ज्ञानप्रसाद' मासिक गेल्या ७–८ वर्षांपासून हे प्रसिद्धीचें कार्य अत्यंत प्रशंसनीय रीतींनें करीत आहे. त्यामुळें ते आपल्या समाज बांधवांत अत्यंत लोकप्रिय झाले आहे. परंतु त्याला अजून आर्थिक स्थैर्य नाहीं. त्याचे संपादक श्री. शि. वा. संकनवाडे निःस्वार्थ बुद्धीनें, अत्यंत कष्टानें व आर्थिक अडचणींना तोंड देऊन समाजसेवा करणाच्या एकमेव उद्देशानें ते चालवीत आहेत. आजपर्यंत या मासिकानें केलेलें समाजसेवेचें कार्य व त्याचे धोरण साऱ्या समाजाला पसंत पडले आहे. करिता या मासिकाला आर्थिक स्थैर्य मिळवून देऊन ते आजच्या पेक्षाही प्रौढ व उच्च स्वरूपात प्रकट होईल अशी व्यवस्था करणें समाजाच्या हिताचे आहे. महाराष्ट्र शाखेने त्या मासिकाला आर्थिक स्थैर्य मिळवून देऊन समाजाची अधिक सेवा करण्याची संधी त्याला मिळवून द्यावी.

८) वीरशैव डायरेक्टरी प्रकाशन.

महाराष्ट्रीय वीरशैव समाज महाराष्ट्रात अल्पसंख्य असून तो इतस्ततः सर्व प्रांतभर विखुरलेला आहे. त्यामुळे सर्व समाजबांधवानी आपल्या समाजाच्या परिस्थितीची जाणीव नाहीं. तसेच महाराष्ट्रात ठिकठिकाणी लहान मोठ्या संस्था आपल्या समाजसेवेचे कार्य करीत आहेत त्याचीही माहिती समाजबांध-वांना नाहीं. करिता महाराष्ट्रीय वीरशैव समाजाची माहिती देणारी व समाज सेवा करीत असलेल्या सर्व संस्थाचीं ओळख करून देणारी एक

महाराष्ट्रीय वीरशैव समाज डायरेक्टरी प्रसिद्ध करणें उपयुक्त होईल. समाजसेवा करू इच्छिणाऱ्या कार्यकर्त्यांना तर अशा एका डायरेक्टरीची अत्यंत जरूरी आहे. करितां महाराष्ट्र शाखेने हे कार्य हाती घेऊन अशी एक डायरेक्टरी प्रसिद्ध करावी.

महाराष्ट्र शाखेने अमलात आणावयाच्या कार्यक्रमाची यादी यांच्यापेक्षाही जास्त वाढवता येईल. संस्था स्थापन करणें व त्याचें ध्येयधोरण ठरवून त्याचा कार्यक्रम आखणें सोपो गोष्ट आहे. परंतु तो कार्यक्रम अमलात आणणें हा मुख्य व कठिण प्रश्न आहे. समाजसेवेच्या कार्याला वाहून घेतलेले निःस्वार्थी, उत्साही व कळकळीचे कार्यकर्ते संस्थेला लाभले तरच त्याचा कार्यक्रम असलात येऊन संस्था यशस्वी रीतींनें चालेल. करितां, संस्था स्थापण्यावरोवर अशा कार्यकर्त्यांचा संच तयार करणेंही अगत्याचे आहे. सुदवाने सांप्रत महाराष्ट्रीय वींरशैव समाजात ठिकठिकाणी असले निःस्वार्थी, उत्साही व कळकळीचे कार्यकर्ते उदयास येत आहेत व काहीतरी समाजसेवा करावी अशी त्यांची प्रवल इच्छाही आहे. परंतु त्या सर्वांची संघटना करून व त्यांच्या अडीअडचणींचा विचार करून त्यांना वेळोवेळी मार्गदर्शन करणाऱ्या नेत्याची जरूरी आहे. त्या दृष्टीनें महाराष्ट्रशाखा आपल्या कार्यकारिणीत अशा कार्यकर्त्यांचा समावेश करून घेऊन त्यांना वेळोवेळी मार्गदर्शन केल्यास संस्थेच्या समाजोन्नतीचे कार्य यशस्वीरीतीने चालेल. तसेंच ही संस्था, त्याचे कार्यकर्ते व समाज यांच्यामध्ये सतत निकट संबंध राहणें जरूर आहे या दृष्टीनें या संस्थेची वार्षिक अधिवेशनें व कार्यकारिणीच्या सभा फक्त मुंबईतच न भरविता महाराष्ट्रीय वीरशैव समाजाच्या सर्व प्रमुख स्थळीं भरवीत गेल्यास त्या त्या भागाच्या समाजात चांगली जागृत्ती होईल, व कार्यकर्त्यांना आपल्या समाजाच्या परिस्थितीची व उणीवाची प्रत्यक्ष जाणीव होईल. तसेंच ही संस्था करीत असलेल्या समाजसेवेच्या कार्याचीही समाजाला माहिती होईल.

महासभेच्या या अधिवेशनाच्या निमित्तानें महाराष्ट्रीय वीरशैव समाजाच्या सर्वांगीण उन्नतीविषयी मला जे काही चार विचार सुचले ते मी या लेखात नमूद केले आहेत. ते कितपत उपयुक्त व व्यवहारिक आहेत हे कार्यकर्त्यांनीच विचार करून ठरवायचे आहे. या शिवायही इतर अनेक सूचना अधिवेशनापुढें येतीलच. त्या सर्वांचा विचार करूनच पुढील कार्यक्रम ठरविला जावा. परंतु ह्या बाबतीत सर्व कार्यकर्त्यांनी व अधिवेशनाच्या चालकांनी लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं अधिवेशनांत अगडबंब व भराभर ठराव पास करून पुढें ते ठराव अमलांत न

आणतां स्वस्थ बसण्यापेक्षां लहानसा व्यावहारिक व आपणाला झेपेल एवढाच कार्यक्रम आंखून तो यशस्वीरीतीनें अमलांत आणल्यास त्यापासून समाजाचे जास्ती हित होईल. आतां आखला जाणारा कार्यक्रम यशस्वी रीतीनें अमलांत आणल्यास संस्थेच्या कर्तबगारीसंबंधी समाजांत विश्वास उत्पन्न होऊन ते संस्थेला जास्ती सहकार्य व मदत देतील. संस्थेचे चालक व कार्यकर्ते यांच्या मनांतही आपल्या कर्तबगारी संबंधी आत्मविश्वास उत्पन्न होईल. या धोरणाच्या बाबतींत "One step further is sufficient for me." हे म. गांधींचे महत्वाचे व अनुकरणीय उद्गार सर्व कार्यकर्त्यांनीं लक्षांत घेऊन या अधिवेशनांत महाराष्ट्रीय वीरशैव समाजाच्या सर्वांगीण उन्नतीचा व्यावहारिक कार्यक्रम आखला जाऊन तो अमलांत आणण्याची व्यवस्थाही केली गेल्यास मुंबईत महासभेचे हें अधिवेशन भरविल्याचे सार्थक झाले असे म्हणता येईल.



लेखांक २३

# महात्मा बसवेश्वर व महात्मा गांधीजी

( सन १९६९ आक्टोबर महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख )

**युगप्रवर्तक महात्मे.**

युगारंभापासून आजपर्यंत साऱ्या जगांत अनेक युगप्रवर्तक महात्मे जन्मास येऊन त्यांनी आपल्या दैवी व अलौकिक कर्तृत्वशक्तीनें मानव समाजास योग्य मार्गदर्शन करून त्याची प्रगती साधली आहे. अशा युगप्रवर्तक महात्म्यामध्ये ह्या विसाव्या शतकात साऱ्या मानव समाजास सुख व शांति संपादनेचा सत्य व अहिंसेचा मार्ग दाखवून देणारे म. गांधीजी व बाराव्या शतकांत समता, स्वातंत्र्य, भूतदया, बंधुभाव व स्त्रीस्वातंत्र्य ह्या सारख्या उदात्त तत्त्वांवर, नवा मानवसमाज निर्माण करणारे श्री बसवेश्वर हे उल्लेखनीय आहेत. हे महात्मे निरनिराळ्या काळी उदयास आल्यामुळें व त्या त्या काळाची समाज परिस्थिती निरनिराळी असल्यामुळें त्यांनी केलेल्या कार्याच्या बाह्य स्वरुपात महदंतर दिसून येत असले तरी त्यांचे व्यक्तिमत्त्व व त्यांनी आपल्या कार्याचरणांत आचरलेली मूलभूततत्त्वें यांच्यामध्ये विलक्षण साम्य दिसून येते. त्यांच्यामधील या साम्यत्वाचें निदर्शन म्हणूनच की कांय त्यांचे शताब्दि समारंभसुद्धा एका मागून एक आचरले जात आहेत हा एक योगायोगच म्हणावयाचा.

## श्री बसवेश्वरासंबंधी महात्माजींचा आदरभाव.

श्री बसवेश्वर ' वीरशैवधर्माचे उद्धारक ' म्हणून मानले जात असल्यामुळें ते एका विशिष्ट पंथाचे सांप्रदायिक धर्मगुरु होते अशी काही लोकांची समजूत आहे, परंतु ही समजूत चूकीची आहे. त्यांनी स्थापलेल्या नवसमाजास पुढे ' वीरशैव समाज ' असे नांव दिले गेले तरी त्यांनी स्थापलेला नवसमाज सत्य, अहिंसा, समता, स्वातंत्र्य, भूतदया व बंधुप्रेम या सारख्या विश्वधर्माच्या मूलभूत व उदात्त तत्त्वावर आधारलेला होता. ह्या तत्त्वाचे पालन करणाऱ्या कोणासही त्या समाजात स्थान होते. त्यामुळे त्यांनी स्थापलेल्या त्यावेळच्या समाजात ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंत व रावापासून रंकापर्यंत सर्व जातीच्या, पंथाच्या व वर्गाच्या लोकांचा समावेश झालेला होता. एवढेच नव्हे तर ते सर्व परस्पराशी समतेनें, बंधुभावानें व अत्यंत प्रेमाने वागत होते. महात्मा बसवेश्वरांच्या या कार्यांचें महत्त्व महात्मा गांधीजींनी जाणले होते म्हणूनच त्यांनी एकदां आपल्या कर्नाटकाच्या दौऱ्यांत ' ८०० वर्षापूर्वी बसवेश्वरांनी जे कार्य केले तेच मी आता पुढे चालवीत आहे ' असे बसवेश्वरा संबंधी प्रशंसोद्गार काढले होते. बसवेश्वरा बद्दल महात्माजींना अत्यंत आदर होता, एवढेंच नव्हे तर त्यांनी त्यांच्या चरित्राचा व त्यांच्या सुप्रसिद्ध वचनांचा परिचयही करून घेतला होता, ही गोष्ट माझ्या स्वतःच्या एकदोन अनुभवावरून मला कळून आले.

कर्नाटकचे माजी पुढारी कै. गंगाधर रावजी देशपांडे महात्माजीचे एकनिष्ठ अनुयायी होते ही गोस्ट सर्वश्रुतच आहे. ते एकदां महात्माजींच्या भेटीस गेले असतां महात्माजींनी त्यांना ' तुम्ही बससेश्वराचे चरित्र वाचले आहे का ? ' असा प्रश्न केला. गंगाधरराव कर्नाटकाचे पुढारी म्हणून मानले जात होते तरी त्यांना कन्नड लिहितां वाचतां येत नव्हते. त्यामुळे त्यांना कर्नाटकच्या इतिहासाची विशेष माहिती नव्हती. साहजिकच त्यांना बसवेश्वरांच्या चरित्राचीही ओळख नव्हती. त्यामुळे महात्माजींच्या ह्या अचानक प्रश्नामुळें ते मनात खजिल होऊन ' मी बसवेश्वरांचे नांव ऐकले आहे, परंतु त्यांचे चरित्र वाचले नाहीं, ' असे सांगावे लागले. तेव्हा बसवेश्वर सत्य व अहिंसा तत्त्वांचे एकनिष्ठेनें परिपालन करणारे कर्नाटकचे एक थोर संत व समाज सुधारक होते. करितां, तुम्ही अवश्य त्यांच्या चरित्राचे मनन करून त्यांनी केलेल्या कार्याची माहिती करून घ्यावे असे महात्माजींनी त्यांना सांगितले. त्यानंतर गंगाधररावांनी बसवेश्वरांच्या चरित्राची व त्यांच्या कार्याची ओळख करून घेतली. ही हकीगत स्वतः गंगाधररावांनी मला सांगितली होती.

सन १९३३ सालचा महात्माजींचा हरिजन उपवास सुप्रसिद्धच आहे. त्यांनी हा उपवास यरवडा जेलमध्येच केला होता. त्यावेळी त्यांच्याबरोबर त्यांचे आप्तकार्यदर्शी दि. महादेवभाई देसाई हेही होते. उपवासाच्या वेळी सरकारनें महात्माजीवरची सर्व बंधनें काढून घेतलीं तरी श्री महादेवभाईवरचीं बंधनें काढून न घेतां त्यांची हिंडलगा जेलला रवानगी केली. महादेवभाई 'ब' वर्गाचे कैदी होते. तरी त्यांना तेथील 'ब' वर्गाचे कैद्यामध्यें न मिसळतां त्यांना एका लहानशा वार्डामध्यें निराळे ठेवावे व त्यांना सोबत (companion) म्हणून तेथील 'ब' वर्गाच्या एका कैद्याला त्यांच्या वार्डमध्ये ठेवावें म्हणून सरकारचा हुकूम झाला होता. त्याप्रमाणें जेल सुपरिंटेंडेंटनें त्याना एका लहानशा वार्डमध्यें ठेवून त्यांना सोबत म्हणून मला तेथे पाठवून दिले. त्यावेळीं तेथील 'ब' वर्गात कर्नाटकचे सुप्रसिद्ध पुढारी श्री. दिवाकर हेही होते. ते त्यावेळी बसवेश्वरादि शिवशरणांच्या वचनावर 'वचनशास्त्र रहस्य' नांवाचा कन्नड ग्रंथ लिहीत होते. 'ब' क्लासचे हे दोनही वार्ड एकमेकास लागून होते. त्यामुळे दोनही वार्डमधील कैद्यामध्यें चिठ्याचपाट्यांची अनधिकृतपणें नेआण होत होती. मी महादेव भाईच्या वार्डमध्यें गेल्यानंतर त्यांना मी श्री. दिवाकर लिहीत असलेल्या ग्रंथासंबंधी व बसवेश्वर यांच्या वचनासंबंधी थोडीशी माहिती दिली. श्री. दिवाकरांनीही त्यांना आपल्या चिठीतून आपण लिहित असलेल्या ग्रंथासंबंधी व बसवेश्वरादि शिवशरणांच्या वचन साहित्याबद्दल कळविले. महादेवभाईना ते फार आवडले. नंतर त्यांनी मला बसवेश्वराच्या कांहीं निवडक वचनांचे इंग्लिश भाषेंत भाषांतर करून देण्यास सांगितलें. मी भाषांतर केलेली वचनें त्यांना फार आवडली. हीं वचनें महात्माजींनाही फार आवडतील, करितां तीं मी त्यांच्याकडे पाठवून देतो असें सांगून त्यांनी ती वचनें व बसवेश्वरासंबंधी थोडीशी माहितीं त्यांच्याकडे पाठवून दिली. त्याला उत्तर म्हणून महात्माजींनी पाठविलेल्या आपल्या पत्रांत 'बसवेश्वरांचे चरित्र व त्यांची कांहीं वचनें मी जाणतो. त्यांची वचनें उद्बोधक आहेत. कांहीं वर्षामागें कर्नाटकाचे एक विद्वान आमच्याकडे येऊन बसवेश्वरासंबधी व त्यांच्या कांही वचनांची माहिती त्यांनी आम्हांला दिली होती. त्यावेळीं तुम्हीही हजर होता. त्या विद्वानांनी दिलेल्या वचनांचा सारांश अजूनही माझ्या स्मरणात आहे. असे असतांना तुम्ही ही गोष्ट कशी विसरला?' असे लिहिले होते. महादेवभाईनी हे पत्र मला दाखवून 'पहा या म्हाताऱ्याची स्मरणशक्ति' म्हणून आश्चर्ययुक्त उद्गार काढले.

वरील हकीगतीवरून महात्माजी बसवेश्वराबद्दल किती आत्मीयता व आदरभाव बाळगीत होते याची कल्पना येते. ह्या दोघा महात्म्यांच्या जीवनांतील प्रमुख साम्यस्थळें संक्षिप्तपणें खालील प्रमाणें उल्लेखिता येतील.

धार्मिक महानुभावी व कर्मयोगी.

हे दोघेही महात्मे धार्मिक महानुभावी होते यांत संशय नाहीं. धर्म हाच त्यांच्या साऱ्या जीवनाचा पाया होता. मानवी जीवनाच्या सर्व क्षेत्रातील कार्याचरणाला धर्मांचे अधिष्ठान असले पाहिजे, असें त्यांचें ठाम मत होते व त्याप्रमाणें ते स्वतः वागत होते. सामान्यतः राजकारणात धर्माला स्थान नाहीं असे मानण्यात येते. परंतु महात्माजींनी आपले राजकारण धर्म, नीती यांच्या पायावरच उभारले होते. बसवेश्वरांचे सामाजिक व आर्थिक कार्यक्रम धर्मावरच अधिष्ठित झाले होते.

या प्रमाणें हे दोघेही महात्मे धर्माचे मूर्तिमंत अवतार होते तरी त्यांनी कधीही धर्मगुरुपदाची अथवा धर्माचार्य पदवीची आकांक्षा बाळगली नव्हती तसेच ते मोक्षपदासाठी संसाराचा त्याग करून संन्याशीही बनले नाहींत. गीतेतील उक्तीप्रमाणें ते खऱ्या अर्थानें निष्काम कर्मयोगी होते. त्यांनी आपला वैयक्तिक संसार नीटनेटका चालवून जगाचा संसारही संभाळला व शेवटी परमार्थही साधला. हें त्यांचे आदर्शमय जीवन साऱ्या मानव जातीला मार्गदर्शक बनले आहे.

ते दोघेही हिंदुधर्माचे पुरस्कर्ते असले तरी त्यांचा हिंदुधर्म सत्य, अहिंसा, समता, व्यक्तीस्वातंत्र्य, बंधुप्रेम या सारख्या उदात्त तत्त्वावर आधारला होता. प्रचलित सांप्रदायिक हिंदुधर्मातील कांहीं अन्यायी व समाजघातक रूढींचे ते कट्टर विरोधी होते. अशा रूढींना सक्त विरोध करण्यात त्यांनी काही वेळा आपला जीवही धोक्यात घातला होता ह्या रूढीना समाजातून आमूलाग्र नष्ट करण्यांत त्यांनी केलेल्या कार्याची बरोबरी दुसरे कोणीही धर्मोद्धारक अथवा आचार्य करू शकत नाहीत.

सत्य व अहिंसा मार्गाचे प्रणेते.

महात्माजी सत्य व अहिंसा मार्गाचे आद्य प्रवर्तक होते. एवढेच नव्हे तर ते त्याचे मूर्तिमंत अवतारच होते. महायुद्धा सारख्या हिंसाकृत्यांनी होरपळून निघालेल्या व हैड्रोजन बॉंब सारख्या भयानक अणुशस्त्रांनी भयभीत होऊन गेलेल्या मानव समाजाला धीर देऊन त्यास सुख व शांती मिळवून देण्यास महात्माजींचा अहिंसा मार्ग हाच एकमेव उपाय आहे हे आतां सर्वांना पटले आहे. बसवेश्वरही सत्य व

अहिंसा तत्त्वाचे कठोर रीतीने परिपालन करीत होते. 'सत्य बोलणें हाच स्वर्ग' व 'सकळ प्राणिमात्रांचे कल्याण इच्छिणाराच शिवशरण' हीं त्यांची वचनें सुप्रसिद्ध आहेत. त्यांच्या काळीं यज्ञयागात पशुहत्त्या करणें हे सर्वमान्य व पुण्यप्रद धार्मिक कृत्य म्हणून समजले जात होते. परंतु बसवेश्वरांनी ह्या हिंसामय रूढीला कडक विरोध केला होता व आपल्या नवसमाजांत त्यांनी त्याला मुळीच स्थान दिले नव्हते.

प्रचारापेक्षा कृती श्रेष्ठ.

बहुतेक सर्व महापुरषांनी आपल्या तत्त्वांचा अथवा कार्यक्रमाचा प्रचार करण्यास सभा-संमेलने,' चर्चा, वादविवाद व दौरे यासारख्या प्रचार तंत्रांचे अवलंबन केल्याचे दिसून येते. परंतु महात्माजी व बसवेश्वर यांचा अशा प्रचार तंत्रावर विश्वास नव्हता. प्रचारापेक्षा प्रत्यक्ष कृतीलाच ते जास्तीं महत्व देत होते. सत्य अहिंसा मार्गाच्या प्रचारार्थ जगांतील अनेक देशांतून महात्माजींना आमंत्रणें आली व ही आमंत्रणें स्वीकारावी म्हणून निरनिराळचा देशांच्या अनेक पुढाऱ्यांनी त्यांना भीड घातली तरी, ते आपलें कार्यक्षेत्र भारत सोडून बाहेर कोठेही प्रचारार्थ प्रवासास गेले नाहींत. सत्य व अहिंसा मार्गाचा प्रयोग भारतात यशस्वी झाल्यास सारे जग आपोआपच त्याचे अवलंबन करील असा त्यांचा दृढ विश्वास होता व त्याप्रमाणेंच घडले आतां भारताबाहेरही अनेक देशात या मार्गाचे अवलंबन केले जात आहे. दिवसेंदिवस अहिंसावादी अनुयायांची संख्याहीं वाढत आहे. जगातील सर्व राष्ट्रात परस्पर सहकार व शांतीं स्थापण्याकरतां स्थापन झालेल्या विश्वसंस्थेने सुद्धां महात्माजींच्या अहिंसा मार्गास मान्यता देऊन महात्माजींचा जन्मशताब्दि समारंभ घडवून आणण्याविषयीं सर्व राष्ट्रांना आदेश दिला आहे. त्याचप्रमाणें आदर्श मानवसमाज स्थापण्यासाठीं क्रांतीकारक कार्यक्रम बसवेश्वरांनी हातीं घेऊन तो यशस्वी केला होता. तरी त्याच्या प्रचारार्थ ते आपले कार्यक्षेत्र कल्याणनगर सोडून बाहेर कोठेही गेले नाहींत. उलट कल्याणमध्यें त्यांनी आरंभिलेल्या ह्या महान कार्याचीं कीर्ती ऐकून भारताच्या कोनाकोपऱ्यांतून संत व धर्मात्मे कल्याणास येऊन बसवेश्वरांचे अनुयायित्व पतकरले व त्यांच्या कार्यात सहभागी झाले.

हरिजनोद्धारक.

अस्पृश्यता, पवित्र हिंदुधर्मांच्या नांवाला लागलेला एक मोठा कलंकच आहे. हिंदु समाजात रूढ झालेल्या ह्या समाजघातक रूढीस मूठमाती देऊन हरिजनांचा उद्धार

करण्याच्या बाबतीत महात्माजी व बसवेश्वर यांनी केलेल्या कार्याची सर दुसऱ्या कोणत्याही महापुरुषाच्या कार्याला येणार नाहीं. महात्माजींनी आपल्या विधायक कार्यक्रमांत अस्पृश्यता निवारणाच्या कार्यक्रमाला अग्रस्थान देऊन स्वत: आजन्म हे कार्य करीत राहिले. एवढेच नव्हे तर त्याच्या करता त्यांनी आपला प्राणही अनेक वेळा धोक्यात घातला होता. अस्पृश्य लोक देवास प्रिय आहेत म्हणून त्यांना त्यांनी 'हरिजन' नांवानें संबोधून गौरविले व भारतभर हरिजनोद्धाराचें कार्य करण्याकरता एक स्वतंत्र संस्थाच स्थापन केली. बसवेश्वर तर हरिजनांना आपले बंधू व सगेसोयरे म्हणून मानीत होतें हिंदुधर्मातील 'जातीभेद व अस्पृश्यता नष्ट करून समाजांत समता, व बंधुभाव स्थापणें' हा त्यांच्या कार्यक्रमातील प्रमुख कार्यक्रम होता त्यांनी स्थापलेल्या नवसमाजांत कोणीही अस्पृश्यता अथवा जातिभेद मानू नये, सर्वामध्यें सर्रास रोटीबेटी व्यवहार चालला पाहिजे असा त्यांचा कडक निर्बंध होता. त्यांच्या या क्रांतिकारक समाज सुधारणेच्या कार्यक्रमामुळें कर्मठ हिंदुनी त्यांच्यावर बहिष्कार घातला होता व त्यांना ठार मारण्याची भीतीही घातली होती. परंतु त्याला न डगमगतां त्यांनी आपले कार्य नेटाने पुढे चालविले. त्यांनी पूर्वाश्रमी ब्राह्मण असलेल्या मधुवय्या नांवाच्या शिवशरणाच्या मुलीचे पूर्वाश्रमी चांभार असलेल्या हरळय्या नांवाच्या शिवशरणाच्या मुलाशीं लग्न लावून समाज सुधारणेचा उच्चांक गाठला. परंतु अशा समाज सुधारणेकरतां हरळय्या व मधुवय्या यांना आपल्या प्राणाचे बलिदान करावे लागले.

**सर्वोदय समाज स्थापना.**

सांप्रतच्या मानव समाजातील अन्याय व दोष नष्ट करून सत्य, अहिंसा प्रेम, बंधुभाव, समता, व्यक्तिस्वातंत्र्य ह्यासारख्या उदात्त तत्त्वावर आधारलेल्या 'सर्वोदय समाजांत' त्याचे परिवर्तन करणें हे या दोघाही महानुभावांचे अंतिम ध्येय होते. हे ध्येय साधण्याकरतां त्यांनी हृदय परिवर्तन मार्गाचे अवलंबन केले होते. अशा समाजस्थापनेकरतां त्यांनी आजन्म आटोकाट प्रयत्न केले. महात्माजीच्या सर्वोदय समाजाची कल्पना सर्वांना माहीत आहेच. बसवेश्वरांनी स्थापलेला नवसमाजही 'सर्वोदय समाज' होता. बसवेश्वर समाजवादीं (Socialist) अथवा साम्यवादी (Communist) होते अशी काही लोकांची समजूत आहे. परंतु ती समजूत चुकीची आहे. बसवेश्वराचा नवसमाज धर्मावरच अधिष्ठित होता. त्यांत वर्ग विग्रहाला मुळीच स्थान नव्हते. उलट हृदय परिवर्तन मार्ग त्यांच्या सर्व कार्यक्रमाचा गाभा होता.

## कायकवे कैलास.

वसवेश्वरांचा 'कायकवे कैलास' हा मंत्र सुप्रसिद्ध आहे. समाजातील परावलंवनाची व 'भिक्षांदेही' वृत्ति नष्ट करून प्रत्येकाला उद्योगी व स्वावलंबी बनविणे हा त्यांचा आर्थिक कार्यक्रम होता. कोणीही, धर्मप्रचार करणाऱ्या जंगमानी सुद्धा, आपल्या उदरनिर्वाहा करतां समाजावर अवलंबून राहू नये व प्रत्येकानें कोणता तरी समाजपोषक धंदा करूनच आपलें जीवन चालवावे, असा त्यांच्या नव समाजाचा सक्त नियम होता. कोणत्याही समाज पोषक धंद्याला ते हीन मानीत नव्हते. तसेच प्रत्येकानें आपल्या जीवनापुर्तेच कमवावें व जास्तीची कमाई ईश्वराची देणगी आहे असे मानून त्याचा सार्वजनिक कार्याकरता उपयोग करावा असा त्यांचा आदेश होता. महात्माजीची उद्योगप्रियता तर सुप्रसिद्धच आहे. चरखा त्यांचे जीवन सर्वस्व वनले होते. कोणतीही गंभीर चर्चा चालली तरी ते चरखा चालवीतच चर्चा करीत. भंगी काम, जोडे शिवणें, सुतारकाम, कातणे विणणे, शिलाई, शेती वगैरे सर्व तऱ्हेचे धंदे त्यांनी केले. त्यांनी न केलेला असा कोणताच धंदा राहिला नाही. शारीरिक श्रमाला ते जास्ती महत्व देत होते. बौद्धिक काम करणाऱ्यांनी ही दररोज काही तरी शारीरिक श्रम केले पाहिजेत असा त्यांचा आदेश होता 'श्रम नाही तर जेवण नाही' ( No Labour no meal ) हा त्यांचा महामंत्र होता 'भिक्षांदेही' वृत्ति, मोफत अन्नसंतर्पणें, यांचा त्यांनी अत्यंत कडक शब्दात निषेध केला आहे.

" My Ahimsa should not tolerate the idea of giving a free meal to a healthy person who has not worked for it in some honest way, and if I had the power I would stop every Sadavart where free meals are given. It has degraded the nation and has encouraged laziness, idleness, hypocrisy and even crime. "

"ज्या निरोगी मनुष्यानें आपल्या भोजनाकरतां प्रामाणिक मार्गाने श्रम केले नाहींत अशा मनुष्याला मोफत जेवण देणे माझ्या अहिंसा तत्त्वात वसत नाहीं. माझ्या हाती जर अधिकार असेल तर मोफत जेवण घालणारी सर्व सदावर्ते मी बंद करीन. ह्यानें राष्ट्राची अधोगती झाली आहे. आळशीपणा, ढोंगीपणा व गुन्हेगारी यांना उत्तेजन मिळाले आहे." ह्या उद्‌गारावरून धर्माच्या नांवावर मोफत अन्नदान करण्याच्या पद्धतीचा त्यांना किती तिटकारा होता हे दिसून येते.

दोघेही क्रांतिवीर.

महात्माजी व बसवेश्वर खऱ्या अर्थांनें क्रांतिकारक वीर होते. धार्मिक, राजकीय, सामाजिक व आर्थिक क्षेत्रात त्यांनी घडवून आणलेली क्रांती असामान्य व अभूतपूर्व आहे. परंतु त्यांची ही क्रांति अहिंसा तत्वावर आधारलेली आहे. मानवी जीवनाच्या सर्व क्षेत्रांत ही क्रांती घडवून आणतांना त्यांनी अहिंसामार्ग कधीहीं सोडला नाहीं अथवा त्याला मुरड घातली नाहीं.

अंत्यकालची निराशा.

या शिवाय विनय, नम्रता, अपरिग्रहव्रत, प्रापंचिक असूनही ब्रह्मचर्यव्रत पालन वगैरे बाबतीतही या दोघा महानुभावामध्ये विलक्षण साम्य आढळून येते. परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यांच्या अंतकालीन परिस्थितीतही आश्चर्यकारक साम्य दिसून येते. त्या दोघानीही आपल्या जीवितकालात अपूर्व लोकप्रियता व कीर्ती संपादली होती. त्यांच्या अनुयायाची संख्याहीं अगणित होती. परंतु त्यांच्या तत्त्वांचे प्रामाणिकपणानें व एकनिष्ठेने पालन करणारे सच्चे अनुयायी फारच कमी होते. अहिंसा तत्त्वाच्या सत्त्वपरीक्षेच्या वेळी ते खुद्द स्तंभाप्रमाणें अविचलित राहिले तरी त्यांचे बहुतेक अनुयायी त्या सत्त्वपरीक्षेला टिकले नाहींत. विज्जल राजानें अन्यायानें व क्रूरपणानें मधुवय्या व हरळय्या ह्या शिवशरणांना ठार मारले तरी त्याच्यावर आपण सूड उगवू नये असा बसवेश्वरांनी आपल्या अनुयायास उपदेश केला, परंतु त्यांनी त्यांचा उपदेश मानला नाहीं. एवढेंच नव्हे तर उलट त्यांच्यावरच मिंधेपणाचा आरोप केला. त्यामुळे बसवेश्वर हताश होऊन व जगांतील आपलें जीवितकार्य संपले असे मानून ( साकु माडै तंदे लोकदाटविनु) देवा या जगातील तुझी ही लीला आता पुरी कर असे म्हणून आपले पूर्वाश्रम कूडलसंगमास गेले व तेथील आपले आराध्य दैवत संगमेश्वर लिंगात लीन झाले.

महात्माजीनाही अंत्यकाळीं हाच अनुभव आला. स्वातंत्र्य प्राप्तीनंतर त्यांच्या अनुयायातील अहिंसा तत्त्वाच्या निष्ठेला ओहोटी लागली. त्यांच्या काही प्रमुख अनुयायांनींच त्यांचा उपदेश व सल्ला मानण्याचे नाकारले. अशावेळी त्यांनी काढलेले निराशाजनक उद्गार मर्मभेदक आहेत.

" Who listens to me today ? ...... Everybody is eager to garland my Photoes and statues. Nobody really wants to follow

my advice, neither the people nor those in power have any use for me. – "

– Mahatma Gandhiji 1947.

आता माझे कोण ऐकतो? माझ्या फोटोना व पुतळ्यांना पुष्पहार घालण्यास प्रत्येकजण उत्सुक आहे. परंतु माझ्या उपदेशांप्रमाणें कोणीच वागत नाहीं. अधिकार–पदावर असलेल्यांना व लोकांनाही माझी गरज नाहीं.

महात्माजींचे हे अंतकाळचे उद्‌गार मर्मभेदक असले तरी उद्बोधक आहेत. सांप्रत आपण त्यांचा जन्मशताब्दि समारंभ साजरा करीत आहो. अशावेळीं आपण सर्वांनीं त्यांच्या उद्‌गाराचे नीट मनन करून योग्य तो बोध करून घेणें आपलें सर्वांचे कर्तव्य आहे.

लेखांक २४

# महाराष्ट्रीय आद्य शिवशरण श्री. उरिलिंग देव व श्री. उरिलिंग पेद्दी

(सन १९७० जानेवारी महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख)

**वीरशैव धर्म सुवर्णयुग व महाराष्ट्रीय शिवशरण.**

वीरशैव धर्माच्या इतिहासात बारावे शतक सुवर्णयुग म्हणून मानले जाते. त्या शतकात महात्मा बसवेश्वर, चन्नबसवेश्वर, प्रभुदेव, अक्क महादेवी, सिद्दराम शिवयोगी वगैरे प्रातःस्मरणीय परमपूज्य शिवशरणांचा उदय होऊन त्यांनी वीरशैव धर्माचा पुनरुद्धार केला, तसेच प्राचीन वीरशैव धर्माला सत्य, अहिंसा, समता, स्वातंत्र्य, बंधुभाव या सारख्या प्रगतीपर व उदात्त तत्त्वांवर आधारलेल्या विश्वधर्माचे स्वरूप देऊन त्यांनी त्या धर्मात सर्व जातींच्या व धर्मांच्या लोकांचा समावेश करून घेतला. त्यामुळे त्यांच्या काळी वीरशैव धर्माचा कर्नाटक, आंध्र व तामिळनाड ह्या प्रांतात मोठ्या प्रमाणांत प्रसार झाला. परंतु त्यांचे कार्यक्षेत्र बनलेले इतिहासप्रसिद्ध कल्याण नगर महाराष्ट्राच्या व कर्नाटकाच्या सीमेवर असले तरी इतर प्रांताप्रमाणें महाराष्ट्रात त्या धर्माचा विशेष प्रचार झाला

नाहीं, अशी आजपर्यंतची समजूत आहे. ही समजूत कांही अंशी खरी असली तरी सांप्रत महाराष्ट्र राज्यात समाविष्ट झालेल्या मराठवाड्यात बसवेश्वरकाळी सुद्धां कंदहारचे (कंधार) 'उरिलिंग देव' त्यांचे शिष्य 'उरिलिंग पेद्दी' व त्यांची धर्मपत्नी 'काळव्वे', कोलंव्वेचे 'कोलंव्वे', पंरळची 'वैजकव्वे' वगैरे शिवशरण व शिवशरणी उदयास येऊन त्यांनी त्याकाळीं त्या भागांत वीरशैव धर्माचा मोठ्या प्रमाणावर प्रचार केला होता. त्यांत 'उरिलिंग देव व उरिलिंग पेद्दी' हे प्रमुख असून त्यांचा उल्लेख सर्व जुन्या व नव्या प्रमुख कन्नड वीरशैव ग्रंथात आढळून येतो. ह्या शिवशरण द्वयांनी कन्नड भाषेत अत्यंत ज्ञानपूरित व उद्बोधक वचनेही रचली आहेत. ती बहुतेक सर्व वचनग्रंथात उध्दृत केली गेली आहेत. सोळाव्या शतकात होऊन गेलेल्या 'अदृश्य' नांवाच्या एक कन्नड सुप्रसिद्ध कवीनें बहुतेक सर्व शिवशरणाच्या चरित्रावर 'प्रौढदेवरायाचे काव्य' नांवाचा एक महान काव्य-ग्रंथ रचिला आहे. ह्या काव्यग्रंथात ह्या उभय शिवशरणाचे संक्षिप्त चरित्रही ग्रंथित केले गेले आहे. असें असले तरी महाराष्ट्रातील वीरशैवांना ह्यांची नांवे सुद्धा माहीत असल्याचे दिसून येत नाही, याचे सखेदाश्चर्य वाटते.

## उरिलिंग देवाचें चरित्र.

बसवकाळीं गोदावरीं नदी खोऱ्यातील हल्लीच्या मराठवाडा भागातील कंदहार अथवा कंधार गांवी (नांदेड जिल्हा) पंचाचार्य परंपरेतील एक आराध्यमठ होता. त्याकाळीं श्री उरिलिंग देव नांवाचे एक महाविद्वान व तपस्वी संत त्या मठाचे अधिपती होते. (कन्नड भाषेत उरिलिंग म्हणजे प्रकाशमय लिंग अथवा ज्योतिलिंग) कल्याण शहरी बसवेश्वरादि शिवशरणांनी प्रारंभिलेल्या नवधर्मजागृतीची व त्यांनी स्थापलेल्या शिवानुभव मंटपाची कीर्ति ऐकून साहजिकच त्यांचे मन तिकडे आकर्षिले गेले. त्यामुळें ते स्वतः कल्याणला जाऊन तेथील बसवादि शिवशरणांच्या आध्यामिक व पवित्र सहवासात काही काळ घालविला. तत्पूर्वी ते परंपरागत सांप्रदायिक मताचे असले तरी शिवशरणांच्या सहवासात आल्यानंतर त्यांच्या उदात्त तत्त्वांचा व धर्माचरणाचा त्यांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. त्यामुळे ते तेथून कंधारला परतल्यानंतर त्यांनी वीरशैवेत्तर धर्मीयामध्यें, विशेषतः हीन समजल्या जाणाऱ्या जातींच्या लोकामध्यें, नव्या व उदारमतवादी शिवशरण धर्माचा प्रचार करून त्यांना वीरशैव धर्माची दीक्षा देण्यास सुरुवात केली. त्यामुळें त्यांच्या कांहीं रूढीप्रिय अनुयायानी त्यांना विरोध केला. एकदा त्यांच्या मठाला आग लावून दिली. तरीसुद्धा त्यांच्या

विरोधाला व धमकावण्यांना भीक न घालतां त्यांनी आपले धर्मप्रचाराचें कार्य सतत चालू ठेवले. थोडयाच काळात त्यांच्या कार्याला भरपूर प्रसिद्धी मिळाली व अनेक लोक त्यांचे अनुयायी बनून त्यांच्याकडून वीरशैव धर्माची दीक्षा घेऊ लागले.

### अट्टल चोर अस्पृश्य पेद्दीचे हृदय परिवर्तन.

अशा दीक्षाकांक्षी अनुयायामध्यें सूरय्या या नांवाचा एक अनुयायी होता. कंधार पासून थोडयाच अंतरावर असलेल्या नंदवाडचा (सांप्रतचे नांदेड) तो रहिवासी होता. उरिलिंग देवानी आरंभिलेल्या धर्मप्रचाराचा त्याच्या मनावर परिणाम होऊन त्यानें त्यांना आपणासही दीक्षा देण्याची विनवणी केली व त्याला त्यांची अनुमती मिळवून व दीक्षा विधीचा मूहूर्त ठरवून त्याप्रमाणे दीक्षाविधीची सर्व तयारी केली. ठरल्यावेळी सायंकाळी उरिलिंग देव सूरय्याकडे आले. कर्मधर्म संयोगानें त्यांच्या आगमनाच्या थोडयाच वेळापूर्वी पेद्दी नांवाचा अस्पृश्य जातीचा एक अट्टल चोर चोरी करण्याच्या हेतूनें सूरय्याच्या घरांत शिरला व रात्री सर्व लोक निद्रावश झाल्यावर घरातील चीजवस्तू चोरून घेऊन जावें म्हणून घरातील माडीवर चढून तेथे लपून बसला. गुरूवर्य उरिलिंग देवाचे आगमन झाल्यानंतर सूरय्याने त्यांचे स्वागत करून त्यांना गद्दगीपीठावर बसवून त्यांची पादपूजा केली व त्यांना साष्टांग प्रणिपात करून दीक्षाविधीस प्रारंभ करण्याची विनंती केली. गुरूवर्यांनी सर्व शास्त्रोक्त विधीनें सूरय्यास दीक्षा देऊन शेवटीं त्याला मंत्रोपदेश केला. त्यानंतर त्याने गुरूस व तेथे जमलेल्या सर्व भक्तांस नमन करून त्यांना प्रसाद वाटल्यानंतर दीक्षा विधीचा सोहळा समाप्त झाला. परंतु हे सर्व घालले असतांना खाली काय गडबड चालली आहे ते जाणून घेण्याच्या इच्छेनें पेद्दी माडीच्या छोटयाशां शानीतून हे सर्व पहात राहिला होता गुरूवर्यांची गंभीर व शांत मूर्ती, सूरय्याचा व तेंथे जमलेल्या भक्तांचा भक्तिभाव आणि त्याने पूर्वी कधीही न पाहिलेला असा असामान्य व पवित्र दीक्षाविधी सोहळा, या सर्वांचा त्याच्या मनावर विलक्षण परिणाम होऊन तेथेंच त्याचे हृदयपरिवर्तन घडून आले. तत्क्षणीं त्याला आपल्या पापी दुष्ट कृतकर्माचा पश्चात्ताप होऊन आपणही यापुढें सदाचारानें वागून व याचप्रमाणे गुरूकडून दीक्षा घेऊन आपले सर्व आयुष्य सरळ धर्माचरणात व्यतीत करण्याचे त्यानें ठरविले. लपलेल्या घरात सर्व सामसूम झाल्यावर तो घराबाहेर पडून गेला. हा पेद्दीही पोट भरण्याकरता म्हणून कंधारला येऊन राहिला होता.

**गुरुलिंग देवानी पेद्दीला दिलेली विक्षिप्त दीक्षा.**

या घटनेनंतर त्याने चौर्यकर्म सोडून दिले. मोलमजूरी करून तो उदरनिर्वाह करूं लागला. गुरूकडून दीक्षा घेण्याची त्याला विलक्षण तळमळ लागलेली होती. परंतु दीक्षा घेण्यापूर्वी गुरूची काहीतरी सेवा करणे जरूर आहे हे जाणून तो दररोज लाकडाची एक मोळी आणून उरिलिंग देवाच्या मठात ठेवू लागला. आपल्या मठात ही मोळी कोण ठेवतो हे उरिलिंग देवाना न कळल्यामुळे त्यांनी एक दिवस पाळत ठेवून पेद्दीला मोळी आणून ठेवतांना पकडले. आपण ही मोळी मोफत घेणार नाही करितां त्याचा दाम घे असे त्यानी त्याला सांगितलें. परंतु पेद्दीने दाम घेण्याचे नाकारून सूरय्याला दिल्याप्रमाणें आपणालाही दीक्षा द्यावी अशी त्यांना विनंती केली. हे त्याचे उद्‌गार ऐकून उरिलिंग देवांना आश्चर्य वाटले. सूरय्याला दीक्षा दिल्याचे त्याला कसे कळले म्हणून पृच्छा केली. तेव्हा पेद्दीने आपला सर्व गतेतिहास काहीही न लपवून ठेवतां त्यांना विदित केला. दीक्षाविधीच्या वेळी आपण पाहिलेली सर्व घटना साद्यंत सांगितली व तेव्हापासून आपण चौर्यकर्माचा त्याग करून कसे सदाचाराने वागत आहो हे ही सांगून आपणासही तशी दीक्षा देण्याचा आग्रह करू लागला. परंतु त्याला खरोखरच पश्चात्ताप झाला आहे की नाही, तसेच सदाचारानें वागून दीक्षा स्वीकारण्याची पात्रता त्याच्या अंगी प्राप्त झाली आहे की नाही याची परीक्षा केल्याशिवाय त्याला दीक्षा देणे योग्य होणार नाही असा विचार करून, परंतु त्याला तसे न कळवितां शिवदीक्षा देण्यास शिवाची आज्ञा झाली पाहिजे, तशी आज्ञा मिळाल्यास मी तुला दीक्षा देईन असें सांगून त्याची त्यांनी रवानगी केली. पेद्दीने त्यांच्या शद्बावर विश्वास ठेवून दररोज त्यांच्या मठांत मोळी घालून व त्यांना भेटून शिवाची आज्ञा झाली असल्यास आपणास दीक्षा द्यावी म्हणून आग्रह करू लागला. या प्रमाणे काही दिवस गेल्यानंतर एके दिवशी उरिलिंग बाहेर जात असतांना पेद्दी त्यांच्या मागोमाग जाऊन दीक्षेविषयी आग्रह करू लागला. सरतेशेवटी उरिलिंग देवानी कृत्रिम रोषानें त्याच्यावर रागावून व एक लहानसा गोलाकार दगड उचलून 'तुला देव पाहिजे ना! घे हा देव, जा घरी शिव शिव म्हणत, म्हणून तो धोंडा त्याच्या अंगावर फेकला. आपल्यावर गुरूची ही कृपाच झाली असें मानून पेद्दीनें आनंदानें ता धोंडा उचलला व घरीं जाऊन त्यालाच गुरूने दिलेले इष्ट लिंग मानून नितांत श्रद्धेनें व भक्तीभावाने तो त्याचा पूजाअर्चा करू लागला. तोंडानें 'शिव शिव' म्हणत ह्मच गुरूने दिलेला मंत्र समजून एकाग्रतेनें त्या मंत्राचे सतत पठण, मनन करण्यास त्यानें सुरवात केली. तसेंच नित्य नेमानें गुरूच्या मठात जाऊन तेथे चालत असलेल्या धर्मचर्चेत ही तो भाग घेऊ लागला. उदर निर्वाहाकरता काही काळ मोल मजूरी करणें व

उरलेला सर्ववेळ इष्ट लिंग पूजा, गुरूसेवा, व धर्मचर्चा यांत व्यतीत करणें हा पेद्दीचा नित्यांचा कार्यक्रमच झाला. या प्रमाणं सदाचाराने वागून अनन्य भक्तिभावानें व संपूर्ण श्रद्धेनें इष्टलिंग पूजा व गुरूसेवा करीत गेल्यामुळे उत्तरोत्तर त्याची आध्यात्मिक प्रगति होत गेली. उरिलिंग देवांनाही त्याचें महत्त्व कळून आले. काही काळानंतर त्यांनी त्याला कल्याणला जाण्याचा आदेश दिला. त्याप्रमाणे तो कल्याणला जाऊन काही काळ तेथील शिवशरणांच्या सहवासात घालवून परत कंधारला आला. गुरूप्रमाणें शिष्याच्या मनावरही कल्याणातील आध्यात्मिक पवित्र वातावरणाचा परिणाम झाला. त्यानंतर तो वरचेवर कल्याणास जाऊन शिवशरणांच्या सहवासांत राहू लागला. कालांतरानें पेद्दी एक आदर्श शिवशरण म्हणून त्याची ख्याती चोहोकडे पसरली.

पेद्दीच्या आध्यात्मिक शक्तीची परीक्षा.

याप्रमाणे गुरूशिष्य दोघेही इष्ट लिंगपूजा, अध्यात्मचर्चा, धर्मप्रचार यांत काळ घालवीत असतांना दैवयोगानें कंधार येथें एक अकल्पित घटना घडून आली. त्यामुळे पेद्दीच्या भक्तीत जास्तीच भर पडली. त्या काळी कंधार येथे नंदराज नांवाचा एक राजा राज्य करीत होता. त्यानें तेथे आपल्या प्रजाजनाकरता एक मोठा तलाव बांधण्याचे ठरवून तळें खोदविण्याच्या कामास प्रारंभ केला. तलाव खोदत असतांना तेथे एक मोठा अखंड पाषाण लागला. तो पाषाण फोडून काढल्यास तेथे भरपूर पाणी मिळेल असे जलसंशोधकांनी सांगितल्यामुळें सर्व बाजूनी तो पाषाण फोडून काढण्याकरतां आटोकाट प्रयत्न केले. परंतु त्यांच्या प्रहारांचा त्या पाषाणावर काहीच परिणाम होईना. राजा हताश होऊन व शेवटचा उपाय म्हणून त्यानें उरिलिंग देवाकडे धाव घेतली व ह्या कामी आपणास मदत करावी अशी त्याना विनंती केली. उरिलिंग देवांना पेद्दीच्या आध्यात्मिक शक्तीचे आकलन झाले असल्यामुळे व लोकांना त्याचा महिमा पटवावा ह्या उद्देशानें ह्या कामीं राजास मदत करण्यास पेद्दीस आज्ञा केली. त्याप्रमाणें पेद्दी तळयाच्या स्थळी जाऊन आपले इष्टलिंग तळहातावर ठेंवून 'शिव जा, धोंडा उचल'! असा मंत्र जपला त्या बरोबर ते इष्टलिंग जाऊन पाषाणावर घट्ट बसले. व त्या प्रचंड पाषाणाला उचलून बाजूला टाकून तें त्याचे इष्टलिंग पुनः त्याच्या तळहातावर येऊन बसले. पाषाण उचलल्याबरोबर खालून पाण्याचा एक मोठा लोंढाच उफाळून वर आला. त्यामुळे सर्व तळे पाण्याने भरून गेले. हा दैवी चमत्कार पाहून राजा व तेथे जमलेले लोक आनंदाश्चर्यानें बेहोष होऊन त्यांनी पेद्दीच्या नांवानें जयजयकार केला. राजानेही पेद्दीचा व त्याच्या गुरूचा मानसन्मान करून

त्यांना आपली कृतज्ञता अर्पण केली. ही वार्ता तात्काळ चोहोकडे पसरली व त्यामुळे दोघेही गुरूशिष्य श्रेष्ठ दर्जाचे साक्षात्कारी शिवशरण म्हणून त्यांची ख्यांती झाली.

**अट्टल चोर अस्पृश्य पेद्दी आचार्य बनून मठाधिपती झाला.**

प्रसिद्ध दरवडेखोर वाल्याकोळी हृदय परिवर्तनानें वाल्मिकी बनला व त्यानें रामायण सारखा महान काव्यग्रंथ रचला. अस्पृश्य पेद्दीच्या बाबतीतही तंतोतंत अशीच घटना घडली. पेद्दीचे हृदय परिवर्तन होऊन तो गुरूच्या सहवासात काळ घालवूं लागल्यावर त्यानें कन्नड व संस्कृत भाषेच्या अध्ययनास सुरवात केली व थोड्याच काळात त्या दोन्ही भाषांवर प्रभुत्व मिळविले. तसेच वेदागमोपनिषदें व पुराणें वगैरे सर्व धर्मग्रंथाचेही पठन मनन करून सर्व धर्मशास्त्रात पारंगतता संपादन केली. यात मुळींच अतिशयोक्ती नसून त्याची सत्यता त्याने रचलेल्या विद्वत्तापूर्ण व अध्यात्मज्ञानपूरित कन्नड वचनावरून कळून येते. ह्या वचनामध्यें त्याने अनेक ठिकाणी वेदागमोपनिषदातील व पुराणातील अवतरणिके उद्धृत केली आहेत. त्यानें रचलेली वचनें आध्यात्मिक ज्ञान व साहित्य या दोन्ही दृष्टींनें श्रेष्ठ दर्जाची असल्यामुळें तीं वीरशैव धर्माचे प्रमाणग्रंथ 'शून्य संपादने' 'गणभाषित रत्नमाले' 'लिंग लीला विलास चरित्र' यात उद्धृत केलीं गेली आहेत.

आधुनिक काळात वचन पितामह कै, डॉ. फ. गु. हळकट्टी यांनी त्याच्या सर्व वचनांचे संशोधन करून ती प्रकट केली आहेत. तसेच श्री रंगराव दिवाकर यांनी रचलेला वचनशास्त्राचा प्रमाणग्रंथ 'वचन शास्त्र रहस्य' यातही त्याची नऊ निवडक वचने निवेदली गेली आहेत. त्याचप्रमाणे बहुतेक सर्व प्राचीन व अर्वाचीन वीरशैव काव्यपुराणात पेद्दीचा उल्लेख गौरवाने केला गेला आहे. वीरशैव धर्माच्या निवडक शिवशरणांची नांवे '७७० अमरगण' व 'गणसहस्त्रनामावळीं' यात नमूद केली गेली आहेत. त्यामध्येही उरिलिंग पेद्दीचा उल्लेख केला गेला आहे. यावरून पाहतां व उरिलिंग देव व उरिलिंग पेद्दी यांनी मराठवाड्यातच धर्मप्रचार केला होता ही गोष्ट लक्षात घेतली तर त्यांनी मराठी भाषेत ही वचने अथवा अभंग रचले असले पाहिजेत. परंतु दुर्दैवानें तीं सर्व वचने सर्वभक्षक कालगर्भांत दडून गेली असली पाहिजेत.

वरील विवेचनावरून निरक्षर पेद्दीनें थोड्याच काळात निती गाढ विद्वत्ता

संपादन केली हे कळून येते त्याची ही विद्वत्ता व आध्यात्मिक उन्नती पाहून त्याचे गुरू उरिलिंग देव त्याच्यावर खूष झाले व आपण निवृत्त होऊन आपल्या स्थानी त्याला मठाधिपति म्हणून नेमण्याचा त्यांनी निश्चय केला. त्याप्रमाणें त्यांनी पेद्दीस शास्त्रोक्त दीक्षा देऊन त्याला 'उरिलिंग पेद्दी' असे नामकरण केले व त्याला मठाधीपतीचे सर्व अधिकार सुपूर्द केले. त्यांचे हे कृत्य अत्यंत धाडसाचे व क्रांतिकारक होते यात संशय नाहीं. श्री पंचाचार्य परंपरेतील मठाचे अधिपती वीरशैव समाजाच्या माहेश्वर (जंगम) पंथातील बालब्रह्मचारीच असले पाहिजेत अशी प्रथा प्राचीन काळापासून चालत आली आहे. सांप्रतच्या उदार मतवादी व प्रगतीपर काळातही ही प्रथा अखंडपणे चालू आहे. असे असतांना बाराव्या शतकासारख्या परंपरागत रूढीनी जखडले गेलेल्या काळात त्यांनी पेद्दीं सारख्या एका अस्पृश्य व विवाहित माणसाला आपल्या मठाचा अधिपती नेमले ही गोष्ट नुसत्या वीरशैव धर्माच्या इतिहासात नव्हे तर जगाच्या धार्मिक इतिहासातही एक अनन्य साधारण व उल्लेखनीय घटना आहे. बसवकाळी शिवशरणांनी ब्राह्मण मधुवय्याच्या मुलीचे चांभार हरळय्याच्या मुलाशी घडवून आणलेला ब्राह्मण अस्पृश्य विवाह त्यांच्या सामाजिक क्रांतीचे उदाहरण म्हणून आपण अभिमानानें व गौरवाने उल्लेख करतो. परंतु उरिलिंग देवाचे हे कृत्य त्याच्या पेक्षाही क्रांतिकारक व वीरशैव धर्माला भूषणावह आहे यात संशय नाही.

उरिलिंग पेद्दी मठाधिपती झाल्यानंतर त्यानेही आपल्या गुरूचे धर्मप्रचाराचे कार्य अखंडपणे पुढे चालविले व त्या प्रदेशांत वीरशैव धर्माचा मोठ्या प्रमाणावर प्रसार केला. त्याचे कल्याणला जाणेयेणेंही जास्त वाढलें व तो तेथें शिवशरणांच्या सहवासात जास्ती काळ घालवू लागला तेथे ही त्याची ख्याती वाढली. तेथील प्रमुख शिवशरणामध्ये त्याची गणना होऊ लागली. त्यानें आपले अखेरचे दिवस तेथेंच घालविले व अंतकाळीं तेथेच लिंगैक्य झाला. त्याची समाधी बसव कल्याणला आहे असे कळते.

गुरुशिष्य परंपरा.

या प्रमाणें उरिलिंग देव व उरिलिंग पेद्दी श्रेष्ठ शिवशरण होऊन गेलें, एवढेच नव्हे तर त्यांच्या गुरूशिष्य परंपरेत उरिलिंग पेद्दीचा शिष्य विश्वेश्वर पेद्दी, त्यानंतर सदाशिव देव, काळीदास भट्ट, सर्वेश्वर देव, प्राणिमी देव, ईशान्य देव, चन्नीदेव, वंकनाथ देव, जक्कण्णा वगैरे विद्वान शिवशरण होऊन गेले. जक्कण्णा

पंधराव्या शतकात होऊन गेलेले विजयनगर साम्राज्याचे वीरशैव सम्राट प्रौढदेवराय याचा प्रधान व मुख्य सल्लागार होता. सांप्रत या परंपरेतील मठ बसवकल्याण, कोरळी, बेविनचिचोळी व भाल्की येथे असून या मठांच्या भक्तात हरिजनांचाच जास्ती भरणा आहे असे कळते.

## उरिलिंग पेद्दीची पत्नी शिवशरणी 'काळव्वे'

उरिलिंग पेद्दी विवाहित होता. त्याच्या धर्मपत्नीचे नांव 'काळव्वे'. ही सुद्धा सदाचारी व सात्विक प्रवृत्तीची होती. पतीचे हृदयपरिवर्तन होऊन तो धर्माचरणाने वागू लागल्यावर तीही त्याच्यावरोबर आनंदानें धर्माचरणात भाग घेऊ लागली. पेद्दी बरोबर तीही गुरूच्या मठास जाऊन तेथे गुरू सेवेत व इतर धर्मकार्यात मग्न होऊन राहू लागली. पतींबरोबर तिनेही कन्नड भाषेचा व धर्मशास्त्राचा अभ्यास केला. व कन्नड भाषेत वचनेही रचली. त्यापैकीं कांहीं आता उपलब्ध आहेत. उरिलिंग पेद्दीनें मठाधिपतीपद स्वीकारल्यानंतर तिने वैराग्यव्रत स्वीकारले व ती धर्माचरणात व धर्मप्रचारात काळ घालवूं लागली. उरिलिंग पेद्दी बरोबर तीही कल्याणला जात येत असे. याप्रमाणे काळव्वे पतीला अनुरूप सती होऊन त्याच्या सर्व धर्मकार्यात सहभागी झाली होती. तिच्या ह्या आदर्श जीवनामुळें तिलाही प्रमुख शिवशरणीच्या मालिकेत स्थान मिळाले आहे.

## लेखांक २५

# वीरशैव ( लिंगायत ) धर्म अवैदिक कीं वैदिक ?

( सन १९७० सप्टेंबर महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख )

( अखिल भारत वीरशैव संघाचे अध्यक्ष व ज्ञानप्रसाद मासिकाचे एक संपादक आणि मुंबई व म्हैसूर राज्याचे माजी मंत्री माननीय श्री. म. पु. पाटील यांनी पुण्याच्या ऑगस्ट महिन्याच्या शिवदैवत विशेषांकातील पा. २५ ते ३० मधील "महाराष्ट्रातील शिवसंप्रदाय व नाथपंथाचा विस्तार" या शीर्षकावरील प्रा. मधुकर रामदास जोशी यांच्या लेखातील पान २८ व २९ वरील काहीं आक्षेपार्ह व अप्रस्तुत मजकूराला खुलासा म्हणून हा लेख लिहिलेला असून प्रा. जोशी यांचा आक्षेपार्ह मजकूर प्रथम देऊन त्याच्या पुढेंच श्री. पाटील साहेबांचा खुलासावजा लेख येथे देत आहोत.

ज्ञानप्रसादाच्या आमच्या वाचकांनी विशेषतः महाराष्ट्रीय वीरशैव कार्यकर्त्यांनी व साहित्यिकानी पुण्याच्या प्रसाद अंकांतील वीरशैव धर्म व रेवणसिद्ध आणि अलंप्रभू यांच्या संबंधी केल्या गेलेल्या खोटया व निराधार विधानांची चूक अनेक उतारे देऊन साधार खंडन करणारा श्री. म. पु. पाटील यांचा 'वीरशैव धर्म अवैदिक की वैदिक ? हा लेख अवश्य वाचून काढावा. वीरशैव धर्म व त्यांचे साधुसंत यांच्यावद्दल असली असत्य व शास्त्ररहित विधानें व उल्लेख महाराष्ट्रातील

काही वृतपत्रांत मासिकात व ग्रंथात केली गेलेलीं व सांप्रतसुद्धा प्रसिद्ध केली जात असलेली आढळून येतात. त्याकरता वीरशैव वाचकांनी, लेखकांनी व कार्यकर्त्यांनी सतत जागृत राहून असली काही टीकात्मक विधाने अथवा उल्लेख त्यांच्या वाचनात आढळून आल्यास तीं आम्हाला त्वरित कळवावीत व त्यांची कात्रणें अवश्य पाठवावीत. तसे केल्यास त्यावद्दल आम्ही योग्य ती उपाय योजना करू.

— संपादक )

आक्षेपार्ह मजकूर—गोरक्षनाथाच्या भ्रमणानंतर.

महाराष्ट्रातील गोरक्षनाथाच्या भ्रमणानंतर लौकरच त्याच्या सिद्ध सिद्धान्त पद्धती ग्रंथाची रचना झाली असावी. कारण त्यांत महाराष्ट्रांमधील दोन शैवमतांचा संदर्भ व त्यानी केलेलें त्यांचे खंडन आहे. गोरक्षाच्या सिद्ध सिद्धान्त पद्धतीला नाथपंथात प्रमाणभूत ग्रंथ समजतात. ग्रंथांचे सहा उपदेश (प्रकरणें) असून भाषा संस्कृत आहे. सहा उपदेशांत ज्या दोन शैवमतांचे खंडन केले आहे ती शैवमते म्हणजे १) वीरशैव २) कालमुख होय.

वीरशैव मताचे गोरक्षांनी प्रथम लक्षण दिले आहे.

विलयं सर्व तत्त्वानां कृत्वा संधार्यते स्थिरम् !
सर्वदा येन वीरेण लिंगधारी भवेत्तु स: ॥४४॥ ( डॉ. मलिक प्रत )

यानंतर 'परपक्षं निरास : करोति'
सौरा वीरपरा प्रपंच निरता बौद्धा जिना श्रावका :
एते कष्टरता वृथापथगता : सत्तत्त्वतो वंचिता :
तस्मात्सिद्धमतं स्वभाव समयं धीर : सदा संश्रयेत् ॥
( – डॉ. मलिक प्रत )

या श्लोकातील ' वीरपरा ' संज्ञेनें गोरक्षाना वीरशैव मत अभिप्रेत आहे. डॉ. मलिक यांनी तंजावर प्रतीमधील जो श्लोक तळटीपेत दिला आहे त्यात सुद्धा

शैवा : पाशुपता महाव्रतधरा : कालामुखा जंगमा,
शाक्ता : कौल कुलां कुलार्चनरता : कापालिका : शांभवा
एते कृत्रिम मंत्रतंत्र निरतास्ते तत्त्वतो वंचिता :
तस्मात्सिद्धमतं स्वभाव समयं धीर : सदा संश्रयेत् ॥

गोरक्षांनी खंडित केलेल्या वीरशैव मताचे उगमस्थान कर्नाटक आहे. त्या काळात कल्याणीच्या उत्तर चालुक्यांची राजवट चालू होती. चालुक्यांनी शैवमतांना उदार आश्रय दिला होता. त्यानंतर कलचुरी घराण्यातील बिज्जल देवाच्या वेळी वीरशैव मताचे प्रवर्तन बसवांनी केलें. बसवांचा समय शके १०६७–८९ दरम्यानचा आहे. गोरक्षाच्या भ्रमणकाळीं वीरशैव मताचा प्रभाव उस्मानाबाद – सोलापूर भागावर होता. वीरशैवाचे गोरक्षाशी वादविवाद या भागात झाले. गोरक्षांनी या मताचे खंडन केल्यामुळें अनेक वीरशैव नाथपंथात आले. यापैकी अल्लंप्रभु व रेवणसिद्ध प्रमुख आहेत. अल्लंप्रभु पूर्वी लकुलोश शैव होते. त्यांचा मच्छींद्रनाथाशी संबंध होता. लकुलीश, कालमुख व वीरशैव ही शैवमते त्या काळात होती. अलंप्रभु मत्स्येंद्रनाथांचा शिष्य मानल्यास तो गोरक्ष चौरंगी समयी होता असे दिसून येईल. नाथपंथीय हटयोगप्रदीपिकेत अलंप्रभूचे नांव आहे. माझे असे अनुमान आहे की अल्लंप्रभु हे लकुलीश वीरशैवाकडून गोरक्षनाथामुळें नाथपंथाकडे आले. रेवणसिद्धांचे वास्तव्य सोलापूर भागांत होते. नवनाथ यादीत रेवणसिद्धांचे नांव त्यांचे नाथपंथत्त्व सिद्ध करते. विशेष लक्षणीय म्हणजे महाराष्ट्रात रूढ असलेल्या नवनाथ गणनेच्या सांप्रदायिक श्लोकात रेवणसिद्धांचे नाव आहे. गोरक्ष रेवणसिद्ध अशी गुरूशिष्यांची जोडी प्रसिद्ध आहे. वीरशैव मताचा उगम कलचुरीच्या वेळी झाल्यामुळें उत्तर भारतात हे मत नव्हते. गोरक्षाना या मताचा परिचय महाराष्ट्रातच प्रथम शके १०६०–७० दरम्यान झाल्यामुळें त्याचा समावेश त्यांनी आपल्या ग्रंथात केला.

**गोरक्षकृत कालमुखाचे खंडण –**

गोरक्षांनी खंडित केलेले दुसरे शैव मत कालमुख आहे. कालमुख मताचे पुढील प्रमाणें लक्षण गोरक्ष नाथांनी दिले –

> परानंदमयं लिंग निजपीठे सदाचले ।
> तल्लिगं पूजितं येन स वैं कालमूखो भवेंत् ।।

वीरशैवा प्रमाणेंच हे ही मत 'एते कृत्रिम मंत्र तंत्र निरतास्ते तत्त्वतो वंचिता' आहे. असे गोरक्ष म्हणतात. वास्तविक गोरक्षांनी उल्लेखिलेली पाशुपत, कालमुख, वीरशैव दर्शने अवैदिक आहेत. त्यांचा क्रम पाशुपत – लकुलीश – कालमुख वीरशैव असा आहे.

मध्यभारत, सौराष्ट्र, म्हैसूर व महाराष्ट्रांत याचे निर्देश शिलालेखातून आले

आहेत. महाराष्ट्रात आर्धापूर, नांदेड, वणेशवाडी या भागात कालमुख आचार्यांचे उल्लेख तेथील शिलालेखात आहेत.

**श्री. म. पु. पाटील यांचा खुलासा. –**

धार्मिक विषयावर लिहिणारे काही महाराष्ट्रीय वीरशैवेतर लेखक वीरशैव (लिंगायत) धर्म अवैदिक आहे, अशी विधाने करतात; परंतु त्यांचा हा अभिप्राय अज्ञान मूलक आहे. वीरशैव धर्माचे तत्त्वज्ञान व इतर धार्मिक साहित्य याचा अभ्यास केल्यास वीरशैव ( लिंगायत ) धर्म वैदिकच आहे असे आढळून येईल. परंतु उपरिनिर्दिष्ट लेखक या धर्मासंबंधी काही अभ्यास न करतां हा धर्म अवैदिक आहे असे ठोकून देतात ही अत्यंत खेदाची गोष्ट आहे. या धर्मासंबंधी खाली दिलेल्या विश्वसनीय आधारावरून हा धर्म वैदिकच आहे याची खात्री होईल. तसेच वीरशैव व लिंगायत हे निराळे पंथ नाहींत. वीरशैव पंथालाच लिंगायत हे दुसरे नांव आहे.

**वीरशैव धर्माचा आधारग्रंथ ' सिद्धान्त शिखामणि '.**

वीरशैव धर्म साहित्यात ' सिद्धान्त शिखामणि ' हा संस्कृत ग्रंथ या धर्मांचा आधारग्रंथ म्हणून मानला जातो. हा ग्रंथ शिवयोगी शिवाचार्य नांवाच्या आचार्यानें रचला आहे. सुप्रसिद्ध ज. रेणुकाचार्य व अगस्तिऋषी यांच्या संवादरूपानें वीरशैव धर्माचे तत्त्वज्ञान व धर्माचार यांचा या ग्रंथात सांगोपांग विचार केला गेला आहे. या ग्रंथात नमूद केलेल्या आचारविचारात कोठेही अवैदिक असें आचारविचार आढळून येत नाहीत. एवढेच नव्हे तर ह्या ग्रंथाच्या शेवटीं ग्रंथकर्त्यानें आपला हा ग्रंथ वेदागमप्रणीत वीरशैव तत्त्वप्रणालीचा ग्रंथ आहे असे लिहिले आहे. ( श्री वेदागम वीरशैव सरणिम् श्री सिद्धांत शिखामणिम् – परिच्छेद २१ श्लोक ५१ ) तसेच भगवान् शंकरांनी श्री रेणुकागणाधीश्वराला भूलोकी अवतार धारण करून वीरशैव धर्माचा प्रचार करण्याविषयीं आज्ञा केल्याचा एक अवतारात्मक व पौराणिक उल्लेख या ग्रंथात आहे. त्यात या धर्माला ' वेदवेदान्तसंमत ' धर्म असे संबोधले असून त्या धर्माचा प्रचार वेदमार्गाला अनुसरूनच करावा अशी आज्ञा केली आहे. ( मदद्वैतपरं शास्त्रं वेदवेदान्तसंमतं । स्थापयिष्यामि भूलोके सर्वेषां हितकारकं । मम प्रतापमतुलं मद्भक्तानाम विशेषत:। प्रकाशय महीभागे वेदमार्गानुसारत:।। परिच्छेद ३ श्लो. ७०,७१ ) या शिवायही ' वेदमार्ग अविरोधेन ' ( परिच्छेद १ श्लो. २६ ) वगैरे असे कितीतरी उल्लेख या ग्रंथात आढळतात.

याच्या करून वीरशैव धर्माचा हा आधार ग्रंथ वेद विरोधी नाही ही गोष्ट स्पष्ट आहे.

**वैदिक पाशुपत पंथ.**

महाभारतकाळीं शिवलिंगपूजकांचा पाशुपत पंथ असा एकच पंथ होता. (महाभारत शांति २४९). परंतु पुढे ख्रिस्तिशकाच्या प्रारंभा पासून तेराव्या शतका पर्यंत त्या पंथात लकुलीश – पाशुपत, काळमुख, जंगम, वीरशैव, कापालिक, नाथपंथ ( सिद्धमत ), सौरमत, महाव्रतधारी, काश्मीर शैव, शैव सिद्धान्त, वगैरे अनेक उपपंथ, निर्माण झाले. त्यापैकी काही वैदिक, काही अवैदिक, काही मिश्र असे होते. या सर्व पंथाचे वर्गीकरण लिंग पुराणातील खालील श्लोकांत केले गेल आहे.

तांत्रिकं वैदिकं मिश्रं त्रिधा पाशुपतं शुभम् ।
तप्त लिंगांक शूलादि धारणं तांत्रिकं मतम् ।
लिंग रुद्राक्षिभस्मादि धारणं वैदिकं भवेत्
रविं शंभुं तथा शक्ति विघ्नेशंच जनार्दनम् ॥
यजंति समभावेन मिश्रं पाशुपतं हि तत् ।

अंगावर लिंग धारण करणें, सर्वांगाला निदान कपाळावर तरी त्रिपुंड्र भस्म लावणे व गळचात अथवा बाहूवर रूद्राक्षि माळा धारण करणें हे वीरशैव धर्माचे प्रमुख धर्माचार आहेत. सांप्रत सुद्धा कोणताहीं इसम या लक्षणावरूनच वीरशैव धर्मीय असा ओळखला जातो. तसेच वीरशैव धर्माचा मोक्ष ( शिवजीवैक्य अथवा लिंगांग-सामरस्य ) साधन मार्ग षट्स्थल, अष्टावरण व पंचाचार यांत समाविष्ट झाला आहे. हे अष्टावरण अथवा आठ आचार १) गुरू २) लिंग ३) जंगम ४) पादोदक ५) प्रसाद ६) भस्म ७) रूद्राक्षि व ८) मंत्र असे असून वरील श्लोकातील तीनही आचारांचा यांत समावेश झाला आहे. ह्या सर्वांचे विवरण वाचल्यास हा मार्ग शुद्ध व सात्विक भक्तिमार्ग असून त्यांत तांत्रिक मार्गाचा गंधसुद्धा नाही, असे आढळून येईल. एवढेच नव्हे तर वरील व्याख्येप्रमाणें पाहिल्यास सांप्रत तरी वीरशैव धर्मांशिवाय व नाथपंथासहित दुसरे सर्व शैव पंथ अवैदिकच आहेत असे म्हणावे लागेल. कारण वीरशैव पंथीयाशिवाय दुसऱ्या कोणत्याही शैवपंथाचे अनुयायी अंगावर लिंग धारण करीत नाहीत.

## वीरशैव वचन वाङ्मय.

बाराव्या शतकात श्री बसवेश्वरादि शिवशरणांनी भक्तिमार्गीय वीरशैव धर्मांचा प्रचार केला. त्यावेळी त्यांनी वीरशैव धर्मांचें तत्त्वज्ञान व आचारविचार याबद्दल कन्नड भाषेत विपुल वचने रचली आहेत. ही सर्व वचने 'वचन वाङ्मय' नांवानें प्रसिद्ध आहेत. ख्यातनाम विद्वान व तत्त्वज्ञानी दि. गुरूवर्य रानडे व अ. भा. गांधी स्मारक निधीचे अध्यक्ष मान्यवर श्री. आर. आर. दिवाकर यांनी या वचन वाङ्मयाचा अभ्यास करून हे वीरशैव धर्माचे उपनिषद वाङ्मय आहे असे प्रशंसोद्गार काढले आहेत. दि. श्रीनिवासमूर्ती यांनीही 'हे वचन वाङ्मय वाचतांना मी जसे काही प्राचीन औपनिषदिक वातावरणातच वावरत आहे असा भास झाला,' असें लिहिले आहे. कन्नड जाणणाऱ्या इतर काही वीरशैवेतर विद्वानानीही या वाङ्मयाबद्दल असेच गौरवपूर्ण उद्गार काढले आहेत. याच्या वरून वीरशैव धर्माच्या तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने सुद्धा वीरशैवधर्म अवैदिक आहे असे म्हणता येणार नाही. विशेषतः श्वेताश्वेतर उपनिषदात प्रतिपादलेले तत्त्वज्ञान व यांत संपूर्ण साम्य आहे. यासंबंधी लिहितांना मान्यवर दिवाकरानी 'वीरशैव पंथाची अध्यात्मविचारधारा व सामाजिक क्रांतीचे कार्य ही केवळ महाराष्ट्राच्या दृष्टीनेच नव्हे तर भारताच्या दृष्टीनें व समाज शास्त्राच्या दृष्टीनेही महत्वाची व अभ्यासार्ह आहेत,' असे प्रशंसोद्गार काढले आहेत. (लीला विश्वभर–पुरस्कार पा. ८). दुर्दैवाने बहुतेक मराठी लेखकांना कन्नडभाषा समजत नाही. त्यामुळें त्यांना कन्नड वाङ्मयाचा परिचय नाही. नाहीतर त्यांनी वीरशैव धर्म अवैदिक आहे अशीं विधानें केली नसती. अर्थात् शिवशरणांनी आपल्या वचनात यज्ञयागादि वेदोक्त कर्मकांडाचा निषेध केला आहे. परंतु उपनिषदे व भगवद्गीता यामध्येही यज्ञयागाचा निषेध केला गेला आहे. एवढ्यावरूनच हे श्रेष्ठ धर्मग्रंथ अवैदिक आहेत असे कोणी म्हणत नाहीं आणि म्हटल्यास तें चुकीचे ठरेल.

## प्रसाद मासिकाच्या शिव दैवत अंकातील निराधार उल्लेख.

ह्या आगष्ट महिन्यात प्रकाशित झालेल्या पुण्याच्या प्रसाद मासिकाच्या 'शिवदैवत' अंकात प्रा. मधुकर रामदास जोशी याचा 'महाराष्ट्रातील शैवसप्रदाय व नाथपंथाचा विस्तार' नांवाचा लेख प्रसिद्ध झाला आहे. (पान २५-३०) त्यांत वीरशैव, जंगम, काळमुख पंथ व वीरशैव धर्मांचे सुप्रसिद्ध धर्मगुरू व संत रेवणसिद्ध व अल्लमप्रभु (प्रभुदेव) यांच्या संबंधी केली गेलेली विधाने (पा. २८ व २९) अगदीच चुकीची व निराधार आहेत. त्यांत 'सिद्ध सिद्धान्त

पद्धति ' नामक नाथपंथीय सांप्रदायिक ग्रंथातील तीन श्लोक उद्धृत करून त्याच्या आधारावर वीरशैव, जंगम व काळामुख पंथ अवैदिक आहेत असा लेखकानें आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. त्यातील पहिल्या दोन श्लोकात ' वीरेण ' व 'वीरपरा' असे शद्ब आहेत लेखकाने हे शद्ब वीरशैव धर्माला उद्देशून आहेत असे लिहिले आहे. परंतु ते विधान चुकीचे व अज्ञान-मूलक आहे. सांप्रत ज्या धर्माला वीरशैव धर्म असे नांव आहे तो गोरखनाथांच्या काळी महाराष्ट्रात व उत्तर हिंदुस्थानांत ' जंगम पंथ ' नांवाने ओळखला जात होता. त्यावेळी वीरशैव हे नांव प्रचारात आले नव्हते. परंतु वरील शद्ब कौलपंथाच्या साधकांना उद्देशून आहेत कौल शैवपंथात साधकाचे ' पशु ' ' वीर ' व दिव्य ' असे तीनवर्ग केले गेले होते. ( प. हजारी प्रसाद द्विवेदी रचित ' नाथसंप्रदाय १९६६ ची दुसरी आवृत्ति, पान ८२ व ८३ पाहा ) वरील ' वीरेण ' व ' वीरपरा ' हे शद्ब त्या पंथाच्या 'वीर' साधकांना उद्देशून आहेत. ' वीरपरा ' या शद्बापुढेच ' प्रपंच निरता ' म्हणजे ' पशु ' वर्गाचे साधक ह्याचाही उल्लेख आहे. ह्याच्यावरून हे शद्ब कौल मताच्या साधकांच्या नांवाचे निदर्शक आहेत. यात कांहीं संशय नाही.

जंगम पंथ.

उपरिनिर्दिष्ट पानावरील तिसऱ्या श्लोकांत इतर शैव पंथा बरोबर जंगम पंथही कृत्रिम मंत्रतंत्र निरतास्ते तत्त्वतो वंञ्चितः ' आहे असा उल्लेख आहे. परंतु या उल्लेखाचा अर्थ काय ? मंत्रतंत्र तर नाथपंथासहीत हिंदुधर्माच्या सर्व पंथात आहेत. एवढेच नव्हे तर खुद्द वेदच मंत्रतंत्रमय आहेत. या मंत्रतंत्राचा वापर त्यावरील निष्ठेनें न करतां यांत्रिक रीतीने केल्यास ते कृत्रिम होणारच. हे मंत्रतंत्र निष्ठेने करणारे व यांत्रिक (कृत्रिम) रीतीने करणारे प्रत्येक पंथात असतातच. नाथपंथामध्ये सुद्धा ' कृत्रिम मंत्रतंत्र निरतः नव्हते असे म्हणता येणार नाही. तसेच एखाद्या पंथाचे मंत्रतंत्रच कृत्रिम आहेत असा याचा अर्थ करावयाचा असेल तर कृत्रिम याचा अर्थ काय ? त्या अर्थानें जंगमपंथाचे कोणते मंत्रतंत्र कृत्रिम आहेत याचा लेखकाने खुलासा करावा. या जंगम पंथालाच पुढें वीरशैव पंथ हें नांव प्राप्त झाले. वर उल्लेखिलेला ' सिद्धान्त शिखामणि ' हा ग्रंथ या जंगम वीरशैव पंथाचा अधिकृत ग्रंथ आहे. वरील 'कृत्रिम मंत्रतंत्र' याचा अर्थ निषिद्ध धर्माचार असा करावयाचा असेल तर ह्या जंगम वीरशैव पंथाच्या धर्माचारात एकही आचार निषिद्ध नाहीं हे हा ग्रंथ वाचल्यास स्पष्टपणे कळून येईल. तसेच ' तत्त्वतो वंञ्चितः' यातील तत्त्व म्हणजे कोणते तत्त्व ? हे तत्त्व म्हणजे

वेदोपनिषदातील तत्त्वे असा अर्थ करावयाचा असेल तर ही तत्त्वे व वीरशैव धर्माची तत्त्वे एकच आहेत हे वर दाखवून दिले आहे.

लेखकाला या जंगम पंथाची मुळीच माहिती नाहीं असे दिसते. हा पंथ अत्यंत प्राचीन असून इ. स. पहिल्या शतकापासूनच तो महाराष्ट्र व उत्तर हिंदुस्नात प्रचारात होता. ह्या पंथाचे प्राचीन धर्मपीठ सुप्रसिद्ध काशीक्षेत्रातच वसलेले आहे. सहाव्या शतकात होऊन गेलेले काशीचे राजे जयनंद देव यांनी या धर्मपीठाला गंगानदीच्या तीरावरील काही जमीनी दान देऊन त्याचे दानपत्र करून दिले आहे. ह्या जमीनी त्या धर्मपीठाकडुन विकत घेऊन त्याच्यावरच सांप्रतचे हिंदु विश्वविद्यालय स्थापलें गेलें आहे. हे धर्मपीठ व त्याची तेथील इस्टेट याला जंगमवाडी असेच नांव आहे. सांप्रतही हे धर्मपीठ वीरशैव धर्माच्या प्रमुख धर्मपीठापैकी एक मुख्य धर्मपीठ आहे. महाराष्ट्राच्या पंचाचार्य पंथीय वीरशैव ह्या धर्मपीठाच्या जगद्गुरूना आपले गुरू मानतात. ह्या धर्मपीठाच्या अथवा त्यांच्या अनुयायांच्या आचाराविचारात अवैदिक अथवा निषेधात्मक किंवा त्याज्य असे कांहीच नाहीं.

या संदर्भात दुसरी एक गोष्ट लक्षात ठेवणे जरूर आहे ती ही कीं 'सिद्ध सिद्धान्त पद्धति' सारख्या सांप्रदायिक ग्रंथातील काही उल्लेखावरून दुसऱ्या पंथाबद्दल आपला अभिप्राय बनविणें अथवा ते अवैदिक म्हणून त्यांच्यावर शिक्का मारणें हे केव्हाही योग्य नाही. आपलाच पंथ श्रेष्ठ व दुसरे सारे पंथ कनिष्ठ किंवा त्याज्य अशा अर्थाचे उल्लेख सर्व पंथांच्या सांप्रदायिक ग्रंथातून आढळून येतात. परंतु हे उल्लेख प्रचारात्मक असून विश्वसनीय नाहींत. उदाहरणार्थ वर उल्लेखिलेल्या वीरशैव धर्माच्या 'सिद्धान्त शिखामणि' ग्रंथात रेणुकाचार्यांनी यंत्रतंत्रकलेचे आचरण करणाऱ्या सिद्धांना जिंकून आपलें शिवाग-मोक्त मत स्थापन केलें अशा वर्णनाचा एक श्लोक आहे. ( यंत्रतंत्रकला सिद्धान् निमतान् सिद्धमंडळान् । विजित्य स्वभावेन स्थापयित्वा शिवागमान् ॥ " परिच्छेद २१ श्लो. ३९ ). अर्थात् हा श्लोक त्याकाळच्या नाथपंथीय सिद्धांना उद्देशून लिहिला गेला आहे. परंतु या श्लोकाच्या आधारावर नाथपंथासंबंधी आपला अभिप्राय बनविणे योग्य होईल काय ?

काळामुख पंथ.

वीरशैव जंगम पंथाप्रमाणें काळमुख पंथही अवैदिक आहे असे सिद्धसिध्दान्त

पध्दतीतील श्लोकाच्या वाधारावर लेखकानें लिहिले आहे. परंतु त्याचे हे विधान चुकीचे आहे. काळामुख पंथाविषयी ऐतिहासिक व विश्वसनीय माहिती अनेक शिलालेखातील उल्लेखावरून सांप्रत उपलब्ध झाली आहे. त्या पंथाचा उल्लेख असलेले काही शिलालेख महाराष्टातही सापडले आहेत. परंतु जास्तीत जास्त कर्नाटकात सापडले आहेत. त्यापैकी काहीं शिलालेखात या पंथाची व त्यांच्या अनेक धर्मगुरूंची सविस्तर माहिती दिली गेली आहे. हा पंथ सर्व कर्नाटकभर पसरलेला होता. त्या पंथाचे लहान मोठे मठ शहरापासून खेडयापर्यंत कर्नाटकच्या सर्व भागात स्थापन झाले होते. तसेच ह्या पंथाचे धर्मगुरू मोठे विद्वान व सकलशास्त्रपारंगत होते. त्याचप्रमाणें ते सत्वशील, सदाचारसंपन्न, निस्पृही व तपस्वी होते. वसवकल्याणच्या चालुक्य व कलचुरी राजघराण्यांचे ते राजगुरू होते. तसेच ते सामान्य जनतेतही अत्यंत लोकप्रिय होते. त्या काळच्या अनेक राजेरजवाडयानी व श्रीमंत व्यापाऱ्यानी एवढेच नव्हे तर शेतकरी, माळी, कुंभार, साळी वगैरे वर्गाच्या लोकांनी सुद्धां त्यांच्या मठांना देणग्या दिल्या होत्या. या देणग्यांच्या सहाय्यानें हे काळामुख मठाधिपती धर्म प्रचारावरोबर मोफत अन्नछत्रे, पाठशाळा, वैद्यशाळा वगैरे समाजोपयोगी संस्थाही चालवीत होते, असे उल्लेख काही शिलालेखातून आढळतात. ह्या काळमुख पंथाचे कर्नाटकातील मुख्य धर्मपीठ बळ्ळिगावी (बेळगाव नव्हे) या शहरात होते. तेथील त्यांचे केदारेश्वर देवालय व त्याला लागून असलेला त्यांचा कोडीय मठही इतिहास प्रसिद्ध आहेत. तेथील सन ११६२ च्या एका शिलालेखात ह्या धर्मंमठाचे वर्णन ' शिवलिंग पूजा पुलक सस्य सरस केदार स्थानम्, नैष्ठिक, ब्रह्मचर्य शिवमुनिजनानुष्ठाननिष्ठित् स्थानम्, सांग - ऋग्यजु: साम–अथर्व चतूर्वेद 'स्वाध्याय स्थानम्' असे आहे. याच्यावरून हे काळामुख धर्मगुरू वैदिक होते एवढेच नव्हे तर त्यांच्या मठात वेदाध्ययनाचीही व्यवस्था केली होती हे स्पष्ट आहे. तसेच हा काळामुख पंथ वेद मार्गी होता ( काळामुखा : श्रुतिमुख्या : ) असा स्पष्ट उल्लेख तांदि कोंड ताम्रशासनात आढळून येतो (No 25 of E. 1. Vol. XXIII) अशा या श्रेष्ठ काळामुख शैव पंथला अवैदिक अथवा ' कृत्रिम मन्त्रतंत्र निरतास्ते तत्वतो वंचिता' म्हणणाऱ्यांची कींवच केली पाहिजे. हा काळामुख पथ कर्नाटकात ७ व्या शतकापासून १२ व्या शतकाच्या अखेरपर्यंत अत्यंत भरभराटीत होता. परंतु १२ व्या शतकांत श्री वसवेश्वरादि शिवशरणांनी प्रतिष्ठापित केलेल्या उदार मतवादी व प्रगतीपर वीरशैव धर्माचा या पंथावर विलक्षण परिणाम होऊन हा पंथ हळूहळू वीरशैव धर्मात विलीन होऊ लागला. या पंथाच्या धर्मगुरूंनी वीरशैव धर्माचा स्वीकार केला. ह्यांच्या मठाचे वीरशैव मठात परिवर्तन झाले. अशाप्रकारे हा पंथ १४ व्या शतकाच्या अखेरीस वीरशैव धर्मात संपूर्णपणे विलीन पावला,

वीरशैव धर्मगुरु व संत, रेवणसिद्ध व अल्लम प्रभू.

उपरिनिर्दिष्ट लेखकानें ह्या दोघा वीरशैव गुरूबद्दल आपल्या लेखात (पा. १८) केलेली विधाने अगदीच चुकीची व निराधार आहेत. ह्या दोघा संताच्या जीवनाचा ज्यांना थोडा तरी परिचय आहे, त्यांना लेखकाची हीं विधाने वाचून आश्चर्याचा धक्काच बसेल यात संशय नाही. सांप्रत या संताची चरित्रे उपलब्ध नाहीत असे नाही. परंतु त्याकडे दुर्लक्ष करून त्यांची नांवे नवनाथ यादीत व हठयोग प्रदीपिकेत आहेत एवढयाशा आधारावर गोरखनाथाच्या उपदेशामुळें त्यांनी वीरशैव धर्माचा त्याग करून नाथपंथ स्वीकारला असे विधान करणाऱ्या लेखकाच्या ज्ञानाचे कौतुकंच केले पाहिजे. हे विधान करतांना त्यांनी या महान व्यक्तीच्या काळाचाही विचार केला नाही. नाथ संप्रदायाचा सखोल अभ्यास केलेल्या पं. हजारी प्रसाद द्वीवेदीनी गोरक्षनाथाचा काळ 'विक्रम संवत की दशवी शताब्दीं' म्हणजे ९ व्या शतकाचा उत्तरार्ध अथवा १० व्या शतकाचा पूर्वार्ध असा ठरविला आहे. परंतु अल्लंमप्रभू व श्री रेवणसिद्ध हे संत १२ व्या शतकात होऊन गेले असे अनेक आधारावरून निश्चित झाले आहे. अल्लंमप्रभू बसवेश्वरामागोमाग म्हणजे इ. स. ११६७ साली श्रीशैल पर्वतावरील कर्दळी वनात शिवैक्य झाले हे ऐतिहासिक सत्य आहे. रेवणसिद्धाचा पुत्र रूद्रमुनी हा बसवेश्वराचा सहकारी (इ. स. ११५७–११६७). तेंव्हा गोरखनाथ व हे संत यांच्या काळात एवढा फरक असतांना त्यांची भेट झाली कशी ? अल्लंप्रभूचे चरित्र 'लीला विश्वंभर' नांवाच्या मराठी प्राचीन काव्यग्रंथात ग्रंथित केले गेले आहे. हा काव्यग्रंथ ब्रह्मदास नांवाच्या संतकवीने १८ व्या शतकाच्या आरंभी प्रभुलिंगलीला नांवाच्या सुप्रसिद्ध कन्नड ग्रंथाच्या अनुवाद रूपाने रचला आहे. त्यांत चित्रित केले गेलेले अल्लंप्रभूचे चरित्र काव्यमय व अवतारिक स्वरूपाचे असले तरी ते चरित्र ऐतिहासिक सत्य आहे. याच्याशिवाय कन्नड भाषेत अल्लंमप्रभू चरित्रावर काही ग्रंथ रचले गेले आहेत. याच्याशिवाय खुद्द अल्लंमप्रभूनी रचलेली कन्नड भाषेतील वचने सांप्रत उपलब्ध आहेत. ती सर्व वीरशैव पंथीय आहेत. तसेच बसवेश्वराच्या वीरशैव धर्म प्रतिष्ठापनेच्या चळवळीचे अल्लंमप्रभू मुख्य प्रवर्तक होते. त्यावेळी स्थापल्या गेलेल्या 'शिवानुभव मंटप' नांवाच्या वीरशैव धर्मसंस्थेचे ते अखेरपर्यंत अध्यक्ष होते. अ. भा. गांधी स्मारक निधीचे अध्यक्ष मान्यवर श्री. रंगराव दिवाकर यांनी मराठी लीला विश्वंभर ग्रंथाला लिहिलेल्या पुरस्कारात अल्लंम प्रभूबद्दल 'वीरशैव वचनकारांच्या शिरोभागी व गुरूस्थानी आपल्या आध्यात्मिक तेजाने विराजमान झालेले श्री अल्लंमप्रभू (प्रभुदेव) यांची लीला हीच या लीला विश्वंभर ग्रंथाची कथावस्तु आहे,' असा उल्लेख केला आहे (पा. ७) अखेर

काळीं म्हणजे इ. स. ११६७ साली अल्लंमप्रभू श्रीशैल पर्वतावर जाऊन तेथील कर्दळी वनात शिवैक्य झाले.

रेवणसिध्दाबद्दल जेवढी ऐतिहासिक माहिती उपलब्ध आहे तेवढयावरून पाहतां ते वीरशैव पंथीय होते व अखेरपर्यंत वीरशैव धर्मगुरू म्हणूनच होते यात संशय नाही. रेवणसिध्दाची कर्मभूमी मंगलवेढे ( सोलापूर जिल्हा ). तेथें त्यांचे देवालय आहे. तें वीरशैव धर्मीयच आहे. त्यांचा पुत्र रूद्रमुनी यांचा जन्म तेथेंच झाला. हे रूद्रमुनी बसवेश्वरांच्या शिवशरणांच्या मेळाव्यापैंकी एक प्रमुख शिवशरण होते. रेवणसिध्दाचे शिष्य काडसिध्द यानी कोल्हापर जवळच्या सुप्रसिध्द सिध्दगिरी धर्मपीठाची १२ व्या शतकानंतर स्थापना केली. हे धर्मपीठ वीरशैव पंथीय असून त्याचे अनुयायी कर्नाटकभर पसरले आहेत. काडसिध्दांनी येडूर, बस्तवाड, कोण्णूर, गुंडेवाडी ( येथे त्यांची समाधीही आहे ) वगैरे ठिकाणी मठ स्थापले. ते सर्व वीरशैव पंथीय आहेत. मी स्वतः वीरशैव पंथीय असून काडसिद्धेश्वर हे शिरसंगी देसाईच्या व आमच्या घराण्याचे कुलदैवत आहे तसेच हे रेवणसिद्ध व गोरखनाथ यांच्या काळातील फरक वर दाखविलाच आहे. ह्या सर्व विश्वसनीय आधारावरून पाहता रेवणसिध्द व अल्लंमप्रभू आरंभापासून अखेर पर्यंत वीरशैवच होते. आणि हे व नवनाथ यादीत व हटयोग प्रदीपिकेत उल्लेखिले गेलेले रेवणसिध्द व अल्लंमप्रभू एक व्यक्ति नव्हेत हे स्पष्ट आहे.

**वैदिक व अवैदिक हा भेदभाव हिंदुधर्म संघटनेला विघातक.**

प्राचीनकाळीं हिंदुधर्मांतर्गत पंथापैंकी काही पंथ वैदिक व काही अवैदिक मानण्याची कारणे काही असोत, परंतु सांप्रतकाळी हिंदुधर्मीय पंथामध्ये असा भेदभाव करणें हिंदुधर्मसंघटनेस विघातक आहे. वैदिक व अवैदिक शब्दांची व्याख्याही कोणी केलेली नाही. ब्रह्मसूत्रात पाशुपत पंथ अवैदिक मानला गेला आहे तर पुराणकाळीं काही पुराणांत तो पंथ वैदिक आहे, असे उल्लेख आंहेत. तीच गत नाथपंथ, काळामुख पंथ, यांचीही आहे. काही ठिकाणी वैदिक पंथ व काही ठिकाणी अवैदिक पंथ म्हणून त्यांच्या संबधीचे उल्लेख आहेत. ते काही असलें तरी सांप्रतकाळीं निरनिराळ्या पंथाचे असले वर्गीकरण अप्रयोजक व विनाकारण वाद माजविणारे आहे. आतां जगांत सर्वधर्मसमन्वयाचे वारे वाहात आहेत. साऱ्या जगांत शांतता व सौहार्दतेचे वातावरण निर्माण करण्यास अशा सर्वधर्म समन्वयाची जरूरी आहे

हें बहुतेक धर्माच्या धर्मगुरूंना व इतर विद्वानांना पटले आहे. तसेंच सर्व धर्मांत असा समन्वय साधावयाचा असल्यास सर्व धर्म समान आहेत असे मानण्याच्या समता भूमिकेवरूनच साधणे शक्य आहे, हेही सर्वांना पटले आहे. अशा परिस्थितीत हिंदुधर्मांतर्गत पंथामध्येच वैदिक–अवैदिक, श्रेष्ठ कनिष्ठ असा भेदभाव दाखविणें हिंदुधर्मसंघटनेस किती घातक आहे हें निराळे सांगण्याची गरज नाही. तशात वैदिक–अवैदिक हे शास्त्रीय ( Scientific ) वर्गीकरण असते तर गोष्ट निराळी. परंतु एखादा पंथ अवैदिक आहे असे विधान करण्यात तो पंथ कनिष्ठ प्रतीचा आहे अथवा ढोंगी व निषिध्द आचारविचाराचा आहे असें भासविण्याचा उद्देश असतो हें शिवदैवत अंकातील उपरि निर्दिष्ट लेखावरून स्पष्ट आहे. एखाद्या पंथाच्या अनुयायांची मनें विनाकारण दुखविणारीं असलीं विधानें अत्यंत खंडनीय व निषेधात्मक आहेत.


संदर्भ ग्रंथ:–१) सिद्धान्त शिखामणि कै. काशिनाथ शास्त्री संपादित.

२) लीलाविश्वंभर अ. भा. वीरशैव संघ बेळगाव, या संस्थेचे प्रकाशन.

३) वचनशास्त्र रहस्य, मान्यवर रंगराव दिवाकर यांनी कन्नड भाषेत रचलेला वीरशैव धर्माच्या वचन शास्त्रावरील ग्रंथ.

## लेखांक २६

# श्रीकेदारनाथ क्षेत्र व वीरशैव धर्माचे 'वैराग्यसिंहासन' धर्मपीठ–उखीमठ

( सन १९७१ मार्च महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख )

( पादपूज्य श्रीपंचाचार्यांच्या पांच धर्मपीठापैकी इतिहास प्रसिद्ध श्री केदारनाथ क्षेत्रांत वसलेल्या वैराग्य सिंहासन नांवाच्या धर्मपीठाची माहिती बहुतेक वीरशैवांना नाही. तसेच ह्या धर्मपीठाच्या ओझरत्या उल्लेखाशिवाय त्या संबंधीची सविस्तर हकीगतही वीरशैव धर्म साहित्याच्या कोणत्याही ग्रंथात दिसून येत नसल्यामुळें जिज्ञासू अभ्यासकांना सुद्धां ह्या धर्मपीठाची माहिती दुर्लक्ष झाली होती. परंतु अलीकडे बेळगांव येथील आयुर्वेद कॉलेजचे प्राध्यापक, आयुर्वेद विशारद श्री. ष. ब्र. वसवराज शिवाचार्य हिरेमठ ह्यांनी स्वत: ह्या पवित्र क्षेत्राची यात्रा करून तेथील उखीमठातील सर्व उपलब्ध साहित्याचे संशोधन करून केदारक्षेत्र व हे वैराग्य सिंहासन या संबंधीची साधार व सविस्तर माहिती असलेला 'हिमगिरी' नावाचा एक कन्नड ग्रंथ सांप्रत प्रकाशित केला आहे. श्री वसवराज शिवाचार्यांनी अत्यंत परिश्रमाने दुर्लभ असलेली ही माहिती मिळवून हा महत्वाचा ग्रंथ प्रकाशित करून वीरशैव समाजावर मोठे उपकार केले आहेत. कोणाचेही विशेष साह्य

नसतांना त्यांनी हे महत्वाचे कार्य केले आहे याबद्दल त्यांचे अभिनंदन करावे तेवढ थोडेच आहे. महाराष्ट्रीय वीरशैवांनाही ह्या धर्मपीठाची माहिती उपलब्ध व्हावी या दृष्टीनें त्यांच्या ग्रंथाच्या आधारावर हा लेख लिहिला आहे. –लेखक )

भारतीयांना पूज्य असलेल्या हिमालय नगराजाच्या भव्य, रमणीय व नयनमनोहर वनश्रीनें नटलेल्या एका कुशीत वसलेल्या व भारताच्या बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक महत्त्वाचे प्राचीन क ळचे पुराणप्रसिद्ध ज्योतिर्लिंग म्हणून नांवाजलेल्या पवित्र व पुरातन केदार क्षेत्राचे नांव माहीत नसलेला भारतीय विरळा. उत्तरप्रदेश राज्यांतर्गत हिमालय प्रदेशातील गढवाल भागात तेथील वर्फाच्छादित उत्तुंग शिखरांच्या मध्यभागी असलेल्या एका लहान पण पावित्र्याने परिपूर्ण असलेल्या सपाट पठारावर श्री केदार नाथाचे देवालय वसलेले आहे. हे पठार दोन मैल लांब व दीड मैल रूंद असून त्याची उंची समुद्रसपाटीपासून ११७०० फूट आहे. ह्या देवालयाच्या बाजूनेच त्या पठारातून पवित्र मंदाकिनी नदी वाहात आहे. हे क्षेत्र अत्यंत प्राचीन असून त्याचें हृदयंगम व पुण्यप्रद वर्णन महाभारत, शिवपुराणांतर्गत केदारखंड, वायुपुराण वगैरे सुप्रसिद्ध पुरातन धर्म साहित्यात आढळून येते. या क्षेत्राच्या मूळ स्थापनेबद्दल ह्या साहित्यात निरनिराळे उल्लेख आढळून येत असले तरी भगवान शंकरानेंच आपली अर्धांगी व हिमराज कन्या पार्वती देवीच्या आग्रहा वरून, आपल्या भक्तांच्या उद्धारार्थ हे क्षेत्र निर्माण केले व ते दोघेही तेथेच कायम वास्तव्य करतात अशा अर्थाचे उल्लेखच जास्ती आढळून येतात.

ह्याच्यावरून हे क्षेत्र स्वयंभू असून प्राचीन काळापासूनच जागृत, पवित्र व महत्त्वाचें क्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे. ही गोष्ट स्पष्ट आहे. महाभारतांतील पांडवांच्या स्वर्गारोहणाची कथा सुप्रसिद्ध आहे. अंत्यकाळी स्वर्गारोहणाकरतां पांडव ह्या हिमालय प्रदेशातून जात असतांना त्यांनी या क्षेत्राला भेट देऊन तेथील पवित्र केदार लिंगाचा पूजा केली व त्यानंतर तेथील वर्फाच्छादित व उत्तुंग शिखरावर आरोहण करून तेथून त्यांनी स्वर्गात प्रवेश केला असे सांगण्यांत येते. सांप्रत या शिखराचे नांवही स्वर्गारोहिणी असेंच असून प्राचीन काळी काही भाविक व श्रद्धाळू लोक मरणोत्तर स्वर्गात स्थान मिळवण्याकरतां या शिखरावर चढून तेथून खाली दरीत उडी मारून प्राणत्याग करीत. परंतु त्या भागात ब्रिटीशांचे राज्य स्थापन झाल्यानंतर त्यांनी या अनिष्ट रूढीला आळा घातला.

केदारलिंग स्वयंभू असून त्याला शाळुंका नाहीं. दररोज त्याची पूजाअर्चा

झाल्यानंतर कोणाच्याही जातीधर्मांचा विचार न करतां व सोवळचा-ओवळयाचा विधिनिषेध न पाळता सर्वांना लिंगाला स्पर्श करून त्याचे दर्शन घेण्याची मुभा आहे. लिंगाच्या एका बाजूस एक मोठा नंदादीप असून त्याची शांत ज्योत सतत तळपत असते. पांडवांनी केदारलिंगाची पूजा करतांना ह्या नंदादीपाचीं ज्योत पेटवली व तेव्हां पासून आजतागायत ही ज्योत अखंडपणें तळपत आहे असे सांगण्यात येते. ह्या कारणास्तव त्याला 'अखंड ज्योती' असे नांव प्राप्त झाले आहे. हिंवाळचात केदारलिंग देवालय व त्याचा परिसर वर्फाच्छादित होत असल्यामुळें कार्तिक मासापासून चैत्र महिना अखेरपर्यंत हें देवालय बंद ठेवण्यात येत असते. त्यावेळीसुद्धा ह्या नंदादीपाची ज्योत न विझता सतत तेवत असते. चैत्रमासाच्या अखेरीस पूर्वीच मुक्रर केलेल्या एका शुभदिवशीं मोठचा समारंभानें ह्या देवालयाचे दार उघडले जाते. त्यावेळी ह्या नंदादीपाच्या दिव्य ज्योतीचे दर्शन घेण्याकरता यात्रेकरूंचा मोठा समुदाय जमलेला असतो. अखंड ज्योतीचा हा दैवी चमत्कार पाहून ते आश्चर्यचकित होतात. त्यामुळे केदारलिंगा विषयीच्या त्यांच्या श्रद्धा भक्तीत अधिकच भर पडते. देवालयाच्या सभामंडपाच्या भिंतीत पांच पांडव, द्रौपदी, कृष्ण वगैरेच्या शिलामूर्तीही वसविल्या आहेत.

**उखी मठाचा इतिहास –**

अशा पवित्र व अत्यंत प्राचीन क्षेत्रात पंचाचार्यांपैकी श्री. जगद्‌गुरू पादपूज्य एकोराम शिवाचार्य कलियुगारंभी तप करीत व दररोज नित्य नियमाने केदार लिंगाची पूजाअर्चा करीत राहात होते. त्यांनीच तेथे हे वैराग्य सिंहासन धर्मपीठ स्थापिले असे शैवागमातील उल्लेखायरून कळून येते. त्यांच्या काळापासून केदार लिंगाच्या पूजाअर्चेचे सर्व अधिकार ह्या धर्मपीठाच्या गुरूशिष्यपरंपरेत चालत आले आहेत. केदारक्षेत्र हिंवाळचात सहामहिने वर्फाच्छादीत राहात असल्यामुळें तेथे कोणासही कायम वस्ती करून राहणें शक्य नाही. करिता या धर्मपीठाचे मुख्य स्थळ केदार क्षेत्रापासून खाली थोडचा अंतरावर उखीमठात आहे. महाभारतातील उषा अनिरूद्ध यांच्या प्रणय विवाहाची कथा सर्वश्रुत आहे. ही उषादेवी त्या काळच्या या मठाधिपतीची शिष्या होती. तिनेच आपल्या गुरूकरता हा मठ बांधला व तिच्या नांवावरूनच ह्या मठाला प्राचीन काळी उषामठ असे नांव होते. कालांतरानें अपभ्रंशाने ह्या नांवाचे उखीमठ या नांवात रूपांतर झाले असे या मठात उपलब्ध असलेल्या साहित्यावरून कळून येते. ह्या मठाला लागूनच ओंकारेश्वर देवालय आहे. हे स्थानही मदाकिनी नदीच्या तीरावर असून तिच्या पलीकडील तीरावर गुप्त काशी क्षेत्र असून तेथेही शिवलिंग देवालय आहे.

केदारलिंगाच्या दर्शनास जाण्यापूर्वी पांडवांनी ह्या मंदाकिनी नदीत स्नान करून तेथील शिवलिंगाची पूजाअर्चा केली असे सांगण्यात येते. ह्या देवालयाच्या बाजूसही पांडवाच्या मूर्ती आहेत. हे गुप्तकाशी क्षेत्रही पवित्र क्षेत्रस्थान असल्यामुळें यात्रेकरू ह्या क्षेत्रासही भेट देऊन तेथील शिवलिंगाची पूजाअर्चा करतात. ओंकारेश्वर देवालय गुप्तकाशीक्षेत्र, व ह्याशिवाय मध्य महेश्वर, उदककुंड, गौरीकुंड, गौरीमायि, काली भगवती, वैखंड सोमद्वार वगैरे केदार क्षेत्रातील बावीस पुण्यक्षेत्रातील पूजाअर्चेचे सर्व अधिकार ह्या उखामठाधिपतीच्या स्वाधीन आहेत

**श्री. जनमेजय राजाचे दानपत्र –**

केदारलिंग क्षेत्र प्राचीन काळापासूनच सुप्रसिद्ध असल्यामुळें भारतातील अनेक राजेरजवाडयांनी व श्रीमंत लोकांनी ह्या क्षेत्राला भेट देऊन तेथील केदारलिंगाच्या पूजाअर्चेकरता देणग्या दिल्या आहेत. पौराणिककाळी पांडवांचा नातू जनमेजय राजाने या क्षेत्रास भेट देऊन केदारलिंगाच्या पूजेकरता ह्या वैराग्य धर्मपीठाचे त्या काळाचे अधिपती श्री आनंदलिंग जंगम गोस्वामी यांना केदारनाथ देवालयाचे पठार दान देऊन त्याच्या नांवानें दानपत्र ( ताम्रपट ) करून दिले आहे हे दानपत्र सांप्रत उखीमठात उपलब्ध आहे. या धर्मपीठाचे महत्त्व व त्याची प्राचीनता जाणून घेण्याच्या दृष्टीनें हे दानपत्र महत्त्वाचे असल्याकारणानें त्यांतील लेख जशाच्या तसा खाली दिला आहे.

"स्वस्तिश्री विजयाभ्युदय युधिष्ठिर शके प्लवंगाख्ये एकोन्नवति संवत्सरे सहसिमासि अमावास्यायां सोमवासरे श्री मन्महाराजाधिराज परमेश्वर वैयाघ्रपाद गोत्रज श्री जनमेजय भूप: इंद्रप्रस्थ नगरी सिंहासनस्थ सकल वर्णाश्रम धर्म प्रतिपालक: उत्तर हिमालये श्री केदारक्षेत्रे तत्रस्थ मुनि : उषामठस्य श्री गोस्वामी आनंद लिंग जंगम: ।। श्रीमत् शिष्य ज्ञानलिंग जंगमद्वारा आराधित केदारनाथस्य पूजार्थं चतुस्सीमा परिमितीक्रम : । पूर्वभागे दक्षिण वाहिनी मंदाकिनी, पश्चिम दक्षिणभागे क्षीरगंगा, उत्तरपश्चिमे मधुगंगा, पूर्वभागे सर्व द्वार नदी, दक्षिणे सरस्वति मंदाकिन्यो: संगम: एतन्मध्ये श्री केदारक्षेत्रं भवत् शिष्यपरंपरया आचंद्रार्कं पर्यंत निधिनिक्षेप जलपाषाणां शिवलोक प्राप्त्यर्थं श्री केदारेश्वर सन्निधानुपराग समये सहिरण्य– मंदाकिनी जलधारापूर्वकं क्षेत्रमिदं हस्ते दत्तवास्मि एतद्धर्मसाधनस्वासाक्षिण ।।

आदित्यचंद्रा वनिलोनलश्च द्यौभूमिरायो हृदय यमश्च आहश्च रात्रिश्च उभे च संध्ये धर्मश्च जानाति नरश्च वृत्तं ।। दानपालयोर्मध्ये दानात् श्रेयोनुपालनं दानात् स्वर्गमाप्नोति पालना द्विगुणं फलं स्वदत्त पुत्रकाङ्गेया ।। पित्रदत्ता सहोदरा ।। अन्यदत्तानु जननी दत्तभूमि परित्यजेत् ।। स्वदत्ता परदत्तां वा ब्रह्मवृत्ति हरेच्छय :।। षष्ठिर्ष सहस्त्राणि विष्ठाया जायते क्रिमि :।।

सारांश – इंद्रप्रस्थ नगर सिंहासनाधिपति वैयाघ्र गोत्रज श्री जनमेजय राजाने उत्तर हिमालयातील केदारक्षेत्रात वसलेल्या उषामठाचे श्रीगोस्वामी आनंदलिंग जंगम यांना त्यांचे सच्छिष्य ज्ञानलिंग जंगम याच्या हस्ते पूजिल्या जाणाऱ्या केदारनाथाच्या पूजेकरता, दानपत्रात नमूद केलेल्यां चतुस्सीमेतील पवित्रभूमी आपल्या मातापितांना शिवलोक प्राप्ती होण्याकरता युधिष्ठिर शके ८९ प्लवंगनाम संवत्सर मार्गशीर्ष अमावास्या सोमवार दिवशीं धारा पूर्वक दान दिले.

**मठाचे उत्पन्न –**

या दानपत्रावरून ह्या उखीमठाच्या ( उषामठ ) प्राचीनतेची कल्पना येते. तसेच ह्या हिमालय प्रदेशातील काही गावे ह्या केदारनाथाच्या पूजेकरता इनाम देऊन त्याबद्दल दानपत्र करून दिले होते. परंतु सन १७४१–४२ साली श्री ईहेलाने या भागात स्वारी केल्यावेळी ह्या मठातील दानपत्राचा नाश केला गेला. त्या काळच्या मठाधिपतींनी त्यातून प्रयत्नानें कसेबसे जनमेजय राजाच्या दानपत्राचा बचाव केला. या काळानंतर सन १७९७ सालीं नेपाळ राजाने करून दिलेले दानपत्र सांप्रत ह्या मठात आहे. ब्रिटिशपूर्वकाळीं या मठाला इनाम करून दिल्या गेलेल्या गांवाची संख्या १०४१ होती. परंतु ब्रिटिशांचा अमल सुरू झाल्यावेळी ब्रिटिश सरकारनें ह्या सर्व इनामांची चौकशी केली. त्यापैकी १४३ गांवाची इनामे मंजूर करून पुराव्या अभावी बाकीच्या गांवाची इनामे रद्द केली हिमालय प्रदेशातील ही गांवे अत्यंत लहान असून तेथील लोकही मागासलेले व अत्यंत गरीब आहेत. त्यामुळे या इनाम गांवाची संख्या मोठी असली तरी त्या सर्वांपासून मठाला दरसाल फक्त दोन हजार रुपये उत्पन्न मिळते.

**मठाधिपतीचा मानमरातब –**

उखी मठाधिपती प्राचीन काळापासूनच वैराग्य संपन्न ज्ञानी व तपस्वी

असल्या कारणानें त्या भागात त्यांना मोठा मान आहे. ह्या मठाधिपतींना तेथे 'रावळ' या सन्मानार्थं नांवानें संबोधले जाते. त्या भागातील वेहरी वगैरे लहान मोठे संस्थानाचे राजे ह्या मठाधिपतीचे शिष्य आहेत. नव्याने नेमल्या गेलेल्या मठाधिपतींना 'रावळ' पदवी वहाल करण्याचा अधिकार वेहरी संस्थानच्या राजांना आहे. त्यावेळी हे संस्थानाधिपती मोठा दरबार भरवून ह्या मठाधिपतींची सहदांपत्य पादपूजा करून व देणगी देऊन मोठ्या सन्मानाने 'रावळ' ही पदवी व तत्संबंधी सन्माननीय चिन्हे यांना समर्पण करतात. त्याचप्रमाणें काश्मीर उदेपूर, गढवाल, नेपाळ, भूतान वगैरे संस्थानांचे राजेही दरसाल ह्या मठाधिपतीस गुरू दक्षिणा म्हणून देणग्या पाठवितात. अर्थात् सांप्रतच्या बदललेल्या परिस्थितीत पूर्वीप्रमाणें ह्या देणग्या नियमितपणें पाठविल्या जात नाहीत.

उखीमठा संबंधी गढवाल इतिहासांतील उल्लेख –

केदारनाथ क्षेत्र उत्तर प्रदेश राज्याच्या गढवाल जिल्ह्यात आहे. या जिल्ह्याच्या 'गढवालका इतिहास' नांवाच्या इतिहास ग्रंथात या उखीमठाविषयी महत्त्वाची माहिती दिली गेली आहे. पांडवांच्या स्वर्गारोहणानंतर काही काळ लोटल्यावर भ्रूकुंडलिंग नांवाचे एक महान् तपस्वी व ज्ञानी मुनी ह्या धर्मपीठाचे अधिपती झाले होते. प्राचीन काळापासून चालत आलेले ह्या मठाचे सर्व अधिकार त्यांच्याकडे होते. त्यांच्याच गुरूशिष्य परंपरेंत हे अधिकार चालत आले आहेत असे त्या ग्रंथावरून कळून येते. या ग्रथांतील हिंदीभाषेतील उल्लेख खालील प्रमाणे आहे.

"जब पांडुपुत्र युद्धिष्ठिरादि स्वर्गारोहणको गये थे उस काल गणोंके स्वामी वीरभद्रसे कुछ अवज्ञा हो जानेपर शिवजीने उन्हे शाप दिया कि तुम मानव जीवन ग्रहण करो, अर्थात् मनुष्य जन्म लेकर इस अवज्ञाका प्रायश्चित करो। तब वीरभद्रने आर्त स्वरसे भगवान् भोलानाथ की स्तुती की। तब शिवजीने प्रसन्न होकर कहा कि तुम चोलदेशमे जाकर वेदपाठी ब्राह्मणके घरमें जन्म लेकर भ्रूकुंड नामसे प्रसिद्ध होंगे। तब सद्भक्तिपूर्ण मेरा अर्चनपूजन करते हुऐ उसी देहसे मेरेपास आवोगे। गणाधीशने शिवाज्ञा शिरोधार्य करके चोल देशमें एक वेदपाठी (माहेश्वर) के घरमें जन्म ले लिया, उसका वह भ्रूकुंड नाम हुवा। वह वेदशास्त्र संपन्न होकर युवावस्था में ब्रह्मचर्य धारण करके वाराणसी को चला गया। वहां कुछ शिष्यभी उसने रख लिये। तब वह शिष्यों को साथ लेकर केदारपुरी में आया। वहां उसने शिवजीको प्रसन्न करनेके लिये उग्र तपस्या की। शिवजीने प्रसन्न होकर

भ्रूकुंडको दर्शन देकर ' वरं ब्रूहि ' कहा। भ्रूकुंडने विनय किया की यदि प्रभो आप प्रसन्न है तो मुझे इस मानवी देहसे विमुक्त करके पूर्ववत् अपनी सेवा में ले लीजिये और आगे को इस आपके परमपुनीत केदारलिंग के पूजनअर्चन की प्रथा उत्तरोत्तर सदाकालके लिये मेरेही शिष्य संप्रदायमे रहने की आज्ञा प्रदान कीजिये। तब शिवजीने भ्रूकुंडको मानव देहसे मुक्त किया और केदारलिंगके पूजन अर्चन की प्रथा भ्रूकुंडके शिष्यसंप्रदायमें चलने की आज्ञा प्रदान की। तबसे वही प्राचीन प्रथा उसी भ्रूकुंड की शिष्य संप्रदाय मे चली आयी है। यह पौराणिक कथा नही, केवल केदारनाथके मंदिरकी प्राचीन वहीयों में ऐसा लिखा बतलाते है। भ्रूकुंडके पश्चात् उत्तरोत्तर कौन कौन रावल किस किस समयमे हुये है इसका ठीक पता कुछ नही मिला। केवल रावलो की नामावली मिली जो क्रमसे नीचे दी जाती है।'

वरील हकीकतीत भ्रूकुंडलिंगाचे वर्णन पौराणिक पद्धतीने केले गेले असले तरी ते चोल देशातील ( तामिळ नाड ) माहेश्वर ( माहेश्वर जंगम ) घराण्याचे असून त्यांनी वेदाभ्यासात काही काळ काशीक्षेत्रात व्यतीत केला. त्यानंतर ते आपल्या काही शिष्यासह केदार क्षेत्रास जाऊन तेथील उखीमठाचे अधिपती होऊन केदार लिंगाची व तेथील इतर पुण्यक्षेत्राची पूजाअर्चा करण्यात आपले आयुष्य घालविले व त्यानंतर केदार क्षेत्रातील सर्व पुण्यक्षेत्रांची पूजाअर्चा करण्याचे वगैरे अधिकार त्यांच्या शिष्य परंपरेतील त्या उखीमठाच्या अधिपतीकडेच सातत्यानें आजतागायत चालत आले आहेत, हे ऐतिहासिक सत्य आहे. सांप्रत मठात असलेलो सर्व मठाधिपतीची नामावळी त्या भ्रूकुंड लिंगापासूनच सुरू होते. ही नामावळी ह्या लेखाच्या प्रारंभी उल्लेखिलेल्या ' हिमगिरी ' नावाच्या कन्नड ग्रंथात मुद्रित झाली आहे. त्यावरून पहाता ह्या उखीमठाचे सांप्रतचे अधिपती ज गु. श्री शांतलिंग शिवाचार्य ३२२ वे अधिपती आहेत, असे आढळून येते. भ्रूकुंड लिंग कोणत्या काळी होऊन गेले हे शोधण्यास सांप्रत दुसरा काही पुरावा उपलब्ध नाही. परंतु या नामावळीवरून पाहता ते फार प्राचीनकाळी होऊन गेले असे दिसते. वैराग्य सिंहासन धर्मपीठाचे मूळ संस्थापक श्री ज. गु एकोरामाराध्य शिवाचार्य व जनमेजय राजाच्या दानपत्रात उल्लेखिले गेलेले आनंदलिंग व ज्ञानलिंग यांची नावे ह्या नामावळीत नाहीत यावरून ते भ्रूकुंड लिंगाच्या पूर्वीच होऊन गेले असावेत असे दिसते.

### उखीमठाच्या अधिकारावर नियंत्रण –

याप्रमाणें प्राचीन काळापासूनच केदारलिंग क्षेत्रातील सर्व पुण्यक्षेत्राचे पूजाअर्चेचे

अधिकार उखीमठाधिपतींनाच होते. हे अधिकार ते मठाधिपती ह्या शतकाच्या आरंभापर्यंत सातत्याने उपभोगीत होते. दुर्दैवाने या शतकाच्या प्रारंभी ह्या मठाचे अधिपती असलेले गणेश लिंग ( वंशावळीनं ३१८ ) यांनी आपल्या अंदाधुंदीं कारभारानें मठाच्या उत्पन्नापेक्षां जास्ती खर्च करून मठाच्या उत्पन्नावर कर्जाचा बोजा लादला. यामुळे त्यांच्या गैरकारभाराबद्दल त्यावेळच्या ब्रिटिश सरकाराकडे तक्रारी गेल्यामुळें त्या काळच्या त्या भागाच्या कमिशनरानें उखीमठाच्या सुव्यवस्थे करतां एक योजना तयार करून ती अमलात आणली. ह्या योजनेमुळें उखीमठाची मालमत्ता व उत्पन्न सुरक्षित राहिले तरी मठाधिपतीच्या बहुतेक सर्व अधिकारावर नियंत्रण घातले गेले. नव्या मठाधिपतींची नेमणूकही नियमबद्द करण्यात आली. ही योजना ता. ८-९-१९११ रोजी अमलात आणण्यात आली. त्यात मठाधिपतीच्या नेमणूकी विषयी खालीलप्रमाणें नियम नमूद केले आहेत.

"The late Rawal, during his term of office nominates a successor. After the Rawal's disease a panchayat is held at ukhi matha, at which the Pujaries and chelas of the matha, the officials of the establishments of Kedarnath and attached shrines referred to in para one and malgujars and Cosharers of the assigned [ 143 ] villages referred to in para two have a right to attend such panchayat as hitherto be held on the 11th day after the Rawal's death, but shall in future be held on date to be fixed as Prescribed in para 12 below. At this punchayat the nomination of the late Rawal is declared and a Rawal is elected by those present. The result of the election is reported to the commissioner of the Kumaun for approval and conformation. The Rawal may nominate a succcssor from among the chelas of the matha. "The nominee must be Jangam Gosain from the Deccan. The nomination must be in writing and may be deposited in the sealed cover with the District Registrar.

On the death of a Rawal, the District Judge shall appoint a special officer (who shall not be a Government official) to proceed to ukhimath and superintend the election of a succcssor. The election shall take place as soon as possible after the death of the late Rawal on a date to be fixed by the Dist. Judge and notified to the electors. The nomanation made by the late Rawal shall be

declared by the special officer to the electors assembled at ukhimatha, who will then proceed to elect a successor. In case where the successor is disputed by opposing candidates, the votes of the electors shall be recorded. In case the equality of votes preference shall be given to the nominee of the late Rawal."

उत्तरहिंदुस्थानीय सुंदरलिंग नेमणूकीचे प्रकरण.

वरील सरकारी हुकूमाप्रमाणें ह्या धर्म पीठाधिपतींना आपला उत्तराधिकारी नेमण्याचा अधिकार असून हा उत्तराधिकारी दक्षिण हिंदुस्थानातील जंगम गोसावीच (वीरशैव जंगम ब्रह्मचारी) असला पाहिजे हा उल्लेख वीरशैव समाजाच्या दृष्टीने महत्वाचा आहे. ब्रिटिश अंमल संपुष्टात येऊन उत्तरप्रदेश राज्यात कांग्रेस सरकार स्थापन झाल्यानंतर राज्यातील सर्व देवस्थानाच्या सुव्यवस्थे करतां एक कायदा पास केला गेला. या कायद्यान्वयें केदारनाथ व बद्रीनाथ या दोन्ही क्षेत्राच्या सुव्यवस्थेकरता एक सरकारी समिती नेमली गेली आहे. सांप्रत नव्या मठाधिपतीची नेमणूक वरील सरकारी हुकूमानुसार ही समितीच करते.

गणेश लिंगानंतर विश्वलिंग व त्यांच्यानंतर नीलकंठलिंग नांवाचे स्वामी ह्या मठाचे मठाधिपती झाले. हे नीलकंठलिंग आपला उत्तराधिकारी न नेमताच लिंगैक्य झाले. त्यामुळे नवीन मठाधिपती निवडण्याचा अधिकार वरील हुकूमात नमूद केलेल्या हक्कदारांस प्राप्त झाला. त्याचा फायदा घेऊन त्या मठाच्या शिष्यवर्गात असलेल्या एका उत्तर हिंदुस्थानीय सुंदरलिंग नांवाच्या शिष्यानें ह्या हक्कदारांना वश करून घेऊन बहुमतानें आपली निवड करून घेतली. परंतु ही हकीगत कळल्या-नंतर येथील इतर वीरशैव धर्मगुरूनी व समाजाच्या पुढाऱ्यांनी उत्तरप्रदेश सरकार-कडे व वरील समीतीकडे त्या नियमबाह्य निवडणूकीविरूद्ध तक्रारी अर्ज व तारा पाठविल्यामुळें सदरी समितीनें सुंदरलिंगाची नेंमणूक रद्द करून त्याच्याठिकाणी कर्नाटकातील वीरशैव जंगम स्वामी श्री विश्वनाथ लिंग स्वामीची नेमणूक केली.

या विश्वनाथलिंग स्वामीनी अंत्यकाळी पंचाचार्य पीठाधिपतीच्या सल्यानें सांप्रतच्या श्री शांतलिंग शिवाचार्यांना आपला उत्तराधिकारी म्हणून निवडून त्याप्रमाणे त्यांनी सदर समितीस कळविले. त्याप्रमाणे समितीनें त्यांची नेमणूक केली आहे. ह्या नेमणूकीप्रमाणें केदार क्षेत्रातील उखी मठात ता. १०–६–१९६६

या शुभदिवशी श्री. ष. ब्र. श्री शांतलिंग शिवाचार्यांना पट्टाभिषेक महोत्पव मोठ्या समारंभानें साजरा करण्यात आला. ह्या महोत्सवास काशीचे ज. गु. श्री विश्वेश्वर शिवाचार्य, रंभापुरी धर्मपीठाचे ज. गु. श्री. वीर गंगाधर राजयोगिंद्र शिवाचार्य व कर्नाटक महाराष्ट्रातील काही वींरशैव प्रमुख हजर होते. सांप्रत या प्राचीन व ऐतिहासिक धर्मपीठाचे सर्व कार्य ज. गु. ष. ब्र. श्री शांतलिंग शिवाचार्य अत्यंत दक्षतेनें चालवीत आहेत.

**ह्या धर्मपीठाचे लोकसेवा कार्य –**

श्री शांतलिंग शिवाचार्यांचे परमगुरू म्हणजे गुरूंचे गुरु कै. श्री नीलकंठ लिंग शिवाचार्य स्वामी हे जाडे विद्वान व कर्तबगार मठाधिपती होते. सन १९२१ साली उखीमठाधिपती म्हणून त्यांची नेमणूक झाल्यानंतर त्यांनी उखीमठाच्या कारभारांत फारच सुधारणा केली. हिमालयातील ह्या प्रदेश अत्यंत मागासलेला आहे. करिता तेथील लोकांच्या उन्नतीसाठी श्री नीलकंठ स्वामींनी कर्नाटक महाराष्ट्रात संचार करून, फंड जमवून, उखीमठ गावांत प्राथमिक शाळा व उच्च शिक्षणाकरता एक कॉलेज स्थापले आहे. सांप्रत या कालेजांत त्या प्रदेशांतील सुमारे ३।४शे विद्यार्थी उच्च शिक्षण घेत आहेत. या शिवाय तेथील लोकांची सेवा करण्याच्या दृष्टीनें त्यांनी तेथे मोफत आयुर्वेद दवाखाना वगैरे लोकोपयोगी संस्था स्थापिल्या आहेत. सांप्रतचे मठाधिपतीही प्रगतीपर विचारांचे व सामाजिक कार्याची कळकळ असलेले असून त्यांनीही आपल्या परम गुरूंची लोकसेवेची परपरा अनुसरली आहे.

सांप्रतचे केदारनाथ रावळ श्री १००८ जगद्गु वैराग्य सिंहासनाधीश्वर श्री शांतलिंग शिवाचार्य स्वामिजी हे हिमवत्केदार पीठावर ३२२ वे मठाधिपती असून ते दक्षिण भारतातील बेळगाव जवळील मुत्नाळ या खेडेगावच्या हिरेमठ माहेश्वर घराण्यातील आहेत. त्यांचे कन्नड मराठी व इंग्रजी शिक्षण मुत्नाळ व बेळगाव येथें झाले असून संस्कृत व हिंदी शिक्षण शिवयोग मंदिर, काशी व केदार येथे झालेले आहे. ते एक विद्वान, व्यवहारज्ञानी, मनमिळांवू तरूण स्वामी असल्यामुळें व केदारपीठाचें भूतपूर्व जगद्गुरू लि. श्री नीलकंठ स्वामीजींचें आणि सांप्रतच्या सर्व जगद्गुरूंचे एक विश्वासू व आवडते शिष्य असल्यामुळें या पीठाच्या सर्व शिष्यभक्त वर्गांना या श्री शांतलिंग जगद्गुरू बद्दल व केदार पीठाबद्दल आदर व आपुलकी वाटत आहे. ह्या जगद्गुरूंच्या कार्यानें केदार पीठाची कीर्ती अधिक उजळेल अशी आशा सर्वांना आहे.

खंड २

# स्फुट लेख–आध्यात्मिक वेंचे

लेखांक १

## मुंबईत भरलेले ख्रिस्त प्रसाद संम्मेलन

( सन १९६५ जानेवारी महिन्याच्या अंकांत प्रकाशित झालेला लेख )

गेल्या डिसेंबर महिन्यात मुंबई येंथे भरलेले ख्रिस्त प्रसाद संमेलन (Euccaristic congress) हिंदुस्थानच्या धार्मिक क्षेत्रातील एक महत्वाची घटना होय. प्राचीन काळी जगातील निरनिराळ्या धर्मीय लोकांमध्यें दिसून येत असलेलें द्वेश असूया वगैरे भेदभाव नष्ट पावून आजच्या परिस्थितींत सर्व धर्मांचे धर्मगुरू व नेते सर्वधर्मसमन्वयाचा पुरस्कार करीत आहेत. मुंबईत भरलेली ही कॉंग्रेस अशा उदात्त धार्मिक धोरणाचेंच एक प्रतीक आहे असें म्हणाध्यास हरकत नाही. हिंदुस्थान मुख्यत: हिंदुधर्मप्रधान देश आहे. अशा देशांत कॅथालिक ख्रिस्तीयन धर्माचे जागतिक संमेलन भरून शांत व सुव्यवस्थितपणें पार पडते एवढेच नव्हे तर ते संमेलन यशस्वी करण्यास हिंदुधर्मीय लोकांनीही सहाय्य केले ही घटना सर्वधर्म

समन्वयाच्या दृष्टीनें महत्वाची नाही असे कोण म्हणेल ? ख्रिस्ताचे धर्मगुरू पोपनी सुद्धां हाच संदेश आपल्या अनुयायांना दिला व जगात शांती स्थैर्य स्थापन होण्याची आशा प्रदर्शित केली.

या ख्रिस्त-प्रसाद संमेलनाचा मूल उगम येशु ख्रिस्ताच्या जीवनात आहे. येशु ख्रिस्तांनी भुतलावरील आपले अवतार कार्य संपविण्यापूर्वी आपल्या सर्व अनुयायांना एकत्र बोलावून त्यांचे पाय धुतले व आपल्या हातानें ब्रेडचा तुकडा मोडून 'हें माझें शरीर आहे, हें खा' असें म्हणून त्यांना खाण्यास दिले. नंतर द्राक्षरसानें एक ग्लास भरून 'अनेकांची पापें धुवून काढणारें हें माझें रक्त आहे हे प्या' असें म्हणून त्यांनी त्यांस तें प्येय पाजले. शेवटीं ज्या ज्या वेळीं तुम्ही असें कराल त्या त्या वेळी माझे स्मरण करा, अशी त्यांनी आज्ञा केली. ह्या पुण्य घटनेच्या स्मरणार्थ रोमन कॅथॉलिक ख्रिस्तीयन लोक हें संमेलन भरवितात. ह्या ख्रिस्त प्रसाद संमेलनाचे पहिले अधिवेशन सन १८८१ सालीं फ्रान्समध्यें भरलें होते त्याच्यानंतर आजपर्यंत जगाच्या निरनिराळ्या भागांत ह्या कॉंग्रेसची छत्तीस अधिवेशने भरली. मुंबईस भरलेले अधिवेशन सदतीसावें आहे.

ह्या संमेलनात मुख्यत्वानें दिसून आलेली रेखीव कार्यपद्धती, कार्यकर्त्यांची कार्यतत्परता, शिस्त बद्धता, नियमितपणा ही प्रशंसनीय असून ती यासारख्या इतर धर्मीय परिषदांस आदर्शमय होती. निरर्थक व लांबलचक भाषणें, कार्यकर्त्यांची व स्वयंसेवकांची धावपळ व गडवड, श्रोतृसमुदायाचा गोंगाट व किलकिलाट यांचा तेथें संपूर्ण अभाव होता. तेथील सर्व कांही दृश्यें रेखीव चित्राप्रमाणे नियमित व शिस्तबद्ध. एवढे मोठे जागतिक संमेलन भरले तरी आणि या संमेलनास लक्षावधि लोक आले असले तरी कोणाचें भाषण नाहीं, वादविवाद नाहीं. कोणत्याही तऱ्हेचा गोंधळ नाही. उलट पक्षी आपल्या धर्म संमेलना मध्यें दिसून येणारा गोंधळ, बेशिस्तपणा व भोंगळपणा यांचीं कल्पनाच केलेली वरी. अशा संमेलनात व्याख्यानवाजी लोकांचे तर पेंवच फुटते. आपल्या व्याख्यानवाजीचे व ढोंगी धार्मिकतेचें प्रदर्शन करण्यास हीच एक नामी संधी आहे असें त्यांना वाटते. ही अनिष्ट प्रथा मोडून सदरी कॉंग्रेसमध्यें दिसून अलेली कार्यपद्धति व शिस्त बद्धता आमच्याही धार्मिक संमेलनात दिसून येईल तर तो सुदिन.

हे संमेलन मुख्यतः धार्मिक असले तरी त्यावेळीं मानवीजीवनाच्या इतर क्षेत्रातील विषयांची उपेक्षा केली गेली नाहीं. या संमेलनाच्या वेळीं अन्न,

समाजस्वास्थ्य, आरोग्य वगैरे जागतिक विषयावर तज्ञांचे परिसंवाद घडवून आणवून मानवी जीवनाच्या सर्वांगीण उन्नतीच्या सर्व क्षेत्रांची सांगड घालण्यात आली. आपल्या वीरशैव धर्माच्या परिषदा भरविणारे कार्यकर्ते यापासून कांहीं बोध घेतील का ?

त्याचप्रमाणें सर्व श्रेष्ठ ख्रिश्चन धर्मगुरू ६ वें पोप पॉल यांनी भारतांत आल्यावर अनेक शैक्षणिक, सामाजिक, सांस्कृतिक व आध्यात्मिक संस्थांना भेटी देऊन हजारो रुपयांची देणगी दिली. याच दानशूर व निःस्वार्थी धर्म–गुरूंनी आपल्या मस्तकावरील अत्यंत मौल्यवान किंमतीचें, सोन्याचें, मोत्याचें, हिऱ्याचें व रत्नांचें बनवलेलें किरीट काढून आपल्या राष्ट्रकार्यास दिल्याचे ऐकून कुणाच्या भावना हेलावणार नाहीत ! आमच्या समाजातील धर्मगुरूंनी व जगद्‌गुरूनी हें उदाहरण आदर्श म्हणून आपल्या डोळापुढें ठेवावयास नको काय ? परंतु याच्या उलट आमचे कांहीं धर्मगुरू व जगद्‌गुरू भक्ताकडून देणग्या गोळा करून त्यांचा विनियोग आपल्या मिरवणुकी करितां चांदीची पालखी व सोन्याचे मुकूट बनविण्यांत खर्च करीत आहेत हे दृश्य पाहिले कीं आमच्या माना लाजेनें खाली घालावे असें वाटते. आमचे धर्मगुरू व जगद्‌गुरू पादपूज्य पंचाचार्यांचे व महात्मा बसवेश्वरांचे अनूयायी म्हणवून घेतात. परंतु त्यांच्या तत्वांचे अथवा त्यांच्या खडतर व्रतबद्ध साध्या जीवनाचे अनुकरण हे करीत नाहींत ही दुःखाची गोष्ट आहे. पंचाचार्य अथवा बसवेश्वर यांनी कधीतरी आपल्या डोक्यावर सोन्याचे मुकुट घालून चांदीच्या पालखींतून आपल्या मिरवणुकी काढून घेतल्या होत्या कां ?

## लेखांक २

# बसवजयंति कशी साजरी करावी ?

**(अ. भा. वीरशैव संघाचे अध्यक्ष या नात्यानें प्रसिद्ध केलेले निवेदन. हें निवेदन सन १९६५ एप्रिल महिन्याच्या अंकांत प्रकाशित केले गेले आहे.)**

प्रत्येक वर्षी बसव जयंति अक्षय तृतीयेस साजरी केली जाते. ह्या वर्षी ही जयंति मंगळवार ता. ४ मे १९६५ रोजीं असून त्या दिवशी ही जयंति ठिकठिकाणीं

मोठ्या समारंभानें साजरी केली जाईल. सामान्यतः महाराष्ट्रातील वीरशैवांना श्री बसवेश्वरांनी केलेल्या खऱ्या कार्याची कल्पना नसल्या कारणानें हा समारंभ सांप्रत सांप्रदायिक पद्धतीनें साजरा केला जातो. त्यामुळें बसव जयंति साजरी करण्याचा मूळ उद्देश सफल होत नाहीं.

श्री बसवेश्वर हे सांप्रदायिक धर्मोद्धारक नसून मानवतावादी संत व क्रांतिकारी धर्म व समाजसुधारक होते. त्यांचे मुख्य ध्येय त्या काळच्या हिंदुसमाजांत रूढ झालेल्या जातिभेद, अस्पृश्यता, उच्चनीचता, स्त्रियांवरील धार्मिक व कौटुम्बिक निर्बंध, धर्माच्या नांवावर प्राणीहिंसा, कर्मठपणा व धार्मिक वेडगळ समजुती अशा अनिष्ट व हानिकारक अंध रूढींना मूठमाती देऊन दया, प्रेम, समता विश्वबंधुत्व या सारख्या उदात्त तत्त्वावर धार्मिक, सामाजिक व आर्थिक सुधारणा घडवून आणून सर्वोदय तत्त्वावर नवसमाजरचना करण्याचे होतें. हें ध्येय साध्य करण्याकरतां त्यांनी जिवापाड मेहनत केली व त्याकाळच्या कर्मठ सनातनी लोकांच्या छळाला न जुमानतां त्यांनी आपला कार्यक्रम अमलांत आणला. आपल्या नवसमाजांत त्यांनी स्पृश्य-अस्पृश्य वगैरे सर्व जातींच्या व वर्गाच्या लोकांचा समावेश करून घेऊन व त्यांच्यामध्यें रोठीबेटी व्यवहार सुरू करून समानतेच्या तत्वाचा व सामाजिक सुधारणेचा उच्चांक गाठला होता हें सवश्रुत आहे.

सांप्रतकाळी सुद्धां वर नमूद केलेले हिंदुसमाजातील हे दोष नुसत्या हिंदुधर्माच्याच नव्हे तर राष्ट्राच्या भावैक्याला व प्रगतीलासुद्धां कसे आड येत आहेत याची सर्वांना जाणीव आहे. त्याकरता नुसत्या वीरशैव धर्माच्या दृष्टीनेंच नव्हे तर राष्ट्रैक्य व राष्ट्रोन्नतीच्या दृष्टीनें सुद्धां खऱ्या अर्थानें वसवजयंती साजरी करणें किती महत्वाचें आहे हे कळून येईल.

याकरितां श्री बसवेश्वरानी आपल्या आयुष्यांत मानवी समाजाच्या उद्धारा करतां केलेले कार्य लक्षांत घेऊन विशाल व राष्ट्रीय दृष्टांने व व्यापक प्रमाणावर त्यांची जयंति साजरी करणें आपले कर्तव्य आहे. ठिकठिकाणी बसव जयंति साजरी करणाऱ्या कार्यकर्त्यांनी व नेत्यांनी हा आपल्या वीरशैव समाजाचा एक धार्मिक विधी आहे असें न मानतां हा समाज व राष्ट्रहित पोषक समारंभ आहे या भावनेनें तो साजरा करावा व शक्य तितक्या मोठ्या प्रमाणावर त्याला सार्वजनिक स्वरूप द्यावें समारंभाच्या संघटकामध्यें इतर धर्मीय कार्यकर्त्यांचाही समावेश करावा व समारंभाला सर्व जातींच्या व धर्मांच्या लोकांना, तसेंच स्थानिक व बाहेरील

पुढाऱ्यांना आमंत्रणें देऊन त्यांना समारंभात प्रामुख्यानें भाग घेण्याची संधी द्यावी. समारंभाच्या कार्यक्रमात सुद्धां सांप्रदायिक कार्यक्रमावर जास्त भर न देतां श्री बसवेश्वरांचें तत्त्वज्ञान, वचन साहित्य व त्यांनी घडवून आणलेली धार्मिक सामाजिक व आर्थिक क्रांति यांचे विवेचन व चर्चा, अशा सार्वजनिक हिताच्या व स्वरूपाच्या कार्यक्रमालाच जास्ती महत्त्व द्यावें.

वरील प्रमाणें उदार धोरणानें व राष्ट्रीय दृष्टीनें बसवजयंति साजरी केल्यास हा समारंभ करण्याचा मूळ उद्देश सफल होईल व सार्वजनिक लोकांनाही श्री बसवेश्वरांच्या खऱ्या मानवतावादी कार्याची माहिती होईल. तसेंच ह्या समारंभाचे सांप्रतचे सांप्रदायिक व आकुंचित स्वरूप बदलून त्याला राष्ट्रीय स्वरूप येईल. आगामी बसवजयंति ठिकठिकाणीं अशा रीतीनें साजरी केली जाईल अशी आशा आहे.

म. पु. पाटील

अध्यक्ष अ. भा. वीरशैव संघ, बेळगांव

---

लेखांक ३

# शिवानुभव मंटपातील आदर्श व बोधप्रद परिसंवाद

( सन १९६५ आक्टोबर महिन्याचा अंक पान २७ )

बाराव्या शतकांत श्री बसवेश्वरांनी कल्याण नगरी स्थापिलेले शिवानुभव मंटप सुविख्यात आहे. या मंटपांत सर्व शिवशरण व शिवशरणाक्का एकत्र येऊन आपापसांत अत्यंत उच्च दर्जाची आध्यात्मिक चर्चा करीत असत. त्यापैकी प्रत्येकांनी आपणाला सुचलेल्या अथवा अनुभवलेल्या आध्यात्मिक विचारांची वचनें

शिवानुभव मंटप सभेत वाचून दाखवून त्याचे विवेचन करावे व त्यावर सर्वांनी साधक बाधक चर्चा करून योग्य वाटल्यास ती वचने तेथील वचन संग्रहात नमूद केली जावीत असा सदरी मंडपाचा शिरस्ता होता. ही वचने वचन संग्रहात नमूद करण्याचे कार्य 'ओले शांतय्या' याच्याकडे सोपविले गेले होते.

एका प्रात:काळी नित्य नियमाप्रमाणे शिवानुभव मंटपाच्या 'शून्य सिंहासनावर' भगवान शंकराचे अवतार म्हणून मानले गेलेले प्रसिद्ध ज्ञानी वैराग्यमूर्ती व संत शिरोमणी श्री प्रभुदेव विराजमान झाले होते. त्याचप्रमाणें श्री बसवेश्वरादि शिवशरण व शिवशरणाक्का यांनी आपापली स्थाने मंडित केली होती. सभेच्या नियमानुसार प्रारंभी 'ॐ नमः शिवाय' या पवित्र महामंत्राचा जपयज्ञ संपल्यावर श्री बसवेश्वरांनी आपल्या वचन वाचनास सुरवात केली. श्री बसवेश्वर "एन्नवगोलिट्टु होन्नशूलदल्लेक्किदरेन्न होगळि होगळि, नन्न होगळते नन्नम्मेयगोंडितल्ला कूडल संगम देवा, नीननगोळ्ळिदनादरे एन्न होगळतेगे अडुबारा धर्मी".

( भावार्थ - माझ्या चाहत्यांनी माझी स्तुती करून करून मला सोन्याच्या सुळावर चढविले. शिव शिव ! ही स्तुती आता माझ्या अंगवळणी पडली आहे ! देवा, तू माझा हितकर्ता असशील तर आता होत असलेलीं माझी स्तुती थांबव ! )

प्रभो, मी थोडेंसे काही कार्यं केल्यावरोबर मी भक्तश्रेष्ठ, थोर शिवशरण, समयाचार्य म्हणून माझे चाहते माझी स्तुती करू लागले आहेत. सतत होत असलेली ही स्तुती ऐकून ऐकून ती आता माझ्या अंगवळणी पडली आहे. त्यामुळें माझ्या मनात अहंकार उत्पन्न झाला आहे व हा अहंकार माझा सत्यानाश करील. तेव्हा मी काय करू ? म्हणून 'देवा, माझे काही हित करावयाचे तुझ्या मनातून असेल तर काही तरी करून दररोज होत असलेली माझी ही स्तुतो थांबव' असें मी कूडल संगम देवाची प्राथना करीत आहे.

सर्व शिवशरण – भले ! अण्णांनी हे वचन रचून त्यात आमची सर्वांची अंतकरणेच उघडी केली आहेत. अण्णाचे वचन म्हणजे अमृतच ! आम्हा सर्वांना ते मार्गदर्शक असल्यामुळे ते वचन संग्रही नमूद करावे.

श्री प्रभुदेव – ( मदादेवी अक्कास उद्देशून ) अक्का, तू काही बोलत नाहीस ! तुझा अभिप्राय काय ?

महादेवी अक्का – प्रभो, अण्णांच्या वचनावर अभिप्राय व्यक्त करणे म्हणजे लहान तोंडी मोठा घास घेण्यासारखे आहे. तेव्हा मी खेडवळ पोरगी काय अभिप्राय व्यक्त करणार? परंतु माझी एक शंका आहे. विचारू का?

श्री प्रभुदेव – अलबत. सर्व शंकांचे निरसन करणें व कोणत्याही प्रश्नाची साधक बाधक चर्चा करणें हे तर आमच्या शिवानुभव मंटपाचे ध्येयच आहे.

महादेवी अक्का – आता अण्णा म्हणाले की माझ्या चाहात्यांनी माझी स्तुती करून करून मला सोन्याच्या सुळावर चढविले. परतु आम्हाला सोन्याच्या सुळावर चढविणारे आमचे चहाते की त्यांच्या स्तुतीने भुलून जाणारे आमचे कच्चे मन? लोक केव्हाही स्तुती अथवा निंदा करणारच! तो त्यांचा मानवी स्वभावच आहे. आपले मनच कच्चे असून त्याच्यावर स्तुतिनिंदेचा परिणाम होत असल्यास देव ह्या स्तुतीच्या आड कसा येणार?

श्री प्रभुदेव – देवी, या शंकेचे निरसन करण्यास तूच समर्थ आहेस. तूच तुझा अभिप्राय सांग.

महादेवी अक्का – ( अक्का वचनरूपात आपला अभिप्राय मांडते ) "बेट्टद मेलोंदु मनेय माडि, मृगगळिगंजिदडेंतय्या। समुद्रद दंडियोळगोंदु मनेयमाडि, नोरेतेरेगळिगंजि दडेंतय्या॥ संतेयोळगोंदु मनेयमाडि शब्दक्के नाचिदडेंतय्या। चन्नमल्लिकार्जुन देव केळय्या, लोक दोळगे हुट्टिर्द बळिक स्तुतिनिंदेगळु बंदडे, मनदल्लि कोपव ताळदे समाधानियागिरबेकु॥"

( भावार्थ – पर्वतावर घर करून, वन्य पशूंना भिऊन कसे चालेल? समुद्र तीरावर घर बांधून सागर लाटांना भिऊन कसे चालेल? भरबाजारात घर करून गोगाटाला भिऊन कसे चालेल? करिता चन्न मल्लिकार्जुन देवा, ऐक, ह्या मर्त्य लोकांत जन्माला आल्यानंतर आपली स्तुती अथवा निंदा झाली तरी त्या बद्दल मनांत राग न मानतां समाधानाने राहिले पाहिजे.) प्रभो आपले मन खंबीर व पक्के असून त्यावर आपला पूर्ण ताबा असल्यावर त्याच्यावर स्तुतिनिंदेचा काय परिणाम होणार?"

अक्कांचे हें वचन ऐकून सर्व शिवशरण आदरयुक्त भावनेनें व आश्चर्य चकित मुद्रेनें अक्काकडे पाहू लागतात.

श्री प्रभुदेव – ( हसून ) भले खेडवळ पोरी! बसवेश्वरा, शिष्यात् इच्छेत् पराजयम्।

श्री बसवेश्वर – प्रभो, लौकिक दृष्टीने मी अक्काचा गुरू असलो तरी आध्यात्मिक दृष्टीने ती मला गुरू आहे. आध्यात्मिक क्षेत्रात तिचे स्थान अत्युच्च आहे. आम्हा सर्वांना नवीन आध्यात्मिक दृष्टी देऊन मार्गदर्शन केल्याबद्दल आम्ही तिचे आभार मानले पाहिजेत.

श्री प्रभुदेव – अक्का, बसवेश्वरा तुमची दोघांचीं ही वचने महत्वाची व शिवशरणांना मार्गदर्शक आहेत. बसवेश्वरांचे वचन भक्त स्थळात असलेल्या निर्मळ पवित्र, शुद्ध व सात्विक साधकांच्या मनाचे दिग्दर्शन करते. साधकांचे मन तेवढे खंबीर व पक्के झाले नसल्यानें त्यानें आपणाला योग्य मार्गदर्शन व सहाय्य करण्यास परमेश्वराची करुणा भाकणे साहजिक व योग्य आहे. तसेच अक्काचे वचन सिद्धावस्थेला पोचलेल्या सिद्ध पुरुषांच्या सम्यक् मन:स्थितीचे द्योतक आहे. ती स्वत: ऐक्य स्थळाला पोंचलेली जीवन्मुक्त महायोगिनी आहे. अशा महायोगिनीच्या सत्संगाचा लाभ आम्हा सर्वांना लाभला आहे. ही एक परमेश्वाची कृपाच आहे, असो. आजची चर्चा फारच उद्बोधक झाली यांत संशय नाही. ओले शांतय्या ! ही दोन्ही महत्वाची वचने वचन संग्रहात प्रमुख ठिकाणी नमूद करा !

सर्व शिवशरण – अक्का, तुमच्या पदकमलांना नमो नमो ! आम्हा पतितांचा उद्धार झाला !

महादेवी अक्का – बंधू-भगिनींनो, माझी अवास्तव स्तुती करून मला लाजवूं नका. मी आपल्या सारख्या शिवशरणांची सेवा करीत करीत माझ्या चन्नमल्लिकार्जुनाच्या (देवाच्या) शोधाला निघालेली एक अबोध बालिका आहे. मला माझा चन्नमलिकार्जुन (देव) दाखवा हो !

श्री प्रभुदेव – अक्का, चिंता करू नको. तुझा चन्नमल्लिकार्जुन तुला लौकरच दर्शन देईल व तूं त्याच्यात लीन होऊन जाशील. तू आता श्रीशैलकडे प्रयाण कर.

महादेवी अक्का - प्रभो, आपली आज्ञा शिरसावंद्य आहे. ( सर्व जातात ) ( सभा समाप्त होते. )

— ० —

## लेखांक ४

# संतांच्या बोधकथा – सम्यक ज्ञानी राणी महादेवी

श्री बसवेश्वरांचे वेळी काश्मीरातील पांडवपूरचे राजे महादेव भूपाल (मोळगी मारय्या) व त्याची पत्नी राणी महादेवी सर्वसंग परित्याग करून, बसव कल्याणला येऊन तेथील शिवानुभव मंटपात अध्यात्म साधना करीत होते, व "कायकवे कैलास" ह्या व्रताला अनुसरून दररोज जंगलातील लाकडे तोडून आणून विकून, ते आपला उदरनिर्वाह व दासोह चालवीत होते ही गोष्ट सर्व श्रुतच आहे. एकदा दोघेही पतिपत्नी लांकडे तोडण्याकरतां जंगलांत जात असतांना मारय्यानें वाटेत सोन्याचा मोहरा पडलेला पाहिला. क्षणभर त्याला त्याचा मोह पडला. परंतु तें क्षणभरच. तेवढ्यांतच त्यानें आंपणाला सांवरले व मागाहून येणाऱ्या आपल्या पत्नीलाही त्याचा मोह उत्पन्न होऊ नये म्हणून तो पायाने त्याच्यावर माती सारूं लागला. महादेवीने जवळ येऊन 'काय करीत आहात ?' म्हणून विचारले. तेव्हा मारय्याने 'काही नाही' म्हणून तिला सरळ उत्तर देण्याचे टाळले. चाणाक्ष महादेवीने ते जाणले व पायाने माती सरकवली. तेव्हा झांकलेला मोहरा तिच्या दृष्टीस पडला. तेव्हा ती 'ॐ! हेच ते, सोनेही मातीच आहे, त्याच्यावर कशाला तुम्ही आणखी माती टाकीत होता ?' असे म्हणाली. पत्नीच्या सम्यक् ज्ञानाची ही परिपूर्णता पाहून तो आश्चर्यचकित झाला व गहिवरून त्याने तिचे पाय धरले. तेव्हा महादेवी लाजेने 'हे काय भलते ! आपण माझे पती व मी आपल्या चरणाची दासी' असे म्हणून पाय सोडवून घेऊन पतीच्या पायाला वंदन केले. 'मी तुझा पती खरा परंतु तूं माझी दासी नसून गुरू आहेस' असे म्हणून मारय्याने तिचा गौरव केला. तेव्हां ती 'भलतेच काही तरी ! चला आपण लाकडे तोडावयाला जाऊ' म्हणून नवऱ्यासह ती चालती झाली.

संपूर्ण सम्यक्ज्ञानी वैराग्यसंपन्न राणी महादेवी ही खरोखरीच जगन्माता महादेवी होय. अशा साध्वी नारींमणी आपल्या आत्मतेजानें व तपोबलाने श्री बसवेश्वरांच्या शिवानुभव मंटपात तळपत होत्या म्हणून त्या मंटपाच्या दैदीप्यमान तेजाने दाही दिशा प्रकाशमान् झाल्या होत्या.

इतिहासाची पुनरावृत्ति होते म्हणतात. अशा उज्वल इतिहासाची पुनरावृत्ति सांप्रत होईल कां ?

— ० —

## लेखांक ५

## आध्यात्मिक वेंचे – १

# आम्ही सर्व मूर्खच !

( सन १९६५ मे महिन्याचा अंक पान २३ )

एक म्हातारी बाई अंगणात काही तरी शोधीत होती. तिला पाहून रस्त्याने जाणाऱ्या एका गृहस्थाने विचारले ' बाई, काय शोधीत आहात ?'

बाई :- माझीं सुई घरात सांडली आहे, ती मी येथे शोधीत आहे.

गृहस्थ :– सुई घरात सांडलीं तर ती येथे कशी सांपडेल ?

बाई – घरात अंधार आहे म्हणून येथे शोधीत आहे.

गृहस्थ आश्चर्यानें " किती मूर्ख आहे ही बाई ! " असे मनात म्हणून चालता झाला. बाई खरोखरच मूर्ख. या बाईसारखे दुसरे मूर्खं जगात कोणी असतील का ? आहेत. आमच्या अंतरंगात परमात्मा वसत आहे. परंतु आमच्या मनातील अज्ञानांधकारानें तो झाकून गेला आहे. तथापि आम्ही ह्या अज्ञानांधकाराचा नाश करून त्याला तेथे न शोधता, देवळात जाऊन तेथील प्रकाशांत त्याला शोधण्याचा प्रयत्न करतो. तेथें तो आम्हाला सांपडेल का ? कधीही नाही.

तर मग आम्ही सर्व त्या बाईसारखे मूर्खच ना ?



## लेखांक ६

## आध्यात्मिक वेंचे – २

# आम्ही सर्व कपाळकरंटेच !

( सन १९६५ आगष्ट महिन्याचा अंक पान १९ )

एका गांवात एक शिवभक्त तेली राहात होता. तो सदा शिवभक्तीत मग्न असे. एके दिवशीं त्याच्या घाण्याचा बैल मेला, त्यामुळे तो फार दुःखीकष्टी झाला. तें पाहून भोळ्या भगवान शंकराला आपल्या भक्ताची दया आली व त्याला पाहिजे तो वर देण्यास नंदीवर बसून तो त्याच्या घरी आला व 'पाहिजे तो वर माग, तुला देतो' असे म्हणाला. जड बुद्धीच्या तेल्याला दुसरे काय सुचणार ? तशांत धट्टाकट्टा शिव व घष्टपुष्ट बैल (नंदी) पाहून त्याच्या तोंडाला पाणी सुटले व म्हणाला, 'देवा तुझ्या बैलाला माझ्या घाण्यास जुंपून तूं माझा घाणा चालव.' देवाने 'तथाऽस्तु' म्हटलें व घाण्यास नंदीला जुंपून त्याने घाणा चालवण्यास सुरवात केली.

आजू बाजूचे लोक हे सर्व पाहून हसूं लागले. देवाधिदेव भगवान शंकर आपण होऊन जगातील सारे ऐश्वर्यसुद्धा देण्यास तयार होऊन आला असताना ह्या मंदबुद्धि कपाळकरंटचा तेल्याने त्याला व त्याच्या नंदीला आपल्या घाण्यास जुंपले! त्याचे नशीबच खोटे ! असे बोलून त्याचा उपहास करू लागले.

तेली जडबुद्धी व कपाळकरंटा खराच. परंतु आपण तरी त्याच्यापेक्षा सूज्ञ व दूरदृष्टीचे आहोत का ?

आम्ही सर्व अनन्य भक्तिभावाने व निष्ठेने देवाची पुजाअर्चा व आराधना करून त्याला आळवतो. परंतु देवाकडून वर मागताना आपणसुद्धा जनन मरण-

रहित, अक्षय सुखदायक व प्रत्यक्ष शिवस्वरूपी मोक्षपदाचा वर न मागता, 'देवा, मला पुत्र दे, सुस्वरूप व सुलक्षणी वायको दे, धनदौलत दे, मंत्रीपद दे, हे दे, ते दे' असले क्षुल्लक व क्षणभंगूर वर मागतो.

तेव्हा आपणसुद्धा त्या तेल्यासारखें जडबुद्धी व कपाळकरंटेच नाहीं का ?

---

## लेखांक ७

# वचनशास्त्रासंबंधी वीरशैवेतर विद्वानांचे प्रशंसोद्गार !

( सन १९६९ मार्च–एप्रिल महिन्याचा अंक पान १ )

कन्नड साहित्य सम्राट व सुप्रसिद्ध विद्वान दि. श्री. एम्. आर. श्रीनिवासमूर्ति यांनी शिवशरण व त्यांनी रचलेले वचनशास्त्र यासंबंधी खालील प्रशंसोद्गार काढले आहेत.

" कन्नड साहित्य क्षेत्रांत संचार करीत असतांना एके ठिकाणीं एका तपोवनांत प्रवेश केल्याप्रमाणें सिद्ध व साधक ऋषी जनांचे दर्शन घेऊन उदात्त जीवनाने व आध्यात्मिक उपदेशानें आमचे अंतरंग शुद्ध व पवित्र झाल्याप्रमाणें तसेच आमच्या जीवात्म्याचीं बंधनें निखळून पडून, आम्ही मुक्तावस्थेला पोचल्याप्रमाणें एक दिव्य आनंदानुभव प्रत्ययास येतो. या तपोवनात शहरातील गोंगाट नाहीं किंवा राजदरबारातील वैभवशाली व नेत्रदीपक देखावे नाहीत. तेथे तपोवनांतील नैसर्गिक शांति, परस्पर प्रेम, समता व स्वातंत्र्य मूर्तिमंत झालेले दिसून येतात. आरण्यकांतील उपनिषदांच्या दर्शनशास्त्राप्रमाणें येथे आम्हास वचनशास्त्राचे दर्शनशास्त्र दृष्टीस पडते. या शास्त्रांत सत्याची आकांक्षा साहित्यरूपानें व सत्याचा साक्षात्कार दर्शनशास्त्ररूपानें आमच्या मनांत आनंद निर्माण करतात.

वचन साहित्यच ह्या तपोवनाचे उपनिषद्–साहित्य व वचनकारच उप-

निषत्कार महर्षि. यांत 'गुह्यात् गुह्यतर' रहस्य अथवा गुपित असे कांहींच नाहीं. तसेंच यांत वर्णभेद अथवा लिंगभेद यामुळे निर्माण झालेला 'अधिकारी–अनधिकारी' असला तारतम्यभाव नाहीं, किंवा वेद श्रेष्ठ की आगम श्रेष्ठ असले तर्क वितर्क नाहींत, तर शिवशरणांनी व्यवहारी सिद्धान्त तत्त्वज्ञानाला आपल्या वचनसाहित्य शास्त्रांत अधिक भर दिलेला आहे."



लेखांक ८

# शिवशरणांचा संदेश

(सन १९६५ एप्रिल महिन्याच्या अंकात प्रकाशित झालेला स्फुटलेख)

**यारे यारे लहान थोर। अवघे याती नारी नर ॥**

या! या! सारेच या! लहानथोर आबालवृद्ध, स्त्री पुरूष, श्रीमंत, गरीब, राव, रंक, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, अतिशूद्र, महारमांग, चांभार, ढोर, साळी, माळी, कोळी, पतित पामर, बाया बापड्या वगैरे सर्व जातीचे, सर्व वर्गाचे, व सर्व दर्जाचे लोकहो तुम्हाला परमसुख पाहिजे असेल तर इकडे या! मात्र तुमचा कुलाभिमान, जात्याभिमान, विद्याभिमान, धनदौलतीचा अभिमान वगैरे सर्व वृथाभिमान बाजूला सारून, अहंकाराला मूठमाती देऊन, नम्रभाव धारण करून, परस्पर बंधुभावाने वागण्याचा निश्चय करून इकडे या. तुम्हा सर्वांच्या अंतर्यामीं एकच परमात्मा वास करीत आहे करितां कोणी कोणाला हीन लेखू नका व सर्वांशी ममतेने व सौहार्दाने वागा. ऐका! लक्षपूर्वक ऐका! त्या शिवलोकाचे दिव्यसंगीत ऐका! विश्वातील अगणित नभोमंडले त्या विश्वसंगीताच्या तालांवर नाचत आहेत. जगातील सर्व अणुरेणूच्या आकर्षण विकर्षण शक्ति रूप संगीताच्या तानामुळेच प्रेषित झालेला चैतन्य परमाणूमध्ये प्रवेश करून जगातील असंख्य जीव

कोटींना जन्म दिला आहे. ह्या संगीताच्या आलापामुळेच मानवदेहातील सुप्त जीव जागा होऊन शिवाकडे धाव घेत आहे. विश्वाच्या उत्पत्ति-स्थिति-लयाला कारण असलेल्या शिवलोकांच्या ह्या दैवी संगीतांत भागीदार होण्याचे भाग्य शिवकृपेनें तुम्हाला लाभले आहे. भगवान् शंकराने तुम्हाला दिलेल्या सर्व शक्ती ह्याकरतांच दिलेल्या आहेत. ही शिवदत्त शक्तिरूपी वाद्यें तुम्ही घासून पुसून, मोडतोड दुरूस्त करून, नीटनेटके करून घ्या व त्या विश्वसंगीतात तुमच्या वाद्यांचे सूर मिसळून ते अधिक मधुर व सुश्राव्य करा. तुमची ही सर्व वाद्यें संगीताला पूरक व पोषकच आहेत. परंतु तुम्ही होऊन बेसूर काढू नका. ह्या विश्वसंगीताच्या तालावर पाउले टाकीत व भक्तिभावाने नाचत वागडत तुम्ही परमसुखाच्या पवित्र देवालयाकडे चला. मात्र पार्वतीपतीच्या पदकमलावर अर्पण करावयाच्या तुमच्या भक्तियुक्त पुष्पांजलीला नीट सांभाळा. तुम्ही स्वतः कायावाचा मनानें शुद्ध होऊन तुमच्या पुष्पांजलीतील सुकोमल व सुवासिक सद्‌गुणरूपी फुले न सांडता, न सुकू देतां, न कुसकरतां नीट सांभाळून नेऊन अनन्य भावानें त्या पशुपतीच्या पदांबुजावर अर्पण करा. काय म्हणता ? शिवलोक यात्रेचा मार्ग अवघड व कांटयाकुटयानीं भरला आहे ? होय. परंतु घाबरूं नका. तुम्ही शूर, धीर, वीर—(शैव) आहात. तुम्ही पावित्र्य, नीतिनिष्ठा, क्षमा, दया, शांति ह्या सारख्या सद्‌गुणांची कास धरा व सदाचाराने वागून मार्ग आक्रमण करा. या सदाचाराची शिदोरी तुमच्या पाठीशी असल्यावर तुम्हाला कोणताही मार्ग अवघड वाटणार नाही. त्यांच्या साह्यानें तुम्ही कोणत्याही बिकट परिस्थितीतून पार पडाल व परम सुखाचे ध्येय गांठाल. करिता उठा ! जागे व्हा ! धैर्ययुक्त होऊन धर्ममार्गाने चला व धर्मसाम्राज्याचे रहिवासी होऊन परमसुखाच्या निजधामात सुखाने रहा !

(कन्नड 'वचनरहस्य' ग्रंथाच्या आधारें)

# वचनसुधा

१

नको करूं चोरी, नको करूं हत्या;
नको बोलूं खोटें, नको मानू राग;
नको असूया इतरांची, नको आत्मस्तुति,
नको मानू तुच्छ इतरासी
हीच अंतरंग शुद्धि, हीच बहिरंग शुद्धि,
हीच आमुच्या कूडलसंगमदेवास प्रसन्न करण्याची रीति.

२

बाप आमुचा मातंग चन्नय्या;
पणजा आमुचा ढोर ककय्या;
आमुचाच जाण चिक्कय्या;
भाऊ आमुचा किन्नर बोम्मय्या;
मग मला कां नाहीं जाणत कूडलसंगम देवा ?

३

दया नसलेला धर्म कोणचा ?
सकल प्राणिमात्राशी दयानें वागावे.
दया हेंच धर्माचे मूळ तत्व आहे.

— श्री बसवेश्वर

काढुनि दांत सर्पाचे तया आल्या खेळविता, सर्पाचा संग असे बरवा.
सांडुनि कायविकार तया आल्या बाळगतां, कायेचा संग असे बरवा.
आई राक्षसी बनल्यापरी होई काय विकारानी, चन्नमल्लिकार्जुना
तुम्हा वश केल्यावरी नका म्हणू तयाना कायाधारी.

— अक्क महादेवी

माता मे पार्वती देवी पिता देवो महेश्वरः।
भ्रातारो मनुजाः सर्वे स्वदेशो भुवनत्रयम् ।।

— शैवागम

शांतिपाठ

ॐ सह नाववतु । सहनौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै ।
तेजस्विनावधीतमस्तु । मा विद्विषावहै ।
ॐ शान्तिः। शान्तिः ।। शान्तिः ।।।



पुण्यश्लोक कै. श्री. आप्पासाहेब वारद,
सोलापूर (पान १४८)





पूज्य लिं. श्रीमृत्युंजयमहास्वामीजी (पान ६)



परमपूज्य लिं. श्री. हानगल कुमारस्वामीजी
( पान १८१ )



श्री. म. नि. प्र. स्व. शिवबसव महास्वामीजी
( श्रीं. नागनूर महास्वामी ) ( पान १९७ )




कै. श्री. नानासाहेब वामणगांवकर (पान ८३)




षट्-स्थल सिद्धांताचे सामान्य रेखा-चित्र (पान १६६)



शिवानुभव मंटपांत अक्कमहादेवीचे वचनवाचन (पान २५६)



श्रीप्रभुदेव पाद्यपूजा (पान २३७)



वीरशैव संत श्रीप्रभुदेव ( अलम् प्रभू ) (पान २३७)



केळदी राजघराण्याचा राजा शिवाप्पा नायक (पान १२७)



बळ्ळिगावे (शिमोग्गा जिल्हा) येथील काळामुखांचे केदारेश्वर देवालय (पान २३६)



श्री हिमवत् – केदारनाथ देवालय (पान २४०)



केळदी राजघराण्याचे रामेश्वर देवालय (पान १२१)



महायोगिनी–अक्कमहादेवी (पान २५६)



श्री ज. गु. पंचाचार्य लिंगावतार



दि. गुरुदेव रानडे (पान १४९)



श्री. म. नि. प्र. स्व. श्री शिवकुमारस्वामीजी,
सिद्धगंगामठ (पान २०६)



कै. श्री. लिंगाप्पा सरदेसाई–शिरसंगीकर (पान ३७)

# अखिल भारत वीरशैव संघाची प्रकाशनें

१ लीला विश्वंभर — वीरशैवधर्माचा सुप्रसिद्ध प्राचीन कन्नड काव्यग्रंथ 'प्रभुलिंगलीले' याचा संतकवि ब्रह्मदास विरचित मराठी काव्यानुवाद. मूल्य रु. ५–००

२ श्री बसवेश्वर चरित्रेयमेले होस बेळकु — श्री बसवेश्वराच्या चरित्रावर नवीन प्रकाश पाडणारा संशोधनात्मक कन्नड ग्रंथ. लेखक — श्री. म. पु. पाटील. मूल्य रु. २–००

३ महात्मा बसवेश्वर — (नाटक ग्रंथ) श्री बसवेश्वरांच्या ऐतिहासिक चरित्रावर आधारलेले नाटक. लेखक-कुमार कोठावळे. मूल्य रु. १–५०

४ श्री अक्कमहादेवी चरित्र — वीरशैव महायोगिनी संत अक्कमहादेवी यांचे चरित्र. लेखक - श्री. श्रीकांत आळ्ळी. मूल्य रु. १–५०

५ वीरशैव (लिंगायत) लेख संग्रह — ज्ञानप्रसाद मासिकांत वेळोवेळीं प्रकाशित केल्या गेलेल्या श्री. म. पु. पाटील यांच्या वीरशैव धर्म व समाज याच्या संबंधीच्या लेखांचा संग्रह. मूल्य रु. ३–००

ज्ञानप्रसाद मासिक — महाराष्ट्रीय वीरशैव समाजाच्या सेवेस वाहिलेले मासिक. वा. व. रु. ८–००.

मिळण्याचें स्थळ —

ज्ञानप्रसाद कार्यालय,
९५४ बी, रविवारपेठ, कोल्हापूर,
(महाराष्ट्र)